# मालगाडी

[ विनोदी, त्याचप्रमाणें बिनविनोदी व लेबल नसलेल्या, मिळून एकंदर वीस लहानमोठ्या गोष्टींचा संग्रह ]


लेखक

**शामराव निळकंठ ओक**



प्रकाशक

**शेठ हिरजी मोहनजी**

केशवजी नाईकाची चाळ, कांदेवाडी, मुंबई नं. ४

**किंमत [illegible] रुपये.**

पहिली आवृत्ति
फेब्रुआरी १९४२







**याच लेखकाची इतर पुस्तकें**

**कोपरखळ्या**

**चोर बाजारातील चिजा**

**गलोल**

**बाभळवनात**

**हवेवर**



---

मुद्रक—**जयराम दिपाजी देसाई**, राष्ट्रवैभव प्रेस, गिरगांव, मुंबई. ४
प्रकाशक—**शेठ हिरजी मोहनजी**, केशवजी नाईकाची चाळ,
**कांदेवाडी, मुंबई ४**

# अनुक्रम

*" I laugh because*

*I must not cry--that's all, that's atl "*

—Ibraham Lincoln.

# १. उपरतीचा क्षण

पावसाची आणखी एक सर येणार कीं काय असें दर मिनिटाला वाटत होतें. दुपारींच मन्सूनची पहिली ससर फोंफावत येऊन गेली होती. मेघगर्जना, सोसाट्याचा वारा, आडवा पाऊस, हे सगळे प्रकार आजच झाले होते. आज दुपारींच एका मोटरगाडीच्या कानांत वारें शिरून तिनें समुद्रांत बुडी घेतली होती. भुलेश्वरीं एका दुकानाबाहेर टांगलेल्या घोळदार घागऱ्यांत* एकाएकीं भरलेल्या हवेमुळें क्षणभर एक पॅरॅशूट आल्याचा लोकांना भास झाला व त्यामुळें जवळच्या कॉटन एक्श्चेंजमधले भावही दोन पॉइंट उतरले, अशी बातमी चौपाटीपर्यंत आली होती. भिजलेल्या रस्त्यावरून 'छत्रपति' चेम्बरलेनचे हजारों अनुयायी चेम्बरलेनइतकेच सावधपणें चालून गेले होते. पाऊस थांबल्यानंतर पावसाळी कपड्यांचीं कांहीं चालतींबोलतीं प्रदर्शनेंही चौपाटीवर फिरायला येऊन नुकतींच परत गेलीं होती.

नऊ वाजून गेले. विल्सन कॉलेजसमोर समुद्राकडे पाठ करून ठेवलेल्या एका बांकावर गुणाजी आळस देऊन उठून बसला. दुपारच्या पावसाला

---

* या घागऱ्याच्या आंत कोणीच नसलेलें पाहून वैतागून तेथील एका संस्कृतिसंरक्षकानें मुम्बादेवीच्या तळ्यांत जीव दिला म्हणतात.

त्यानें विल्सन कॉलेजच्या पडवीचा आश्रय धरला होता. परत बांकावर येऊन पडल्यावर मात्र, उद्यांपासून निवाऱ्याची कांहीं तरी व्यवस्था केलीच पाहिजे अशी रुखरुख त्याला लागली होती, कारण दिवेलागणीपासूनच 'पुन्हा पाऊस येईल' असें वाटत होतें. गुणाजीला निवाऱ्याची काळजी वाटूं लागली म्हणजे मुंबईला पावसाळा आला, असा साधारण आजवर संकेत होता. 'पावसाळ्याची कांहीं तरी सोय केली पाहिजे' असें ठरवून लगेच निश्चित उद्योगाला लागणारा तो मनुष्य होता. दुसरे लोक कोणी पुण्याला, तर कोणी मद्रासला जाऊन बंगले घेऊन राहण्याची व्यवस्था करोत, गुणाजीचा मार्ग तो नव्हता. वर्षांतून आठ महिने तर त्याला कधीं निवाऱ्याची पंचाईतच पडत नव्हती. झोपेंतून डोळे उघडल्या-बरोबर आभाळ दिसावें हा गुणाजीचा कटाक्ष असे, त्यामुळें मोकळ्या हवेची त्याला फार गोडी. पुन्हा मनुष्य काटक, चौपाटीच्या बाकावर रोज तासन् तास झोप काढणें त्याला कठीण नव्हतें, पण यापुढें मुंबईसारख्या धोधो पावसांत तें कांहीं शक्य नव्हतें, तेव्हां या मोसमाला पावसाळी मुक्काम कुठें ठेवावा हा विचार त्या बाकावर पडल्यापडल्या त्यानें केला, नि आळस देऊन ऊठतांनाच त्यानें ठरविलें:

डोंगरीला जायचें. आपली पावसाळ्याची सुट्टी दरसाल सरकारच्या पाहुणचारांत घालवायची असा गुणाजीचा क्रम होता. निवान्तपणें तीन-चार महिने कुठल्यातरी जेलमध्यें घालवावे, पुन्हा महालक्ष्मीच्या 'शिजन' ला मोकळा! कुठें काम करून पोटाला मिळवावें, हा विचारदेखील गुणाजीला कधीं सुचला नाहीं. कामबिम हे लाड त्याच्याजवळ नव्हते. दोन वेळच्या भुका भागविण्याइतकी मेहनत तो करीत असे, पण ती डोक्याची. तो अंगमेहनत करणारा एखादा गडी नव्हता. काम करायचें

नाहीं, महालक्ष्मीचा सीझन चुकवायचा नाहीं, वगैरे बाबतींत त्याचीं मतें पुण्या-मद्रासकडे बंगले घेणाऱ्या लोकांशीं तंतोतंत जुळत होतीं.

पण आज दुपारच्या पावसानें त्याच्यामागें निवाऱ्याची अगदीं निकड लावली होती. एकादा बारीकसारीक गुन्हा करून मॅजिस्ट्रेटच्या तोंडून 'चार महिने जेल' म्हणून ऐकेपर्यंत त्याला अगदीं चैन पडत नव्हतें. त्याच्या बुद्धीला अशी धार आली होती, कीं मनांत योजलेली व्यवस्था पार पडायला हवें तें करायला तो तयार होता. पण गुणाजीच्या अंगांत धीमेपणाही होता. तो जरी बुद्धिजीवी होता तरी चमचाभर चालेल तेथें महापूर आणणारा भडक माणूस तो नव्हता, आणि शिताफीची ईश्वरी देणगी तर त्याला उपजतच होती. धर्मादायाबद्दल त्याला तिटकारा होता. कोणापुढें एकदम हात पसरणें तो कमीपणा समजे, अन्नछत्रांतल्या भिकाऱ्यांबद्दल त्याला तिरस्कार वाटे, कोणाची मदत घेणें हा तो हलकेपणा मानी. पुन्हा धर्म करणारे लोक आपल्याला कांहीं तरी कर्म करायला सांगायचेच, तो निष्कारण जाच-काम करणें, आंघोळ करणें, वगैरे गोष्टी अगदीं डोक्यावरच बसल्या म्हणजेच करायच्या यादींत गुणाजीनें ठेवल्या होत्या. तो दानधर्म नको, ती आंघोळ नि इतर कामें नकोत, नि दान देणाऱ्यांच्या चांभारचौकशाही नकोत, त्यापेक्षां सरकार बरें; अन्न-वस्त्र-निवारा आहेच, आणि गुन्ह्यापलीकडे फाजील कसल्या चौकशाही कोर्ट करीत नाहीं. पुन्हा तुरुंगांत लोक सगळे आपल्या बरोबरीचे— करमणूक भरपूर !

सरकारी गेष्ट हौसला जाण्याचा एक जवळचा रस्ता गुणाजीनें आंखला. एकाद्या भपकेदार हॉटेलमध्यें चमचमीत हात मारायचा नि अखेर हळूच मॅनेजरला पैसे नाहींत म्हणून कळवायचें—पुढें योग्य त्या

साऱ्या गोष्टी रीतसरच होतील असा गुणाजीचा अंदाज होता. समोरच डन्सियानीची इटालियन खाणावळ होती. माडीवर काळ्या—गोऱ्या मडमा आपापल्या साहेबाना पकडून नाचवीत होत्या. विलायती संगीत चाललें होतें. शुभ्र पोषाक केलेले वाढपी, तुरुतुरू टेबलांटेबलांतून थाळे घेऊन धावत होते. फुटपाथवर उभा राहून प्रथम गुणाजीनें आपला अवतार दुकानाच्या कांचेंत नीट पाहून घेतला. त्याच्या अंगांत त्याच्या विल्सोनियन मित्रांनीं दिलेला एक जुना विटका ब्लेझर व रेशमी शर्ट होता. त्या शर्टला पाठ नव्हती; पण कॉलर फारच फॅशनेबल! कमरेची राखी रंगाची गरम फलाणीची पाटलोण तर गुणाजीनें रेव्हरण्ड प्रोफेसर मॅक्लौच यांच्या मागच्या अंगणातून उचलूनच आणलेली होती. प्रश्न होता फक्त पायतणाचा. गुणाजीच्या पायांतले जुने टेनिस शू सेवानिवृत्त होऊन गरीब झालेल्या एकाद्या जुलमी दिवाणासारखे हीनकळा दिसत होते, ड्रेनेजच्या मोठ्या नळांतून ते वाहत आले होते; समुद्राच्या लाटांनीं ते दोन वेळां गुणाजीपुढें आणून टाकले होते—एकदां त्यानेंदेखील ते परत फेकले होते, पण दुसऱ्यांदा आले तेव्हां हे बूट आपल्याला लाभतील असें वाटून गुणाजी ते वापरूं लागला होता. डन्सियानीकडे जेवण्याचा प्रसंग गुणाजीला अचानकच येत असल्यामुळें त्या बुटांचे लांच्छन लपवणें त्याला अशक्य होतें, पण त्यानें आपल्याकडून कसूर केली नाहीं; कॉलर गळ्याभोंवतीं नीट बसवून त्यानें नरड्यावर बटणांत बसणारें गळेफूल खोंचलें, कपडे नीटनेटके केलें, आणि केसांवरून चौपाटीवर सांपडलेला माशाच्या कण्याचा आयता कंगवा फिरवून तो गंभीरपणें डन्सियानींत शिरूं लागला.

टेबलापर्यंत सुखरूप पोंहोचलों म्हणजे मग भीति नाहीं, दरम्यान

पायांतल्या टेनिस-शूनें आपल्याला दगा दिला नाहीं म्हणजे झालें. एकदां टेबलाजवळ बसलों कीं कमरेच्या वरील पोषाख पाहून आपल्याला पांचसहा रुपयांचा माल वेटर सहज वाढील—एकाद्या चांगल्या 'सूप'नें सुरुवात करून तो थेट टेबलावर फळफळावळ येईपर्यंत सर्व स्वैपाकाचा चांगला चौफेर समाचार घ्यायचा, नि अखेर एक उंची सिगार शिलगावून मॅनेजरला बोलावून त्यालाच पोलीस बोलावण्यास सांगायचें—हाच डोंगरीला चार महिने जाण्याचा राजमार्ग गुणाजीला दिसत होता. पण या राजमार्गाच्या सुरुवातीलाच डन्सियानीच्या हेड वेटरनें फाटक आडवें घातलें. त्या म्हाताऱ्याचें लक्ष गुणाजीच्या कंगाल टेनिसशूकडे गेले. एकादा भयंकर कर्मठ यज्ञ करीत असतां त्याच्या हातांत पळीऐवजीं कांटा आला तर त्याची जी स्थिति होईल ती त्या हेडवेटरची झाली. तो नुसतें शुक्शुक् करून गुणाजीला थोपवूं लागला, पण गुणाजी ढकलेपणानें पुढें येऊंच लागला. हेडवेटरनें रिकामटेकड्या उभ्या असलेल्या दोन सामान्य वेटर्सना दरडावलें,

'आंतोन—फ्रांशीस—'

स्वच्छ पोषाख केलेले दोन आडदांड किरिस्तांव आले आणि त्यांनीं गुणाजीला 'मूं पलट' करायला लावून पायऱ्या उतरवीत हलक्या हातांनीं फूटपाथवर आणून सोडलें.

पुण्याच्या एका कॉलेजियननें, तिसऱ्याच एका कॉलेजच्या क्लबचा फोटो होता त्या ठिकाणीं पगडी-उपरणें या पोषाकांत जाऊन मधल्या खुर्चीवर बसण्याचा घाट घातला होता—पण त्याच्या त्या पोषाकांत देखील खिशांतून कंगवा नि अलगुज डोकावत राहिल्यामुळें तो

पकडला गेला, व त्याची योग्य प्रकारें बोळवण झाली; सातआठ मजबूत धक्के खाल्ल्यानंतर शक्य तितक्या ताठ मानेनें तो परत येत असतां त्याला जसें वाटलें असेल, तसेंच डन्सियानींतून निरोप मिळाल्यावर गुणाजीला वाटलें. त्या रागांत तो सॅन्डहर्स्ट ब्रिजवरून जोरांत चालत पलीकडे गेला. तुरुंगांत जाण्यास साधासीधा अहिंसात्मक मार्ग नाहींच असें त्याच्या विटलेल्या मनानें घेतलें. चालतां चालतां एके ठिकाणीं तो थबकला; घराचें एक बांधकाम चालू होतें, त्याला गोणपाटाची लुंगी गुंडाळली होती. जवळच विटांचा ढीग पडला होता. गुणाजीनें बुटाचा बंद बांधतां बांधतां एक चांगली अर्धी वीट उचलली. चारच पावलांवर एका 'फेन्सी' कापडाच्या दुकानाला पुरुषभर उंचीच्या कांचा बसवल्या होत्या, आंत एका मेणाच्या बाहुलीला सात रंगांचें पातळ नेसवलें होतें, नी भोंवतालीं सात रंगांचे दिवेही लावले होते. गुणाजीनें चांगली दोन-तीन पावलांची धाव घेऊन ती अर्धी वीट त्या कांचेवर भिरकावली व खिशांत हात घालून तो तेथेंच तिष्ठत उभा राहिला.

रस्त्यावरची रहदारी तेव्हां थोडी मंदच होती. ऐन वेळेला गुणाजी-कडे असें कुणाचेंच लक्ष नव्हतें. कांच फुटल्याचा आवाज झाला म्हणून ज्यांनीं तिकडे पाहिलें, त्यांना फुटलेली कांच नि तिच्यापुढें खिशांत हात घालून इकडे तिकडे पाहणारा एक मनुष्य एवढेंच दिसलें होतें. पण लवकरच माणसें गोळा होऊं लागलीं, कुठूनसा एक पोलिसही आला, 'कुठं गेला तो इसम कांच फोडून?' त्यानें विचारलें.

'वा हवालदारसाहेब, मीच नव्हे का तो?' गुणाजी अदबीनें हंसून म्हणाला, त्याच्या मागून 'वा भै वा!' म्हणून एक वाणी खेंका-

ळला आणि भोंवतालचे लोक हसले. पोलिस शिपायाच्या एकदां डोक्यांत आलें कीं, कदाचित् दुकानाच्या आंतूनच कोणी कांच फोडली असेल—हे व्यापारी काय करतील याचा नेम नाहीं, प्रापरटीला आग लावून इम्याचे पैसे मिळवतात, तसाच या दुकानदाराला पण झाला असेल मोह कांच फोडून एक पन्नास रुपये उभे करायचा.

तितक्यांत पॉवेलपुढच्या ठाण्यावरून एकोणीस नंबरची ट्रॅम निघत होती ती पकडायला एक मियाभाई धावत गेला, पोलीसचें एकाएकीं तिकडे लक्ष जाऊन तो पाठलागाला निघाला. गुणाजी निराश चेहऱ्यानें हळूहळू उत्तरेकडे वळून लॅमिंग्टनरोडनें वाय्. एम्. सी. ए. कडे चालूं लागला. पर्शियन इंडियनपलीकडच्या सिनेमाच्या झगझगाटानें क्षणभर त्याला चक्कर आल्यासारखें झालें. तो रस्ता ओलांडून पर्शियनइंडियन-मध्येंच शिरला. पार्टिशनच्या आड, एका टेबलाजवळ बसून त्यानें पंखा, पाणी पेपर आणि माचीस ही ऑर्डर एकदम दिली. मग छोकऱ्याला काय काय आहे तें विचारून अर्धा तास एकाग्रतेनें सुमारें दीड रुपयाचा माल खाऊन एक ' कोरोना ' पेटवला.

नंतर त्यानें मालकास बोलावून पोलिसाच्या स्वाधीन होण्याची तयारी दर्शविली.

" तुम्हारे लिये पुलीस ? " इराणी ओरडला, " अस्पंदियर, ओ अस्पंदियर—"

भटारखान्यांतून एक राकट लाल खवीस बाहेर आला. गेल्याच सालीं तो कास्पिनच्या कांठीं गाढवें वळीत होता. त्यानें गुणाजीला उचलून पर्शियन-इंडियनच्या मागच्या फाटकावरून बाहेर फेकलें. विठ्ठलभाई पटेल

रस्ता एकदम उठून गुणाजीला भेटावयाला आला. तथापि गुणाजी एका खडीच्या ढिगावर पडला, त्याला लागलें, पण विशेषसें नाहीं; शिक्षा देण्यासाठीं परमेश्वरानें शरीराच्या ज्या भागाला खास सोय केलेली आहे त्याच भागावर तो आपटला होता.

इन्द्रधनुष्यासारखा तुरुंगदेखील मागें लागलें कीं दूर धावतों असें गुणाजीला वाटूं लागलें.

( चौपाटीच्या बाकावर बसून इन्द्रधनुष्य कुलाब्याच्या दांडीला टेकल्यासारखें एकदां त्याला दिसलें; पण मुद्दाम जाऊन पाहिल्यानंतर तेंच घारापुरीपर्यंत मागें गेल्याचेंही त्याला आढळलें होतें—चौपाटीच्या बाकावर राहणारांना हे उद्योग करतां येतात. ) जवळच एक पोलीस पानवाल्याच्या कंदिलावर विडी पेटवीत होता, तो पडलेल्या गुणाजीकडे पाहून नुसता हंसला नि चालूं लागला.

गुणाजीनें उठून कपडे झटकले- अणकुचीदार खडीच्या दगडांनीं त्याला इरेस पेटविलें होतें. वाटेल तो गुन्हा करीन, पण या रात्रीं जेल गांठीन, अशी भीष्मप्रतिज्ञा त्यानें मनांतल्या मनांत केली. विठ्ठलभाई पटेल रोडचा शांत अंधार सोडून त्यानें चकाकणारा लॅमिंग्टन रोड पकडला. इंपीरियल सिनेमासमोर थॉमस फोटोग्राफरच्या दुकानाला शेंकडों फोटोंची आरास केली होती. ती आरास पाहत एक तरुण बाई उभी होती. दूर पॅथे सिनेमाच्या तोंडाशीं दोन पोलिसांत हास्यविनोद चालला होता. गुणाजीला आपली सोनेरी संधि मूर्तिमंत दिसली. बाईची खोडी काढून तिनें आरडाओरडा केल्यावर मग, पोलीस आपल्याला झक मारीत अटक करील ही त्याची खात्री होती. त्यानें

केसांवरून हात फिरवला. टायचें फूल सरळ बसवलें, कोट साफसूफ केला. पायाच्या बोटांनीं बुटाच्या तळांची चांगली भक्कम पकड घेतली व एकेकाळच्या मॅक्लौच साहेबाच्या ' वर्स्टेड ग्रे ' पाटलोणींत हात घालून ' चलग पोरी वनामधीं ' ही शीळ घालीत गुणाजी त्या बाईजवळ चार हातांवर उभा राहिला.

थोरामोठ्यांच्या बायांसारखा त्या बाईनें पोषाक केला होता. केस व्यवस्थित वळवून मागें एक शेपट्याचें कांडें सोडलेलें, पावडर रूज-लिपस्टिक सगळें कांहीं ठाकठीक, कानांत इयररिंग्ज, गळ्यांत चेन, हातांत बारीक घड्याळ, दुसऱ्या हातांत सगळ्या बांगड्या, बगलेंत मोठी बॅग हा जामानिमा—खूप टिकल्या लावलेली एक निळी रेशमी साडी ती बाई नेसली होती; अंगांत बिनबाह्यांचा ब्लाउज, पायांत उंच टाचांच्या सँडल्स होत्या. दुकानाच्या कांचेमागचे फोटो ती बाई अगदीं न्याहाळून पाहत होती. गुणाजी जवळ गेला तशी ती फोटो पाहण्यांत फारच गर्क झाली. तिच्यावर गुणाजीनें तिरकस नजरेनें सारखे कटाक्ष टाकण्यास सुरुवात केली. ' चलग पोरी ' बदलून ' तुम्हिने मुझको ' 'यमुनाजळीं' 'मनसाफ तेरा' वगैरे चाली लावून शीळ वाज-वली, ' शहेरका साला ' आणि ' जन्टलमन जम्बो ' या बोलपटांतील हीरोच्या पवित्र्यांत उभा राहून पाहिलें. तो दोनतीनदां हलकेच खांकरला, ' हलो—कमिंग ? ' ' लव्ही डव्ही ' वगैरे शब्दांनींही त्यानें चुचकारून पाहिलें, डोळे मोठे करून मिचकावले.

त्या बाईनें तो तेथें आहे याची ओळखही दिली नाहीं. तिच्या कपाळाला आठी पडली नाहीं, तिनें वळून दुसरीकडे पाहिलें नाहीं किंवा तिचें लक्ष समोरच्या फोटोवरून बाजूला झाल्याचें दिसलें नाहीं;

गुणाजीच्या मागें वाय्. एम्. सी ए. च्या कोपऱ्यावर एक पोलीस या सर्व प्रकाराकडे लक्षपूर्वक पाहत होता. थोडा वेळानें ती बाई थॉमसच्या दुकानापुढून निघून पंधरावीस पावलांवर जाऊन एका दुकानांत मांडलेल्या रेडिओकडे पाहत उभी राहिली. थोड्याच वेळांत गुणाजीही तिच्या जवळपास दाखल झाला. दरम्यान त्याच्यावर नजर ठेवणाऱ्या पोलिसाला कांहीं तरी अधिक निकडीचें काम आठवून तो छत्री खांद्यावर टाकून प्रार्थना समाजाच्या दिशेला रवाना झाला होता.

रेडिओच्या दुकानापुढें त्या बाईच्या अगदीं शेजारीं जाऊन गुणाजीनें धीटपणें विचारलें,

" क्यौं, चलोगी ? " इतकें बोलून तो जवळ जवळ डोळे मिटूनच तिच्या किंकाळीची वाट पाहत उभा राहिला.

" अरे क्यूं नही चलूंगी ? मैं तुम्हारेही बातकी राह देखती थी साजन ! मैं खुदभी बोलती—मगर वो खडा था न शयतान—पुलीस ? चल, बुलाव गडिया'—म्हणून त्या बाईनें कुठल्याही कव्हरला चालेल असें हांसूं गुणाजीकडे रोखून त्याच्या कोपरावर बोटें ठेवलीं.

एकाद्या वैभवशाली रंगमहालांतील रत्नखचित पात्रांत चिडून थुंकावें, आणि तें पात्र तस्तच निघावें तसें गुणाजीला झालें. तुकारामबुवांना लाथा मारल्यावर त्यांनींच ' पाय दुखले का ' म्हणून ते प्रेमानें चेपूं लागावे, या अनुभवानें मंबाजीनें जो चेहरा केला असेल तो करून, गुणाजी त्या बाईच्या लटांबरासह लॅमिंग्टन रोड ओलांडूं लागला. पाथे सिनेमाच्या तोंडाशीं ते दोघे पोलीस अजूनही हास्यविनोदांत गर्क होते,

त्यांच्याच सावलीला त्या बाईला गुणाजीनें उभी केली, व ' नोटेची मोड घेतो ' म्हणून तो चाफेकर दुग्धमंदिरांत शिरला.

त्यानंतर त्या बाईला तो पुन्हा दिसला नाहीं. क्षणाच्या सखीला अनंत कालाची माता होण्याची गुणाजीनें थोडी देखील संधि दिलीं नाहीं. तो दुग्धमंदिराच्या पुढच्या दारानें प्रवेश करून मागच्या दारानें चालता झाला. वेस्ट एण्डच्या उत्तरेकडच्या बोळांतून गिरगांव पोलीस कोर्टापाशीं आला, व तेथून पळतपळत त्यानें सॅन्ढर्स्टरोड—नवलकर लेन—बॅक रोड—सदाशिव गल्ली, फणसवाडी—ठाकुरद्वार—गिरगांव रस्ता ही चक्कर पुरी केली. थोडी पावसाचीही सर होती, आणि लोकांचे लक्ष ओढून न घेतां पळायची कलाही गुणाजीला अवगत होती. तो मॅजेस्टिक सिनेमापुढें थोडी उसंत घ्यायला थांबला. नाक्यावर नेहमींप्रमाणें एकदोन पोलीस होते.

गुणाजी सेंट्रल सिनेमासमोर उजेडांत जाऊन उभा राहिला, आणि त्यानें कसलेंसे लांबलचक सूत्र उच्चारून चांगला अर्धें मिनिटपावेतों कर्कश शंखध्वनि केला. नंतर गाणीं, हिंदी—मराठी—इंग्रजी संवाद, वगैरे गुंतागुंतीचा कार्यक्रम त्यानें चढत्या आवाजांत सुरू केला. तो वेडेवांकडे हातवारे करून उड्या मारूं लागला—मधूनमधून अनेक भाषांतील शिव्यांचीही चौफेर खैरात करायला तो विसरला नाहीं. पोर्तुगीज चर्चच्या कोपऱ्यावर उभ्या असलेल्या पोलिसाकडे दुसरा पोलीस गेला " काय नाइक, है काय ? "

" काय नाय, स्टूडंट असेल कुणी, कुणाचं लक्ष जाऊन शिनिमांत कामिक मिळालं तर पाहात असेल. जाऊं द्या—" गुणाजीच्या कार्यक्रमा-कडे पाठ फिरवून दोघां पोलिसांनीं भटवाडींत एकादी आकडा केस पकडायची भाषा सुरू केली.

गुणाजीला वाटायला लागलें कीं आपल्याला कुणी करणी केली आहे, म्हणून आज कांहीं केल्या पोलीस पकडीत नाहीं. आपल्याला जेलखान्यांत जाऊं द्यायचं नाहीं असा साऱ्या दुनियेनं कट केला असावा ही धास्ती त्याला पडली, त्याला कांहीं सुचेनासें झालें. तो पुन्हा निघाला.

ठाकुरद्वारकडे विमनस्कपणें चालतांना तो वेलणकरांच्या दुकानापुढून जात होता. दुकानांत काउंटरपाशीं एक वजनदार गृहस्थ सिगारेट पेटवीत उभे होते; उंची काश्मिरी टोपी, स्वच्छ सफेद लाँग कोट व त्याला सोन्याची बटणें, तलम धोतर व काळा चकचकीत स्लीपर या पोषाखाला साजेशीच त्याची छत्री होती; भारी हिरव्या रेशमाची, तिला छानदार लांकडी मूठ नि गोंडा; आणि ती गुंडाळलेली होती इतक्या रुबाबांत, कीं बंद छत्रीसुद्धां फिरायला घेऊन जावी असें वाटायचें. ती छत्री दुकानाच्या चौकटीला बाहेरच्याच कोपऱ्यांत त्या गृहस्थानें टेकून ठेवली होती, आणि तो सिगारेट पेटवीत होता. गुणाजीनें ती छत्री उचलून घेतली व निगरगट्टपणें त्या मालकाकडे पाहत तो फुटपाथवर उभा राहिला. तो छत्रीचा मालक त्याच्याकडे पाहत दुकानाच्या पायऱ्या उतरला, तसा गुणाजी धोबीतलावाच्या दिशेला तोंड करून हळूहळू चालूं लागला. त्या गृहस्थानें मागून येऊन छत्रीला हात हातला,

" माझी छत्री—" तो गुरगुरला.

" मग ? आम्हीं घेतली ती—बोलवा पोलीसला—बोलवा ना ? " गुणाजी लोचट मगरूरीनें म्हणाला.

" छे—छे ! " तो गृहस्थ थांबून हळू बोलायला लागला, " म्हणजे—तुमची असली तर—मला वाटलं—होते कधीं अशी चूक—"

" आतां कां? बोलवा ना पोलिसाला? होऊं द्या आम्हांला अटक!"

" पोलीस कोण म्हणालं? तुम्हीच म्हणतां आहांत. मी म्हणतों, सारख्यासारख्या छत्र्या असतात, अदलाबदल होते एकादे वेळीं; तुमची छत्री असली तर माझं कांहीं म्हणणं नाहीं—"

असे पुटपुटत तो गृहस्थ ओशाळ्या चेहऱ्यानें तेथून सटकला. कांदेवाडीच्या नाक्यावरचा पोलीस–जो पकडील या आशेनें गुणाजीनें युद्धक्षेत्र या बाजूस सरकवीत आणलें होतें तो एका घोडागाडीवाल्याला सटकावीत होता आणि तो गाडीवाला थंडपणें घोड्यापुढें गवत टाकीत होता.

ज्या रस्त्यावरून आपल्याला जेलचा आसरा नाहीं त्या रस्त्याकडे पाठ फिरवुन आणि एक बिलकुल नको असलेली छत्री हातात धरून गुणाजी कांदेवाडीच्या रस्त्यानें निघाला. हातांतली छत्री लवकरच त्यानें एका बोळांत फेकून दिली, व तो चालत राहिला. एका कोपऱ्यावर एक वडाचें झाड नि त्याच्याखालीं एक लहानसें देऊळ होते. त्या देवळापुढें कांहीं भाविक मंडळी भजन करीत होती. दुरून त्या भजनाचा आवाज जिवाला मोठा विसांवा देत होता. ढगांआडून चंद्र मंद प्रकाश देत होता ' हवाई हल्ला-बचाव' हुकमामुळें दिवेही घुंगट घेऊन उभे होते. मृदंगाच्या तालावर टाळ झडत होते. 'रूप पाहतां लोचनी, सुख झालें हो साजणी ' ला सुरुवात झाली होती. रस्ते शांत होते. गुणाजीला लहानपणच्या खेड्यांतल्या देवळाची आठवण झाली. त्याच्याही आयुष्यांत आई, देव, लिहिणंवाचणं, स्वच्छ कपडे, या गोष्टी मागें कधींतरी होऊन गेल्या होत्या. त्या भजनाच्या शुद्धस्वरानें गुणाजी तुरुंगाचा ध्यास क्षणभर विसरून गेला. नुसतें पाल्यापाचोळ्यासारखें जिणें आपण इतक्या दिवस काढलें असें

त्याला वाटूं लागलें. आपण बरोबरीच्या माणसांतून अगदीं खोल कुठें तरी जाऊन पडलों आहोंत, आपल्याला हीन दशा आली, आपल्या वासना हलक्या प्रतीच्या, आशा मेलेल्या आणि मनांत नेहमीं कांहीं तरी खराब विचार एवढीच आपली किंमत, हें गुणाजीला खाऊं लागलें.

तें कांहीं नाहीं, उद्यांपासून कांहीं तरी धडपड सुरू करायची, माणूस म्हणून मान वर ठेवतां येईल अशी कांहीं खटपट करायची, गटारांतून उठून रस्त्यावरून चालायला लागायचें, कांहीं आड आलें तर झुंज द्यायची. अजूनही वेळ गेलेली नाहीं, पुरुषाला शोभेल असें राहायला पाहिजे, जें कांहीं करायला आपण दहा वर्षांपूर्वीं झटत होतो तें अजूनही करून दाखवायचें; तो पाववाला इराणी एकदां नोकरी देऊं करीत होता, त्याला जाऊन भेटायचें, भटाऱ्याची बैलगाडी वीस रुपये महिन्यावर हांकण्याची नोकरी मिळाली, तर मग काय विचारा-यलाच नको,

असे उत्साही उद्योगप्रेरक आणि उन्नतिशील विचार गुणाजीच्या डोक्याभोंवतीं एक दिव्य तेजोवलय निर्माण करीत होतें. भजनाला रंग भरूं लागला होता,

तो हा विठ्ठल बरवा । तो हा माधव बरवा—

गुणाजीनें ठरवलें कीं बस्स, याच क्षणाला याच देवाची शपथ घेऊन सुधारलेल्या जीवनाला सुरवात करायची. ‘ जय विठाईमाउली—’

इतक्यांत त्याच्या खांद्यावर कुणी तरी हात ठेवला.

“ काय रे काय करतो आहेस ? ” हात ठेवणाऱ्या पोलिसानें गुणाजीला पुसलें.

" कांहीं नाहीं, " गुणाजी उत्तरला.

" धंदा काय तुझा ? कुठें राहतोस ? बेट्या हो, रस्ते काय तुमच्या बापाचे हैत ? चल माझ्याबरोबर—"

× × × ×

" तीन महिने कैद. " मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं सजा सांगितली. गुणाजी जांभई देऊन दोन पोलिसांच्यामधें डोंगरीकडे वळला.

---

# सखू नि साळू २.

मयेकराच्या चाळीचा मालक मोठा उदार मनाचा माणूस! सोयवाडी नाक्यावरच्या आपल्या "नंबर–टेकर बिल्डिंग" मध्यें येणारा भाडुत भट आहे का शेणवी आहे, पळशी का पांचकळशी, भंडारी का सोनार, पाताणा, लोहाणा का कुणबी या चौकशा तो करीत नसे. 'चाळ' या नियमानें पैसे प्रसवणाऱ्या वस्तूला साधारणपणें आगबीग लावून देणार नाहीं, इतपत गुणाचा कसलाहि भाडेकरी त्याला चालत असे—महिन्यांतून केव्हांतरी भाडें देणारा तो असला म्हणजे झालें.

म्हणूनच, पांढरपेशाची सखू नि अडाण्याची साळू दोघी एका चाळींत आल्या होत्या. तशी त्यांची लहानपणचीच ओळख; पालव रोड, मराठी शाळा नंबर १८७ मध्यें त्या सहावीपर्यंत बरोबर होत्या. पुढें साळूचें लगीन झालें, सखू व्ह. फा. व ट्रेनिंगचीं तीन वर्षे करून मास्तरीण होते तोंच सुरेशराव सुखात्म्यांशीं तिचेंहि लगीन झालें. आतां अचानक दोघींचीं बिऱ्हाडें एका चाळींत वर-खालीं आलीं होतीं. पहिल्या माळ्यावर नंबर ७१ मध्यें सुखात्म्याचें बिऱ्हाड होतें, आणि त्याच्याच खालीं तळमजल्याला नंबर ३६ मध्यें साळूचा नवरा संभू सदाफुले राहत होता. चाळीच्या प्रेमळ मालकानें अशी व्यवस्था केली होती कीं

बिऱ्हाडकऱ्यांना बसल्याबसल्या शेजारच्याच नव्हे तर वरच्याखालच्या बिऱ्हाडांशीं देखील दळणवळण ठेवतां यावें. जरा ओरडून बोललें तर विचारपूसहि करतां येत असे—याप्रमाणें सखूची जमीन व साळूचें आढें एक असल्यामुळें मैत्रिणींची फारच सोय झाली होती.

आज तिन्हीसांजची सखू खालीं मैत्रिणीच्या बिऱ्हाडांत आली होती. साळू आरशांत पाहून डाव्या डोळ्याभोंवतीं हळदगुळाचा लेप लावीत होती.

"पाहिलंस कशीं पांची बोटं उठवलीं आहेन् तीं!" साळू अभिमानानें म्हणाली. तिच्या गालावर तीन काळे-निळे पट्टे उठले होते, डोळा सुजून मिटला होता, नि भुंवईवर अंगठी लागून जखम झाली होती.

"नि हें बघ गळ्यावर," एखादा नवीन दागिना दाखविण्याच्या ऐटींत गळ्यावरच्या माराच्या खुणा साळूनें दाखवल्या.

"छे बाई! हे नाहीं हो कधीं माझ्या अंगावर हात टाकायचे!" मनांतला हेवा आवाजांत न येऊं देतां सखू म्हणाली.

"जा बया, आठा दिवसाला एकदां तरी मारीत नाहीं तो घरधनी कसचा?" साळू उद्‌गारली. तिनें गळ्याजवळची गुंडी सोडून चोळी सैल केली व पाठीवरचा वळ सखूला दाखवला.

"आई-आई! आमच्या इथं कधीं नाहीं हो असा रासवटपणा करायचे!"

"रासवटपणा म्हण किंवा कांहीं म्हण, ज्याचं आपल्या बायकोकडे लक्ष असेल तोच तिला मारील!"

"ह्यांचं कांहीं माझ्याकडे लक्ष नाहीं कीं काय? पण असा अघोरी-पणा नाहीं बाई करायचे हे कधीं."

"तुझे सुरेशराव कसचा अघोरीपणा करणार? जेवण झाल्यावर चष्मा लावून वाचीत बसून राहणारा गरीब माणूस तो! कधीं मारायचाही नाहीं नि कधीं पस्तावून कांहीं आणूनही द्यायचा नाहीं. आतां माझ्या घरधन्यानं इतकं मारलंन् ना? रात्रीं बघ काय काय घेऊन येतो माझ्यासाठीं तो—वेण्या आणील, कपडा आणील, कुठं घेऊन जाईल—आत्तां येईल तेव्हां बघ गंमत."

सखूनें सारें ढोंग सोडून देऊन विचारलें, "कां ग, लागत नाहीं का इतकं मारतो तें?"

"लागत नाहीं तर काय? हें काल मारलंन तेव्हां जिन्यावरनं खालीं धडपडत गेल्यासारखी कळवळलें; पण त्याच्या बदला आज येतांना जरीचं पातळ तरी घेऊन येतील. एक दिवस मार आणि आठ दिवस मनधरणी याची संवयच आहे मला-मला आवडतं तसं."

"का ग, पण कां मारतो तुला तुझा नवरा इतकं?"

"कां? 'तयार' होऊन आलेला असतो नि मी समोरच दिसते—मारील नाहीं तर काय करील?"

"पण कांहीं कारण नसतांना?"

"कारण? मी त्याची कारभारीण आहें नव्हं का? मला न मारतां बघू दे दुसऱ्या कुणा सटवीला मारतो आहे तो! उगीच नाहीं मारून घेत मी? मारही खाते आणि त्याच्याकडून भरपाईही करून घेतें चांगली."

"आमच्या इथं हे कधीं माझ्या अंगावर ओरडत देखील नाहींत."

"म्हणूनच तूं अशी लंकेची पार्वती. चार दणके देईल तोच नवरा दोन दागिनेही घालील!"

इतक्यांत संभू बाहेरून आला. त्यानें बरीच मोठी खरेदी करून आणली होती. कांहीं कोऱ्या कापडांच्या घड्या, कांहीं लहान–मोठ्या कागदी पेट्या नि कांहीं पुडे; खजीलपणाची अजीजी त्याच्या चेहऱ्यावर होती. त्याला पाहून साळूचा शाबूद डोळा एखाद्या नक्षत्रासारखा चमकूं लागला. तिच्या उजळ्या गालावर खुषीचें हंसूं रुंदावलें.

"इतक्या लवकर आलासा ?" तिनें मंजूळपणें विचारलें.

"हां-हां, हें बघ काय काय आनूलया–काय वयनी, सुरेशराव आले न्हाईत वाटतं!" संभू सखुकडे पाहून म्हणाला.

'झाली आतां यायची वेळ, मी चाललेंच. जातें ग साळू.' म्हणून सखू वर आपल्या बिऱ्हाडीं आली.

आपला नवरा सौम्य आहे, सात्त्विक आहे, सभ्य आहे, अशी अनेक रीतींनीं सखू स्वतःच्या मनाची समजूत करीत होती, पण 'जेवण झाल्यावर चष्मा लावून वाचीत बसणारा एक गरीब माणूस' हें मैत्रिणीनें केलेलें नवऱ्याचें वर्णन तिला जितकें खरें तितकेंच संतापकारक वाटूं लागलें होतें. ज्या सुरेशरावांच्या सालस स्वभावाबद्दल तिला आजवर इतका अभिमान वाटत होता, त्याच्याचबद्दल तिला आतां एक प्रकारची चीड वाटूं लागली. दिवसांमागून दिवस संध्याकाळचें जेवण झाल्यावर, चष्मा लावून वर्तमानपत्र वाचण्यापलीकडे खळबळ उडविणारा दुसरा कोणताही कार्यक्रम न करणाऱ्या आपल्या आदर्श नवऱ्याच्या सौजन्याचा तिला एकाएकीं कंटाळा वाटूं लागला. साळूचा संभू मात्र तिला मारतो, सुरेशराव आपल्याला कधीं दरडावीतसुद्धां नाहींत; एक दिवस बेदम चोप खाऊन आठ दिवस नानाप्रकारची मनधरणी करून घेण्याचें भाग्य

साळूला तेवढें आहे, आणि आपण मात्र 'चांगुलपणा'च्या चाकोरींतूनच 'विठ्ठल विठ्ठल' करीत जात आहोंत या जाणिवेनें सखूला मनस्वी वीट आला. ती उशींत डोकें खुपसून थोडीशी रडली देखील.

नेहमींच्या वेळीं गंभीर मुद्रेनें सुरेशराव घरीं आले. त्यांनीं आपले स्लिपर पुसून दारामागच्या खिळ्यांवर अडकवून ठेवले. बाहेरचे कपडे बदलून घरांतले कपडे घातले, नंतर ते जेवायला बसले. एखाद्या पदार्थाबद्दल तरी ते तक्रार करतील अशी सखूला आशा वाटत होती, पण सुरेशराव समोर पाहून संतुष्टपणें जेवत होते.

"'चांगला झालाय कां स्वैपाक?" सखूनें तिरकस नजरेनें त्यांच्याकडे पाहत विचारलें. सुरेशरावांनीं परत तिच्याकडे पाहिलें देखील नाहीं, ते खाण्यांत गुंतले होते.

"म्यं–म्यं–म्यं–अं–अं–ठीक आहे कीं–" त्यांनीं अभिप्राय दिला. लवकरच जेवण उरकून त्यांनीं चष्मा व वर्तमानपत्र काढलें आणि नेहमींप्रमाणें झोप येईपर्यंत ते खुर्चीवर वाचीत बसले. तरुण वयाच्या मानानें त्यांच्या अंगीं फारच स्पृहणीय गांभीर्य होतें, त्याचप्रमाणें संतोषी वृत्तीही; संसारांत तक्रार करायला त्यांना कांहीं जागा दिसत नव्हती.

ते याप्रमाणें खुर्चीं उबवीत बसले असतां सखूनें दोनतीनदां त्यांच्याकडे भेदक नजरेनें पाहिलें, पण तें सुरेशरावांच्या गांवींही नव्हतें....

× × × ×

दुसऱ्या दिवशीं नारळीपौर्णिमेची सुट्टी होती. जेवणें होतांच साळू वर आली व मोठ्या हुरूपानें आपला सण साजरा करण्याचा कार्यक्रम तिनें सखूला सांगितला. आदल्या रात्रीं संभूनें आणलेलें नवें जरीचें

पातळ नेसून, दोन रुपये तोळा सोन्याचे नवे दागिने घालून, ती संभूबरोबर पहिल्यानें समुद्रावर व नंतर सिनेमाला जाणार होती, चौपाटीवर तीं दोघें शहाळीं खाणार होतीं, 'बशी'मधून मुंबईभर फिरणार होतीं, सिनेमा झाल्यावर आइस्क्रीम खाऊन घोडागाडीनें परत येणार होतीं.

"हें सारं परवांच्या मारापोटीं—" गुदगुल्या होत असलेल्या आवाजांत साळू सखूला म्हणाली, नि हर्षानें गाणें गुणगुणत परत खालीं निघून गेली.

सखूच्या घरीं एकदां जेवणें झाल्यानंतर सणाचें विशेषसें वातावरण उरलें नव्हतें. ओल्या नारळाच्या करंज्यांचा स्वयंपाक यथास्थित जेवून सुरेशराव आपल्या नेहमींच्या जागीं वाचीत बसले होते. सखूनें बरेच दिवसांचीं सांचलेलीं भांडीं घासायला गोळा केलीं होतीं, व दोन बादल्या भरून पाणी, काथ्या, माती, विटकर, चिंच असा सगळा सरंजाम मोरीवर मांडून ठेवला होता.

नवऱ्याकडे एकच कटु कटाक्ष टाकून सखू भांड्यांकडे वळली—तोंच खालून साळूच्या हसण्याची एक लकेर ऐकूं आली. न मारणाऱ्या नवऱ्यावरून ती आपल्याला जशी कांहीं हिणवतेच आहे असा सखूला भास झाला. त्या हास्याच्या अकल्पित हेटाळणीनें सखूच्या अंगाचा एकाएकीं भडका झाला. ऐदी आरामांत चष्मा लावून वर्तमानपत्र वाचीत बसलेल्या सुरेशरावांवर ती एखाद्या वाघिणीसारखी चवताळून गेली.

"सुस्त, खादाडखाऊसारखे लोळतां आहांत काय नुसते? तुमच्या-साठीं कष्ट करून भांडीं घासून नि धुणीं बडवून माझा जीव चाललाय.

तुम्हांला डुकरासारखं पडून राहायला लाज नाहीं वाटत? नवरा आहांत का आहांत कोण?"

सुरेशराव वर्तमानपत्र टाकून चष्मा पुशीत तिच्याकडे पाहूं लागले, आपलें आव्हान हा मनुष्य स्वीकारतो कीं नाहीं हें पाहण्याची सखुची उत्कटता इतकी अनावर झाली कीं त्याला आणखी चेतवण्यासाठीं तिनें दाणकन् त्याच्या पाठींत बुक्का मारला. त्या क्षणालाच पतीबद्दल अननुभूत प्रेमाच्या उर्मी तिच्या हृदयांत उसळूं लागल्या. 'आतां जर ह्यांनीं एक तडाखा देऊन आपल्याला लोळवलं तर आपल्या जन्माचं सार्थक होईल' असं तिला वाटत होतं.

सुरेशराव खुर्चीतून उठले. काय करायचें तें त्यांनीं लवकर करावें म्हणून सखूनें डोळे मिटून बेछूटपणें त्यांना आणखी एक ठोसा मारला. आणि नवऱ्याच्या माराची तळमळीनें, आशाळभूतपणें वाट पाहत, मनांतल्या मनांत जवळजवळ शिक्षेची याचनाच करीत ती उभी राहिली.

खालच्या बिऱ्हाडांत संभू साळूचा डोळा कुरवाळीत त्याच्यावर फुंकर घालीत होता. एकाएकीं वरच्या माळ्यावरून एक किंकाळी ऐकूं आली, अस्पष्ट शब्द आले, खुर्ची पडल्याचा आवाज आला, धडधड पावलें वाजलीं.

"आं!" संभू आश्चर्यानें म्हणाला, "आज सुरेशराव नि वयनींनीं सुरू केलं कीं काय? मला नव्हतं माहिती कीं हेबी असं करत्यात म्हणून! वर जाऊन पाहूं कीं काय-काय करत्याती ते?"

"दमा, तुम्ही नका-मीच जातें." साळू म्हणाली व खूष चेहऱ्यानें तिनें वर धूम ठोकली.

सुखात्म्यांच्या दारांत साळू पोंहोचते तोंच सखू मुसमुसत बाहेर आली आणि मैत्रिणीच्या गळ्याला मिठी मारून स्फुंदून स्फुंदून रडूं लागली.

साळुनें तिच्या पाठीवरून हात फिरविला. तिची हनुवटी धरून तोंड वर केलें नि विचारलें,

" कुठं मारलं ग ? कुठं लागलं ! काय केलं तुला त्यांनीं ? कुठं गेले सुरेशराव ? "

सखूनें एकच हंबरडा फोडून साळूच्या खांद्यावर मान टाकली,

" जळ्ळं मेल्याचं लक्षण ग !—तिकडे–आंत सैंपाकघरांत आहे–कसं सांगूं तुला–बोलूं नकोस कुणाजवळ–मला हात देखील लावला नाहीं त्यानं; निमूटपणें आंत गेला—

नि भांडीं घाशीत बसला आहे—मेषपात्र मेला !........"

# ३. औलिया आणि ऊदमांजर

"जे कां रंजले गांजले" अशांना आपुलकीनें मदत करण्या-बद्दल गांवांत त्याची प्रसिद्धी होती. त्याच्या सद्हेतूबद्दल एकाद्या सावकारानें देखील शंका घेतली नसती. त्याच्या साधुवृत्तीची ख्याति सर्वत्र झाली होती—इतकी कीं, संकटांत सांपडलेले लोक त्याच्या घरीं बोलावणीं पाठवूं लागले होते. शिरजोर बदमाषांना वठणीवर आणणें, दुबळ्यांची कड घेऊन भांडणें, चुकलेल्या वासरांना सुरक्षितपणें गोठ्यांत पोंहोचविणें, इत्यादि लोकोपयोगीं कामांनीं तो एक एकमाणशी संस्थाच झाला होता जणूं.

एकदां कुठल्याशा संघाची सभा बरीच उशिरापर्यंत चालून रात्रीं साडेबाराला संपली. जिना उतरून रस्त्यावर येणाऱ्या सदस्यांत आमचा समाजसेवकहि होता. एकाच दिशेला घरें असणारांचें एक लहानसें टोळकें सावकाशपणें रस्ता चालूं लागलें. रस्त्यावर पलीकडच्या बाजूस अंधारा-अंधारांतून कोणीसें जात होतें; तें माणूस थबकायचें, वळून पाहायचें, मध्येंच बोळांत शिरून दृष्टीआड व्हायचें, पुन्हा रस्त्यावर येऊन चालल्यासारखें करायचें–थांबायचें.

समाजसेवकाचें त्या माणसावर बारकाईनें लक्ष होतें; ‘ माणूस ’ या नपुंसकलिंगी कोटींतून ‘ बाई ’ या निश्चित् वर्गांत ती आकृति आणून ठेवण्यास त्याला वेळ लागला नाहीं. लपत-छपत जाणारी ती बाई संकटांत असली पाहिजे हें त्याच्या कुशाग्र बुद्धीला जाणवलें, व आपली टोळी सोडून ती धीम्या पावलांनीं त्या रहस्यमय बाईकडे निघाला.

त्याच सुमारास रस्त्यावरच्या एका घराची कडी आंतून निघाली; पुढील दारीं मुखत्यार वकिली व मागील दारीं लांकडाची वखार असा जोडधंदा करणारा त्या घराचा रहिवासी निर्विकार मुद्रेनें रस्त्यावर आला.

बाईजवळ पोंहोचतांच समाजसेवक अदबीनें म्हणाला, “ बाई, रस्ताबिस्ता चुकला का तुमचा ? ” त्याचा अभिप्राय हा, कीं चुकला-बिकला असाल किंवा अन्य प्रकारें असहाय अवस्थेंत असलांत तर चला; मी तुम्हांला कुठें तें पोंहोचवतों.

ती बाई कठोर चेहऱ्यानें त्याच्याकडे पाहत कमरेवर हात ठेवून उभी राहिली.

“ कां हो शिष्ट ? तुम्हांलाशी पंचाईत ? ” चाकूनें पत्रा कापल्यासारख्या आवाजांत तिनें विचारलें. समाजसेवक थोडासा फिकाटलाच—

“ नाहीं नाहीं, मला वाटलं एकट्या आहांत, बरोबर सोबत नाहीं कोणी, म्हणून—”

“ म्हणून असें हटकता होय ? संभावित लफंगेच दिसतां मोठे ! ” ती बाई चढ्या स्वरांत म्हणाली.

समाजसेवकामागची सदस्यांची टोळी तो आवाज ऐकून भोंवतालीं गोळा झाली. आणखी कोणी आले; तो वखारवाला मुखत्यार वकील त्यांत होताच.

—" आणि मेले हे धंदे करतात ! " बाई समारोपादाखल म्हणत होती. कोणी तिला सांगूं लागले कीं, " अहो बाई, असं काय करतां ? यांना कोण समजतां ? कित्येक दीनदुबळ्यांना यांनीं मदत केली आहे; हेच ते एकनाथपंत एकबोटे, सुप्रसिद्ध दयाळु पहिलवान–उपकारी औलिया—"

" आणि खुशाल अपरात्रीं एकट्या बाईला हटकतो ! " ती बाई उद्गारली.

कोणी म्हणाला, " त्यांनीं हटकलं नाहीं. अगदीं निष्पाप मनानं, भोळ्या भावानं विचारलं कीं वाट चुकलां आहांत कां म्हणून. "

या वेळीं तो मुखत्यार वकील पुढें आला.

" पण कां म्हणून विचारलं ? व्हॉऽट बिझिनेस ह्याड ही ? छान झाडलात बाई—हे असे रिकामटेकडे लोकच गांवाला उपद्रव करतात–कोणावर तरी कांहीं आळ-किटाळ आणतात—मदत करण्याचा आव आणून गळ्यांत घालणारे लोक हे ! पण—" जमलेल्या लोकांकडे वळून परिणामकारक आवाजांत वखारवाला म्हणाला,

" पण जोंपर्यंत आपण स्वतः पाक आहोंत, तोंपर्यंत कोणाचीहि भीति नसते ! चला—"

गर्दी पांगली. लोक चर्चा करीत आपापल्या रस्त्याला लागले. मुखत्यार वकील त्या बाईशीं बोलत बोलत स्वतःच्या घरापर्यंत आला—

दोघें घरांत शिरलीं, दरवाजा बंद झाला, आंतून कडी लागली.

—आणि समाजसेवक ? चुकलेलें कोकरूं उचलायला जाऊन ऊद-मांजर हातीं आल्यासारखा चेहरा घेऊन बिचारा केव्हांच रात्रींत विलीन झाला !

---

## ४. घड्याळजीची मुलगी

मुंबईहून पुण्याला जाणाऱ्या रात्रीं शेवटच्या दोन पॅसेंजर गाड्या आहेत. या गाड्यांबद्दल अशी आख्यायिका आहे कीं, झोंपून प्रवास करण्यासाठीं त्या फार सोईच्या असतात. आपल्या देशांतल्या इतर अनेक आख्यायिकांप्रमाणें याही बाबतींत लोकांचें अनेक वेळां भ्रमनिरसन झालेलें आहे. झोंपून जाणें दूर राहिलें, पण जेमतेम टेंकायला जागा मिळून लाल डोळ्यांनीं, सुजलेल्या चेहऱ्यानें आणि आंखडलेल्या हाता-पायांनीं उतारू पहाटेच्या प्रसन्न वेळीं कसाबसा पुणें स्टेशनावर उतरतो. तरी पण रात्रीच्या पॅसेंजरनें झोंपून जाण्याविषयीं त्याचे डोळे कधीं पुरे उघडत नाहींत. पुढच्या खेपेला तितक्याच उत्साहानें तो त्या गाडीनें निघतो. आख्यायिकांची हीच गम्मत आहे, त्या खोट्या ठरल्या तरी त्यांच्या वरचा विश्वास सोडून देणें जिवावर येतें. मला वाटतें याच गुणाला श्रद्धा म्हणतात.

गोष्ट निघण्याचें कारण म्हणजे रात्रीं झोंपून जाण्याच्या श्रद्धेनें मी शेवटच्या पॅसेंजरनें पुण्याला जाण्यास निघालों होतों.—आतां या ठिकाणीं मी सेकण्डक्लासच्या बर्थवर पडलों असतां पलीकडच्या बर्थवर पहुडलेल्या एकाद्या युरोपीयन मित्राबरोबर जागतिक महत्त्वाच्या गोष्टींबद्दल चर्चा

करीत होतों आणि त्या चर्चेत सहज विषय निघाला—अशा प्रकारें चालू गोष्टीचा संबंध आणण्याचा मला मोह होत नाहीं असें नाहीं, पण तें कांहीं जुळणार नाहीं, तेव्हां सरळच थर्डक्लासच्या गर्दीत मीही कोंबला गेलों हें सांगून टाकून पुढें जाणें बरें—दाराजवळ येणाऱ्या बांकाच्या कोपऱ्यावर मीं टेकलों होतों; पायांनीं समोरच्या बांकाखालील कोणाच्या तरी ट्रंकेला नेट देऊन, डाव्या बाजूच्या मारवाड्याची डुकली घेणारी मान माझ्या खांद्यावरून मधूनमधून दूर ढकलीत, मींही डोळे मिटून तपश्चर्या करीत होतों. गाडी प्रत्येक स्टेशनाला थांबत होती. प्रत्येक स्टेशनला नवे उतारू आणि आंतले उतारू यांच्या चकमकी, कोठल्या तरी एका पक्षाचा विजय, किंवा कुरकुरत तडजोड होत होती. मीं दाराशीं असून किल्ल्याच्या संरक्षणासाठीं यत्किंचितही शौर्य दाखवीत नाहीं म्हणून आंतील लोकांत कुरबूर होत होती. समोरच्या बांकावर कोपऱ्याकडे झोंपी गेलेला एक साधू निजल्यानिजल्या मला दूषण देत होता. पण बाकीचे ताटकळत बसले असतां कांहीजणांनीं निजावें या विषम समाजरचनेच्या मीं विरुद्ध असल्याचें जाहीर करून ठाणें स्टेशनवर आलेला हल्ला मीं स्वतःच किल्ल्याचा दरवाजा उघडून आंत घेतला. माझ्या या फितुरीबद्दल डब्यांत होणाऱ्या क्षोभाला नवीन आलेल्या मंडळींनीं परस्परच तोंड दिलें. तो एक पांचसहा लहानमोठ्या मण्डळींचा गट होता. त्यांच्याबरोबर ट्रंका, पेट्या, गांठोडीं व पोतीं वगैरे दहाबारा डाग होते. या लोकांच्या आगमनानें डब्यांतील झोंपाळू उतारूंना उठून बसणें प्राप्तच आलें. आडव्याचा जबरदस्तीनें उभा झालेला साधू मला डोळ्यांनीं शापून भस्म करणार कीं काय असें वाटूं लागलें—पण त्याच्या डोळ्यांतली आग गांजाच्या नशेनें जागच्याजागींच थंड होत

होती. दोन बांकाच्या मधल्या बहुतेक जागा व वरच्या फळ्या सामानानें भरून गेल्या होत्या. इतकेंच नव्हे तर दारापुढच्या जागेंत रचलेल्या सामानामुळें दार उघडणेंही अशक्य झालें होतें. गाडीनें ठाणें स्टेशन सोडल्यावर थोड्याच वेळांत कुरकुरणाऱ्या उतारूंनीं प्राक्तनीं आलेलें मान्य केलें, व बसल्याबसल्याच शक्य तो आराम साधण्याच्या उद्योगाला बहुतेकजण लागले. एका बांकाखालील थोड्याशा रिकाम्या जागेच्या बिळांत टोंकाकडून शिरणाऱ्या एका काटक आशावाद्याखेरीज निजण्याची पद्धतशीर खटपट अशी कोणाचीच उरली नव्हती. आतां यानंतर लोक उतरण्याच्या वेळीं होईल तेवढाच काय तो त्रास, असा विचार करून मींहि डोळे मिटले.

कल्याणचें स्टेशन आलें; आमचा डबा अगदीं टोंकाला असल्यामुळें अंधारांतच होता. (टोंकाच्या डब्यांत गर्दी नसते ही आगगाडीच्या प्रवासांतील आणखी एक आख्यायिका आहे, दुर्दैवानें ती बऱ्याच लोकांना माहीत असल्यामुळें गाडीच्या टोंकांनाच अधिक गर्दी असल्याचें आढळून येतें. एकदां माझे एक मित्र या आख्यायिकेवर विसंबून कल्याण स्टेशनवर एंजिनपासून गार्डाच्या डब्यापर्यंत धांवपळ करीत दोन फेऱ्या करून अखेर गाडी सुटण्याचे वेळीं 'आइस व्हेन्डॉर'च्या डब्यांत घुसले. आणि तेथून तरी उठावें लागूं नये म्हणून पुण्यापर्यंतचा प्रवास सहा बाटल्या सोडालेमन पीत पीत एका बर्फाच्या शिळेवर बसून त्यांना करावा लागला.) बराच वेळ आमच्या डब्याकडे कोणी फिरकलें नाहीं. नंतर दोघे तिघे आले, ते दार ढकलण्याची व्यर्थ खटपट करून परत गेले. मीं त्या दाराजवळ मिटलेल्या डोळ्यांनीं 'मानस–झोंप' घेण्याचा प्रयत्न करीत होतो. जेव्हां ऐसपैस पसरून नेहमींची झोंप घेणें

शक्य नसेल, अशा वेळीं डोळे मिटून डोक्यांतले सर्व विचार काढून टाकावे म्हणजे मनाला एक प्रकारची झोंपच मिळतें, असें कोठें तरी लिहिलें आहे. त्याबरोबरच ' रिकामें मन म्हणजे भुताचें धन ' हें लक्ष्यांत ठेवून झोंप येण्याला सुलभ असे विचार मनांत आणावेत, हाही उपदेश होता. त्याबरहुकूम मीं कांहीं गाजलेल्या देशी बोलपटांच्या आठवणी मनांत आणूं लागलों. पण थिएटरमध्यें झोंप आणणारे बोलपट आठवणीनें डोकें तापवून ती घालवूंच लागले, तेव्हां बोलपटांचा नाद सोडून देऊन मी मन प्रसन्न करणारे विचार करण्याचें ठरविलें.

एकाद्या त्रासदायक अनुभवांतून जात असताना पुढें मिळणाऱ्या सुखाच्या कल्पनेनें मनाला थोडा तरी विरंगुळा मिळतो. प्रवासाच्या दगदगीनंतर आपण घरीं जाणार, निदान उद्यां तरी आपल्या बिछान्यावर झोंपणार, हा प्रवास केव्हां न केव्हां तरी खास संपणार, असे विचार प्रवासाचा शीण थोडा हलका करतात. जितका जास्त त्रास होत असेल तितक्या जास्त प्रमाणांत आपल्या श्रमांचें चीज होईल असें आशा आपल्याला सांगत असते, व तिच्या सांगण्यावर विश्वास ठेवणें बरें वाटतें. आजच्या प्रवासांतील हाडबडीची दैव कोणत्या खास देणगीनें भरपाई करील याबद्दल माझें मन अन्दाज करीत होतें. उद्या वनभोजनास जाण्यांचा एकादा बेत होईल ? परत येतांना विमानानें येण्यास मिळेल ? एकादी मॅच खेळायला सांपडेल ? आपल्या नांवावर आपल्याला नकळत कोणी लॉटरीचें तिकिट घेतलें असून त्याला पहिलें बक्षीस लागेल ? एकाद्या कोट्याधीशाला मरतामरतां वांचविण्याची संधी मिळेल ? एकादा जुना मित्र अचानक भेटेल ?......

या विचारांच्या तन्द्रींत मीं असतांना एकाएकीं माझ्या उजव्या खांद्याला एक अणकुचीदार वस्तू बोचूं लागली. मिटल्या डोळ्यांनींच डाव्या हातानें मी ती चांचपूं लागलों. तो एका लोखंडी पेटीचा कोपरा होता. ती पेटी कोणीतरी बाहेरून दाराच्या खिडकीमधून आंत ढकलीत होतें. माझ्या हातीं लागलेला कोंपरा धरून मीं ती पेटी परत बाहेर ढकलूं लागलों.

" अरे कोण आहे ? पेटी कोण ढकलतो आहे ?" पेटीचा मालक प्लॅटफार्म-टोंकाकडून ओरडला. " आंत जागा नाहीं, " मी त्या न दिसणाऱ्या माणसावर गुरगुरलों, " पेटी आंत काय ढकलता ? लागली बिगली कुणाला तर ? "

" दाराजवळ सामान रचून ठेवता, दार देखील उघडूं देत नाहीं-पेटी खिडकींतून ढकलूं नको तर काय करूं ? "

डब्यांतून दोनतीन आवाज आले, ' अहो जागा नाही, जागा नाहीं, ' उशिरा कां होईना पण मी माझें कर्तव्य करीत आहे हें पाहून डब्यांतल्या कित्येक मंडळींना समाधान वाटलें.

" सोडूं नका, ढकलून द्या ती पेटी बाहेर, " उत्तेजनाचा एक आवाज आला.

" दुसऱ्या डब्यांत जा, इथें जागा नाहीं, " मीं प्लॅटफार्मच्या बाजूवर ओरडलों.

" मीं इथेंच येणार-डबा कांहीं तुमचा नाहीं, दुसरीकडे कुठेंही जागा नाहीं "

" कसें येता तें पाहतो, " म्हणून मीं पेटी आणखी एकदां ढकलली. पेटीच्या मालकानें ती एकदम मागें घेतली. मी जिंकली या

समजुतीनें विजयी मुद्रेनें आंत वळून पाहिलें, तो बाहेरच्या माणसानें तेवढ्यांत खिडकींतून आपली पेटी आंत टाकली व स्वतः चढून खिडकीच्या आंत एक पायही सोडला. तो पाय पकडून त्या माणसाला बाहेर उलटा पाडावा कीं काय हें मी नक्कीं ठरवीपर्यंत गाडीची शिट्टी झाली व त्याचा दुसरा पायहि आंत आला. गाडी हालली व धर्म-युद्धाच्या नियमाप्रमाणें त्या माणसाचा प्रतिकार करणें अशक्य झालें. अखेर खिडकींतून वरच्या फळीला आपटून त्याचें डोकें आंत आलें. तो फारच चिडला.

" जागा नाहीं म्हणून पाडीत होतात कीं काय मला गाडीखालीं ? मेलो असतों म्हणजे गेला असतात खडी फोडायला ! " तो चढत्या आवाजांत खेंकसला.

" बन्या ? " मी आश्चर्यानें म्हणालों.

× × × ×

तो आक्रमणशील प्रवासी दुसरातिसरा कोणी नसून माझा जुना मित्र बन्याच होता. धडपड हें जर जीवन असेल तर बन्या वर्षांतून आठ महिने तरी जिवंत राहात होता. उरलेल्या चार महिन्यांत तो कधीं कधीं भेटायचा. त्याचें खरें आडनांव काय होतें याचा मला देखील विसर पडत असे, कारण ' बन्याबापू कोशीसकर ' हें त्याच्या गुणांनीं त्यानें मिळविलेलें नांवच जास्त प्रसिद्ध होतें. कुठें ' पेन्शनरांचें बोर्डिंग ' तर कुठें ' बायकांची व्यायामशाळा,' अशा कल्पक योजना काढून तो व्यवसाय आणि करमणूक दोन्ही साधत होता. पुष्कळ दिवसांनीं भेटल्यानंतर त्याच्या आत्मवृत्ताचें नवें प्रकरण हटकून ऐकण्यास मिळत असे.

आमचे दोघांचे भाण्डण चांगलेच रंगेल, एकादेवेळीं बाचाबाची हातघाईवर येईल, मग आपण मधें पडून समेट करूं, अशा आशेनें आमच्याकडे डब्यातले लोक डोळे लावून बसले होते. आम्ही दोघे ओळखीचे निघालेले पाहून त्यांची फार निराशा झाली. बन्याशीं भांडण चालूं असेपर्यंत माझ्याकडे थोड्या क्षमादृष्टीनें पाहूं लागलेला साधू आतां विटलेल्या मुद्रेनें पुटपुटत दुसरीकडे वळला. बन्यानें दाराजवळच्या सामानाच्या ढीगावर आपली पेटी नीट बसविली आणि तिला टेंकून तोही बसला.

" तो तूं नसतास तर ही पेटी ढकलणाऱ्या माणसाला उभा खाल्ला असता मीं," तो थोडा हिरमुसला होऊन म्हणाला.

" जाऊं दे, तो मीं निघालों म्हणून प्रवास तरी थोडासा सुखाचा होईल," मी त्याचें सांत्वन केलें.

" ती पेटी किती महत्त्वाची आहे, कल्पना नाहीं तुला—"

" कां ? एवढं काय आहे त्यांत ? "

बन्या पुढें वांकून हलक्या आवाजांत म्हणाला,

" त्या पेटींत लहान मोठीं चव्वेचाळीस घड्याळं आहेत—"

" म्हणजे हा धंदा केव्हां सुरू केलास ? मागच्या खेपेस भेटलास तेव्हां तालीम मास्तर होतास, तालीममास्तरचा घड्याळजी केव्हां झाला ? "

" मी घडयाळजी झालों नाहीं—पण आतां इतकीं घडयाळं जवळ असल्यावर सुरवात करायला कांहीं हरकत नाहीं. मला वाटतं ' चेन सिस्टिम ' नें विकून टाकतां येतील ही घडयाळं, " बन्या खिडकीबाहेर

पहात म्हणाला, " म्हणजे असं करायचं कीं कूपन बुकं काढायचीं; प्रत्येकांत एकेक रुपयाचीं दहा कूपन्स, तीं लोकांजवळ द्यायचीं; दहा कूपन्स खपविणाराला एक घड्याळ बक्षिस. कूपन विकत घेणाराला दहा कूपन्सचें एक नवीन बुक मिळेल. तीं त्यानें खपवलीं कीं त्याला एक घड्याळ—याप्रमाणें पुढें चालूं बस्स, ठरला हाच प्लॅन. बोल तूं किती बुकं घेतोस ?"

" साभार परत. मला कूपन नको. आणि घड्याळही नको. फुकट मिळालेल्या एका घड्याळाच्या दुरुस्तीवर मीं आतांपर्यंत पांचपंचवीस रुपये तरी खराब केले आहेत–पण इतकीं घड्याळं आली कशी तुझ्याजवळ ?"

" तीं कुंदाच्या वडलांची आहेत."

" कुंदा ?"

" होय. कुंदा काटदरे. काटदरे वॉचमेकरची मुलगी"

" कुठलीं माणसं आहेत हीं ?"

मध्यप्रांतातल्या एका गांवाचें नांव सांगून बन्या मुग्ध राहिला. पण रहस्य लौकरच बाहेर पडणार हें ओळखून मींही कांहीं न विचारतां त्याच्या बोलण्याची वाट पहात बसलों.

" कायरे, घड्याळजीचा सामाजिक दर्जा काय ?" बन्यानें एकदम विचारलें.

" प्रश्न कठिण आहे. साधारण दिवाणजीच्याखालीं आणि मशाल-जीच्या वर ?"

" वात्रटपणा नको—माझ्या विचारण्याचा अर्थ हा कीं वकील, व्यापारी, कारखानदार, किंवा इनामदार यांच्यापेक्षां घड्याळांचा धंदा करणारा मनुष्य कमी लेखला जातो काय ? "

" कदापि नाहीं. हें समान हक्काचें युग आहे. सर्व जणांना सारखाच दर्जा आहे. आपण सगळे एकाच परमेश्वराचीं लेकरें—"

" टवाळी पुरे " बन्यानें सुपारी देत म्हटलें.

' मग आधीं कैफियत सांगून मग निकाल माग ' मीं त्याला फर्मावलें.

शक्य तितक्या स्टेशनांवरचा चहा पीत बन्यानें आपला ताजा अनुभव निवेदन केला.

× × ×

बायकांच्या व्यायामशाळेचा बोऱ्या वाजल्यानंतर कांहीं दिवस तरी पुण्यासारख्या ठिकाणीं आपलें तेज पडणार नाहीं हें मीं ओळखलें, ( बन्या सांगू लागला ). मध्यप्रान्तात माझा एक मित्र माझ्यासारखाच हरहुन्नरी आहे. त्याचें बरेंच दिवसाचें बोलावणें होतें, तेव्हां त्याच्या गांवाला भेट देण्यास मीं गेलों. त्याच्याशीं थोडा विचारविनिमय करून साधल्यास दोघांनीं मिळून एकदा नवा धंदा सुरू करावा असा माझा बेत होता. पण तिथें जाऊन बघतो तों माझा मित्र आपले सगळे धंदे सोडून सरकारी अम्मलदार झालेला ! मध्य प्रांतातल्या बदललेल्या राजवटीखालीं त्याचें भाग्य फळफळलें होतें व आपल्या नव्या नोकरीवर दाखल व्हायला तो नागपुरास निघाला होता. इतक्या लांब आल्यावर परत येण्यास माझें मन घेईना. त्याच्याशीं थोडें बोलणें करून तात्पुरती निकड भागविण्यासाठीं मीं एक युक्ती काढली.

इतर ठिकाणच्या सुखवस्तू लोकांप्रमाणेंच त्या गांवच्या लोकांनाही ' संस्कृति ' या विषयाची गोडी लागली होती. संस्कृति हें काय प्रकरण आहे याबद्दल पुष्कळांना जिज्ञासा असून, वेळ पडल्यास त्यासाठीं ते थोडासा खर्च करण्यास देखील मागेंपुढें पहाणार नव्हते. ' संस्कृति म्हणजे संस्कृत जाणणारी बाई ' ही सरळ कल्पना बाळगणाऱ्या एका मालगुजारापासून ' संस्कृति म्हणजे साहेबी ' असें समजणाऱ्या रिटायर्ड रावबहादुरापर्यंत सर्वांना, आपल्या गांवांत कांहींतरी सांस्कृतिक चळवळ असावी, आपलें गांव महाराष्ट्राचें सांस्कृतिक केंद्र ठरविण्यासाठीं एखादी सबब मिळावी, शेजाऱ्यापेक्षां उच्च वातावरणांत आपण वावरतों असें दाखवायला कांहीं निमित्त असावें, असें वाटत होतें. माझ्या मित्राबरोबर भाड्याच्या मोटारींत हिंडून मी गावांतल्या ठळकठळक लोकांच्या भेटी घेतल्या. ' हे एक पुण्याचे संस्कृति-तज्ञ आहेत ' अशी माझी ओळख माझा मित्र करून देत असे. ' संस्कृति म्हणजे काय ' असें विचारण्याचें कोणी धाडसच केल्यास, मी नुसता किंचित् तुच्छतेनें स्मित करायचा, व माझा मित्र खुलासा करायचा कीं, ' संस्कृतीची व्याख्या करण्यासाठीं यांनीं एकशेंआठ ग्रंथ वाचलेले आहेत तरी यांना त्या शब्दाचा सुटसुटीत अर्थ सांपडला नाहीं ! ' इंग्रजी जाणणाऱ्या लोकांना 'ए स्टूडंट ऑफ कल्चर' अशी माझी भूमिका सांगण्यांत येत असे, माझ्या मित्रानें मला राहण्यासाठीं हमरस्त्यावरच दोन खोल्या घेतल्या व ' संस्कार समीक्षा समिती ' अशी एक ऐटदार पाटी रंगवून आणून दारावर लावली. एक कपाट, टेबल, कांहीं खुर्च्या, त्याचप्रमाणें त्या कपाटांत रूबाबदार दिसतील असे कांहीं लठ्ठलठ्ठ ग्रंथ, माझ्या सुखसोयीसाठीं जरूर तें घरसामान, घरमालकाकडे, खाणावळींत व भाडोत्री मोटारवाल्याजवळ दोन महिन्यांचें ' क्रेडिट, '

एवढी माझी व्यवस्था करून देऊन माझा मित्र नागपूरला निघून गेला व मीं उद्योगाला लागलों.

त्या ऑफिसांत बसून मीं पुण्याच्या संस्कृति संरक्षक मण्डळापासून तो तहत इन्टरनॅशनल पेन क्लबपर्यंत कित्येक संस्थांकडे नुसत्या चौकशीचा पत्रव्यवहार सुरू केला. त्यांच्या उत्तरांच्या लखोट्यांवरील नांवांनीं व माझ्या झीरो नम्बरच्या चष्म्यानें तेथें येणाऱ्या लोकांवर जर पुरेशी छाप पडली नसेल, तर जुन्या विलायती मासिकांतून कापून घेतलेल्या कित्येक अनोळखी लोकांचीं चित्रें मीं भिंतीवर लावलेलीं होतीं, त्यांनी खास पडली. उच्चारतां येणार नाहीं अशीं झेक, जर्मन किंवा रशियन नांवें त्या लोकांना देऊन, हा अमक्या देशांतील मोठा तत्त्वज्ञानी आहे, हा एक प्रसिद्ध मनोविश्लेषणतज्ज्ञ आहे, हा विरोधविकासवादावरील एक अधिकारी पुरुष आहे, ही तौलनिक संस्कृतीची अभ्यासिका आहे, अशी गंभीर माहिती मीं पुरवीत असे. माझा स्वतःचा पोषाख अगदीं साधा किंबहुना थोडा बावळा ठेवणेंही मोठें धोरणीपणाचें ठरलें. ‘ मला कोणतीही पदवी नाहीं ’ हें मी अशा खुबीदार शैलींत सांगत असे कीं, एकदोन पदवीधर लोक जरासे शरमिंदे होऊनच माझ्याशीं वागूं लागले. बसल्याबसल्या मीं संस्कार समीक्षा समितीची घटना तयार केली.

खिशांतून एक कागद काढून बन्यानें वाचून दाखविला.

‘ मानवी जीवनाच्या सर्वांगीण व उन्नतीशील परिपाकासाठीं, विद्या, शास्त्रें किंवा कला यांच्या हेतूंची तौलनिक छाननी करून जीवनांच्या अनुभवांची वैयक्तिक प्रतिक्रिया बारकाईनें अवलोकन करावयाची आणि प्रत्यहीं लाभणाऱ्या आत्मनिष्ठ आणि वस्तुनिष्ठ संस्काराची इष्टानिष्टता

पारखून आधिभौतिक अस्तित्वाच्या सम्यक् ज्ञानानें पूर्णत्वांप्रत पोहोंचणाऱ्या मार्गाचें आलोडन करीत— '

आणि अशाच प्रकारचें बरेचसें आणखी; हें ब्रीदपत्र तयार करून कांहीं सामान्य नियमांची यादी केली, दहा रुपये प्रवेश फी आणि महिना पांच रुपये वर्गणी ठरविली व याप्रमाणें घटना तयार झाली. तूं म्हणशील कीं हें सगळें मी कुठून जमा केलें—इच्छा असली म्हणजे मार्ग सांपडतो. जितका म्हणून कठीण, नीरस, कंटाळवाणा, विद्वत्ताप्रचूर आणि अक्षराचाहि बोध न होणारा मजकूर मला गोळा करतां आला तितका करून नुसतीं वाक्यें एकापुढें एक ठेवून दिलीं. माझ्या ऑफिसांत एकदा शंकेखोर येऊन प्रश्नच विचारायला लागला कीं त्याला गप्प करण्यासाठीं वरील छापाचे कित्येक उतारे मीं पाठ करून तयार ठेवले होते. उलटतपासणी करायला गेलेल्या एकाद्या बुद्धिवान् माणसाला चकवायला एकादा बुवा ज्याप्रमाणें ' ब्रह्म ' आणि ' माया ' या शब्दांवर कसरती करतो, त्याप्रमाणें ' संस्कृति, ' ' संस्कार ' ' परिणतावस्था, ' ' भौतिकता, ' ' इंप्रेशानिझम ' ' फ्यूचरिझम ' ' रोमँटिझम ' ' स्टॅग्नेशन, असे अनेक पाठ केलेले शब्द मी फेकूं लागलों. क्वचित् एकादा कोणी प्रोफेसर वगैरे जाणता मनुष्य आलाच तर मीं किंचित् वेड पांघरीत असे—आणि बुद्धिमत्तेची कीर्ति होण्यास किंचित् वेडसरपणाचीही झांक किती उपयोगी पडते याची तुला कल्पना नाहीं ! मीं बोलतों त्यांतील अक्षरही समजत नाहीं ही बातमी त्या गांवच्या वजनदार लोकांत पसरण्यास वेळ लागत नाहीं. लौकरच माझ्या खाण्यापिण्याची बडदास्त ठीक होऊं लागली, समितीला बरेच सदस्य मिळाले.

माझी जागा ज्या घराच्या माडीवर होती, त्या घराच्या तळमजल्याला रस्त्यावर एक घड्याळांचें दुकान होतें. घड्याळांचे नेहमीचें सवंगडी ग्रामोफोन आणि स्टोव्ह यांचाही भरणा त्या दुकानांत होता. तेंच काटदरे वॉच मेकर ऊर्फ गणोबा घड्याळजींचें दुकान. माझें ऑफिस उघडल्यानंतर कांहीं दिवसांनीं गांवातल्या वजनदार लोकांची ये जा जेव्हां माझ्याकडे सुरू झाली, तेव्हां मी कोणीतरी शिष्ट आहे असें गणोबाला पटूं लागलें, नाहीं तर सुरवातीला भरभराटीत चाललेल्या दुकानाच्या मालकाला शोभेल अशाच उर्मटपणानें तो माझ्याशीं वागत होता.

'एक दिवस अकरा वाजण्याच्या सुमाराला स्वारी जिना चढून माझ्या ऑफिसांत आली. मी त्याला दुकानांत पुष्कळदां पाहिलेला होता. तेव्हां ओळखीचें हांसू तोंडावर आणून म्हणालों, '

'या'

गणोबा भिंतीवरच्या चित्राकडे पाहात चांचरत माझ्या पुढच्या खुर्चीवर येऊन बसला.

'कसं काय?' मी विचारलें.

या प्रश्नाचें उत्तर देण्याच्या भानगडीत न पडता तो म्हातारा एकदम म्हणाला,

कांहो हें काय आहे?

'संस्कार समीक्षा समिती'

'म्हणजे?'

मीं त्याला आमचें ब्रीदपत्र वाचून दाखविलें.

'म्हणजे साक्षरता प्रकार कां काय म्हणतात तोच प्रकार आहे कीं काय?'

' त्याच प्रकारची अगदीं अखेरची अवस्था—साक्षरता प्रचार म्हणजे क्षणभर ' बी ' टाइमपीस म्हणालांत तर संस्कार समीक्षा 'ओमेगा' मॉडेलच्या बरोबरींची '

' कळलं. तुम्हाला घड्याळांची पण माहिती आहे वाटतं ? '

' मला सर्व गोष्टींची माहिती करून घ्यावी लागते—माझा व्यासंगच त्या प्रकारचा आहे '

' तुमच्याकडे बरेच बडेबडे लोक येतात काय ? '

' हो—ते इथले बडे लोकच म्हणायला हरकत नाहीं '

' मग कांहो; तुम्ही एक काम केलंत तर साधण्यासारखं आहे—'

' काय तें ? '

' या लोकांत आपली घडयाळं खपवतां येतील, चांगलं कमिशन देईन मीं तुम्हाला '

' संस्कार समीक्षा समिती'च्या सन्मान्य चिटणीसापुढें अशी दुकानदारी योजना ठेवण्याचा त्या गृहस्थाचा अतिप्रसंग मीं मुकाट्यानें सहन केला. सुदैवानें माझ्या ऑफिसांत त्या वेळीं तिसरें कोणीं माणूस नव्हतें, असतें तर माझा हा अपमान झाला हें दाखविणें मला भाग पडलें असतें. पण कोणी तिऱ्हाईत तेथें नाहीं हें पाहून माझ्या नेहमींच्या व्यवहारचातुर्यानें कान टवकारले.

' तुमची कल्पना विचारणीय आहे ' मी गंभीरपणें म्हणालों,

' पहा खटपट करून, थोडे नुसते नमुने देतो मी तुम्हाला आणून '

' पण हें पहा—'

' काय ? '

' घड्याळं खपविण्याच्या दृष्टीनें तुम्ही आमच्या समितीचे सदस्यच झालांत तर फायद्याचें ठरेल, गिऱ्हाइकाला खरेदीबद्दल जास्त आपुलकी वाटेल—'

' वर्गणी काय आहे ? '

' दहा रुपये प्रवेश आणि महिना पांच रुपये '

' अरे बापरे ! '

' पण आमच्या सदस्यांत गांवांतले थोर थोर लोक आहेत हे विसरून चालणार नाहीं ' मीं माझ्या चिटणिशी आवाजांत त्याला सांगितलें.

' तें कबूल आहे हो, पण माझी झालीं आहेत इंग्रजी तीन बुकं, मला तुमची संस्कृति नी समीक्षा यांतलं कळणार आहे काय ? '

' कुणा लेकाला कळतं आहे ? ' मीं म्हणालों—पण मनांतल्या-मनांत—मोठ्यानें मीं सुचविलें,

' तुमचा कुणीं मुलगा बिलगा असला तर त्याला सदस्य करा '

' मुलगा नाहीं, पण मुलगी आहे मला—'

' फारच उत्तम ! तिचं नांव टाकूं ? '

' नको. आधींच तिच्या डोक्यांत पुरेशीं खुळं आहेत, हें नवीन नको आणखी. त्यापेक्षां वेळ पडली तर माझंच नांव घाला. '

याप्रमाणें चर्चा संपवून गणोबा घडयाळजी गेले.

× × × ×

दुसऱ्या दिवशीं त्यांची मुलगी चव्वेचाळीस लहानमोठीं घड्याळें एका पोऱ्याच्या डोक्यावर देऊन वर घेऊन आली. रिस्टवॉचेस, पॉकेट वॉचेस, टेबल क्लॉक्स, टाईम पीसेस—दोन भिंतीवरचीं देखील घड्याळें होतीं त्यांत. तींच सगळीं या ट्रंकेंत आहेत. माझ्या विक्रयशक्तीबद्दल गणोबाला वाजवीपेक्षां फाजील विश्वास होता असें दिसलें.

पोऱ्याला खालीं पाठवून ती मुलगी माझ्या समोरच्या खुर्चीवर बसली. रूपानें कांहीं वाईट नव्हती ती, आणि त्या गांवाच्या मानानें फॅशनेबल देखील होती.

'बाबांनीं घड्याळं पाठवलीं आहेत, मीं त्यांचीं मुलगी कुन्दा, मला तुमच्या समितीचं सभासद व्हायचं आहे. मॅट्रिक पास आहे मीं' ती एका दमांत म्हणाली.

मीं कौतुकानें तिच्याकडे पाहून हांसलों.

'संस्कार समीक्षा समितीचा चिटणीस घड्याळं विकीत दारोदार हिंडेल असं तुमच्या वडलांना वाटलं वाटतं ?'

'मला काय माहीत ? मला त्यांनीं पोहोंचवायला सांगितलीं मीं आणून टाकलीं'

'तुम्हाला पोहोंचवायला सांगितली ?'

'नाहीं–त्या पोऱ्याला एकटाच पाठवीत होते; मीं म्हणालें, मीं पण जाते त्याच्याबरोबर–मला भेटायचंच होतं तुम्हाला ?'

'खरं ?'

ती गोंधळून दुसरीकडे पाहायला लागली, पुन्हां जरा हांसून म्हणाली,

‘ तुमच्या समितींत यायचंच मला—’

‘ पण तुमच्या वडलांना मेंबर व्हा म्हणून म्हटलें होतं मीं—म्हणजे त्यांची घड्याळं खपायला मदत झाली असती. तुम्हीं मेंबर व्हावं असं मत नाहीं आहे त्यांचं ’

‘ असंच असतं आमच्या बाबांचं सदा ! पण तुम्हीं करून घ्याल न मला मेंबर ? ’

‘ माझ्या एकट्याच्या इच्छेवर असतं तर—पण बाकी मेम्बर्सनीं कबूल करायला पाहिजे न ? ’

‘ मग कोणी हरकत घेतील ? ’

‘ त्याचा काय नेम आहे ?

‘ कां ! मीं घड्याळजीची मुलगी आहे म्हणून ?

‘ भलतंच ! पण—’

‘ मला ठाऊक आहे. हेंच कारण निघेल ! माझ्या मैत्रिणी मला ‘ गणोबा घड्याळजीची मुलगी ’ म्हणून चिडवतात; त्यांना दाखवायचं आहे मला—इथल्या बड्याबड्या लोकांत बरोबरीनं हिण्डायला लागले म्हणजे कळेल म्हणावं ! ’

‘ आधीं तुमच्या बाबांना मेंबर करून घेऊं, मग तुम्हांला यायला सोपं पडेल ’

‘ बाबांच्यावर नका माझं अवलम्बून ठेऊं, कांहीं झालं तरी मीं येणारच ’

‘ जरूर जरूर ! तुमच्या येण्यानें मला फार आनंद होईल ! ’

हळूहळूं कुन्दाचें माझ्याकडे येणेंजाणें बरेंच वाढलें. तुला माहीत आहे माझ्याबद्दल मुलींना कांहीं तरी विशेष आकर्षण वाटतं, मला

स्वतःला देखील आश्चर्य वाटतं, पण काय असेल ते असो मीं पोरीनां आवडूं लागतो असं—

बरं पुरे म्हणतोस तर पुरे. सारांश इतकाच कीं पुढें मागें संस्कार समीक्षा समिती आणि काटदरे वॉचमेकर या दोन्ही संस्था एक होऊन त्यांचा-व कुंदाचा-मालक होण्याची सुखस्वप्नें मला पडूं लागलीं. मधून मधून गणोबाही माझ्याकडे येऊन जात. ‘ घड्याळें पसंतीसाठीं अमक्या अमक्याकडे पाठविलीं आहेत, ‘ तुमच्या मेंबरशीपचा ठराव पुढल्या बैठकीला पुढें येईल ’ अशी आश्वासनें देत त्यांना मीं खूष ठेवीत होतों. बाबा मेंबर झाल्यानंतर कुंदा मेंबर होणार, तेव्हां दरम्यानची उमेदवारी ती माझ्या ऑफिसांत येऊन नियमानें करीत होती. समितीच्या इतर सदस्यांना खूष करण्यासाठीं एक चमचमीत अल्पोपहाराचा मीं सुच-विलेला बेत कुन्दाच्या वशिल्यानें मीं गणोबांकडून मान्यही करून घेतला होता.

इतक्यांत आमचे ग्रह फिरले ! माझ्या ऑफिसांत बरीचशीं धेंडें जमलीं असतां मीं सहज म्हणालों,

‘ समितीला एक नवीन सदस्य मिळताहेत, आपले खालचे काटदरे वॉचमेकर—’

‘ कोण ? तो गणोबा घड्याळजी ? वा वा वा ! ’ पिठाच्या गिरण्यांचा एक मालक ओरडला.

‘ ओ ? दॅट बुर ? मोस्ट सर्टनली नॉट !’ एक तिसऱ्या वर्गाचे कैसर-इ-हिंद म्हणाले.

‘ अगबाई तो दुकानदार ? काय कल्चर आहे त्याला आमच्यांत

येण्यासारखं ?' ऑल इंडियन फीमेल्स लीगच्या स्थानिक चिटणीशीण बाई बोलल्या.

'अहो तो तर परवां गुडघ्याएवढ्या दुकानांत डोळ्याला भिंग लावून बसत होता!' बापाच्या वशिल्यानें प्रॉव्हिन्शल नोकरींत शिरलेला एक फॅशनेबल एलेल्बी उद्‌गारला.

'गणोबा घडयाळजी आणि संस्कार समीक्षा समितीचा सदस्य! वा बहोत अच्छी!' एक कर्जबाजारी देशमुख गरजले. या चौफेर हल्ल्याला मीं कांहींतरी परिणामकारक भाषण करून उत्तर देणार होतो, पण तितक्यांत चटकन् जिन्याच्या दाराआड होणाऱ्या गणोबाच्या क्रुद्ध चेहऱ्याकडे माझें लक्ष गेलें आणि मीं कपाळाला हात लावून माझ्या खुर्चीवर बसलों.

गणोबानें सर्व ऐकलें होतें!

तो त्यावेळेला वर माझ्याकडे येत होता पण जिन्याच्या दारांतच आपलें वर्णन ऐकून चढल्या पावलीं खालीं उतरला होता. आलेल्या मंडळींना कसेबसे वाटेला लावून मीं माझ्या ढांसळलेल्या मनोऱ्याचा एकेक दगड मनांतल्या मनांत गोळा करूं लागलों. आतां गणोबा समितीचा सदस्य आपण होऊन कसचा होणार आणि तो होणार नसला तर कुन्दा कशी होणार, कुन्दाला समितींत येण्यास मिळत नसलें तर ती माझ्याकडे तरी कशाला येणार?

त्या क्षणालाच संस्कार समीक्षा समितीचा मला कंटाळा आला. समितीच्या सदस्यांबद्दल कांहीं संस्कारशून्य शब्द माझ्या डोक्यांत थैमान

घालूं लागले. विमनस्कपणें मीं त्या चव्वेचाळीस घडयाळांना किल्ली देऊन त्यांचें कांटें फिरवीत बसलों.

संध्याकाळीं कुन्दा आली.

'मला सगळी कल्पना आहे, कांहीं सांगूं नको मला' मीं डोळे मिटून म्हणालों.

'तुम्हांला कसं कळलं ?'

'मला सगळं कळतं. तुझ्या बाबांनीं प्राण गेला तरी समितीचा मेंबर होणार नाहीं अशी प्रतिज्ञा केली, तुलाही येण्याची बन्दी केली, आतां फक्त तीं घड्याळं परत घेण्याकरतां तुला पाठवली आहे—खरं कीं नाहीं ?'

'हें कांहीं सगळं खरं नाहीं. बाबा तुमच्या समितीवर चिडले आहेत हें खरं पण मला त्यांनीं बंदीही केली नाहीं आणि घड्याळंही मागितलीं नाहींत.'

'तीं घड्याळं आहेत सगळीं मेंबरलोकांकडे, ठिकठिकाणीं पसंत करायला पाठवलेली," मीं खोटेंच सांगितलें, "त्यांच्याकडून गोळा करून आणायला थोडे दिवस लागतील, तोंपर्यंत तुला वरचेवर यावं लागेल इथें.'

'मरोत तीं घडयाळं—कांहो, बाबा एक मागसलेले म्हणून तुमच्या मेंबर्सनीं त्यांची टिंगल केली पण मी मॅट्रिक पास आहे—मला देखील नाहीं म्हणतील ?'

‘ तें मी कसं सांगूं ? ती पार्टी मीं एवढ्यासाठींच सुचवली होती— जरा खाणंपिणं यथास्थित झाल्यावर त्या लोकांनीं कांहीं हरकत घेतली नसतीं. ’

‘ आतां कसची पार्टी ! बाबा भयंकरच भडकले आहेत. उद्यांची पार्टी ठरवून ते तुम्हांला कळवायलाच आज सकाळीं वर येत होते, जिन्यांतच त्यांनीं या लोकांनीं चालविलेली टवाळी ऐकली, त्याच पावलीं परत घरीं येऊन त्यांनीं पार्टी रहित करून टाकली. नाहींतर त्यांनीं केवढातरी बेत केला होता:—छेलशंकर हलवायाकडे नीं अमीन फळवाल्याकडे मोठाल्या ऑर्डरी दिल्या होत्या—पण त्या आतां क्यानसल करायला सांगितलं आहे मलाच. ते स्वतः उद्यां दुपारच्या गाडीनं जाणार आहेत मुंबईस—आठ दिवसांसाठीं ”

‘ जाऊं देत. निदान तूं तरी राहशील न इथें ? ’

‘ काय करायचं आहे मेलं राहून ? घडयाळजीची मुलगी म्हणून चिडवून घेण्यासाठींच कीं नाहीं ? मला मेंबर होता येत नसलं तर इथें राहण्यापेक्षां मीं देखील मुम्बईलाच जाते—कांहीं देखील करीत नाहीं तुम्हीं माझ्यासाठीं—उं–उं–उंऽऽ ’

एक बऱ्यापैकीं तरुण मुलगी आपल्यासमोर रडते आहे आणि तें देखील आपण तिच्या मनासारखी एकादी गोष्ट करावी म्हणून—मित्रा, अशा प्रसंगी कोण रसिक मनुष्य तिचं सांत्वन करण्याची संधी घेणार नाहीं ? तिच्या पाठीवर हात फिरवून तिला उगी करणार नाहीं ? तिचे डोळे आपल्या रुमालानें पुसून केंस मागें सारणार नाहीं ? ममतेनें तिची हनुवटी वर उचलून—बरं नको म्हणतोस तर नको. माझा मुद्दा काय,

कीं कोणीही पुरूष रडणाऱ्या तरूणीमुळें खड्ड्यांत जाण्यास खुषीनें तयार होतो. तूं कल्पना कर कीं वर्षानुवर्षांच्या तपानें अगदीं आशेला आलेल्या विश्वामित्रापुढें, ‘ मला गडे तुमची दाढी विंचरूं द्या ’ असा पोरकट हट्ट धरून मेनका रडली असली तर बिचाऱ्यानें मीं केलें त्यापेक्षां वेगळें काय केलें असेल ?

‘ उगा, उगा, उगा शहाणी तो-वेडी कुठली—बरं बरं—आपण करूं कांहींतरी हं—’

असें मीं तिच्या कानांत गुणगुणून तिचें सांत्वन केलें—आतां अशा तऱ्हेचें सांत्वन दोघे एकमेकांपासून दूर बसून होते किंवा काय तें तूंच पहा म्हणजे झालें.

त्याच वेळीं माझ्या अंगांत कलीनें प्रवेश केला.

‘ तुझे बाबा उद्यां आठ दिवसांसाठीं मुंबईला जायचे आहेत ना ! ’ मी हलकेंच विचारलें.

‘ हूं—’

‘ पार्टीसाठीं लागणाऱ्या जिनसांच्या ऑर्डर्सना अजून नको म्हणून सांगितलं नाहीं ना ? ’

‘ नाहीं ’

‘ मग उद्यां चारला पार्टी तुमच्या घरीं ठेव. साडेतीनच्या गाडीनें तुझे बाबा निघून गेल्यावर निर्धास्तपणें संस्कार समीक्षा समितीशीं कु. कुंदादेवी काटदरे यांचा गोड परिचय करण्याचा समारंभ अल्पोपहारासह पार पाडण्यात येईल. गांवातील वजनदार मंडळी तेथें उपस्थित राहतील आणि समारंभाच्या समारोपाचे वेळीं श्री. बन्याबापू कु. कुंदादेवी यांस

समितींत सामील करून घेण्याची सूचना सदस्यांपुढें ठेऊन ती एकमतानें पसार करून घेतील. तुझे बाबा आठ दिवसांनीं परत येतील तेव्हां करूं आपण त्यांना शांत कसं तरी '

या माझ्या उत्तान कल्पनाचित्राचें कुंदानें अशा उत्साहानें कौतुक केलें, कीं त्या घटकेला माझ्या योजनेतले दोष शोधून पाहाण्याचे वगैरे विचार माझ्या डोक्यांतून सपशेल नाहींसे झाले—आणि तेंच पुढें भोवलें.

दुसऱ्या दिवशीं तीन वाजतां गणोबांचा टांगा दुकानापुढून स्टेशना-कडे गेलेला पाहतांच मीं कपडे घालून त्यांच्या घराकडे धूम ठोकली. आदल्या दिवशीं संध्याकाळींच समितीच्या सदस्यांना मीं ' कुंदादेवींच्या परिचय समारंभाला ( अल्पोपहारासह ) ' असें मोघम पण आग्रहाचे निमंत्रण दिलें होतें—ठिकाण गणोबा घडयाळजींचा बंगला. सर्वांनीं आमंत्रण स्वीकारलें होतें. एका तरुण मुलीचा अल्पोपहारासह परिचय हा कार्यक्रम समोर असल्यावर ती गणोबा घडयाळजीची मुलगी वगैरे क्षुल्लक शंका काढण्याचा कोणा सदस्याचा कल दिसला नाहीं.

गणोबा घडयाळजीनें बंगला मोठा हौसेनें बांधला होता. आणि त्यांतला दिवाणखाना म्हणजे तर अगदीं अयनेमहालच होता. त्याच ठिकाणीं मध्यभागीं रांकेनें टेबलें मांडून वर पांढऱ्या स्वच्छ चादरी पसर-लेल्या होत्या, आणि मोटमोठ्या बशांतून पेढे बरफी, रसगुल्ले, गुलामजाम, बदामी हलवा, मेसूर, तिखट मसालेदार पदार्थ, सफरचंद, संत्री, केळीं, सुकामेवा, वगैरे पदार्थ भरपूर प्रमाणात मांडून ठेवले होते. अगदीं आधुनिक फॅशननें नटून कुंदा माझी वाट पहात होती. मीं जातांच तिनें माझें मनापासून स्वागत केलें. नंतर निमंत्रित पाहुणे येऊं लागतांच आम्हीं दोघांनीं सर्वांचे स्वागत केलें.

माझ्या समितीच्या त्या सदस्यांपैकीं बहुतेकजण सुखवस्तु होते. कित्येकजण आपापल्या मोटरींतून आले होते. तरीही टेबलावरची तयारी पाहिल्यानंतर त्यांच्या अंगीं आलेली शालीनता वाखाणण्यासारखी होती. त्यांनीं घराचें, तेथील व्यवस्थेचें, कुन्दाच्या हुषारीचें, तिच्या कपडयांचें—फार काय तिच्या वडलांचें देखील अगदीं मनापासून कौतुक केलें. हेच लोक काल या घराच्या मालकाची टिंगल करीत होते, त्याच्या 'कल्चर' बद्दल शंका घेत होते आणि त्याला एक बौद्धिक अस्पृश्य मानीत होते हें मला स्वतःलादेखील खरें वाटेना. विलक्षण बदल झाला होता त्यांच्यांत. त्यांचा नेहमींचा ताठपणा कुठल्या कुठें गेला होता. त्यांची सौम्य चेष्टा-मस्करी चालली होती. चमचमीत खाण्यापिण्याचें पुढें दिसल्यावर निर्बुद्ध विनोदाचे जे झरे फुटूं लागतात त्यांचा तिथें पूर वाहूं लागला होता.

'धिस इज दि हाउस ऑफ ए मॅन ऑफ टेस्ट—या घराच्या मालकाची अभिरुचि चांगलीच आहे' तिसऱ्या दर्जाचा कैसर–इ–हिंद एक पेढा तोंडांत टाकीत म्हणाला.

'या टेबलावर सारी खरी टेस्ट आहे' पीठ-गिरणीवाल्यानें मूठभर खारवलेले काजू तोंडांत टाकून दुजोरा दिला.

'पण इथली सर्वांत गोड गोष्ट म्हणजे कुन्दा आहे' फीमेल लीगर बाई पदराआड एका पेरूचा चावा घेतां घेतां बोलल्या.

'कुन्दाला वन्दा!' खानदानी देशमुखांनीं कोटी केली व सगळे खूष होऊन हंसले, स्वतः जहागिरदार टेबलावरच्या सफरचन्दाची (अडी-अडचणीसाठीं खिशांत बाळगलेल्या चाकूनें) फांक कापून घेत होता.

' उच्च संस्कारांची छाप इथल्या भिंतीभिंतीवर आहे.' तोंडांत कोबलेल्या रसगुल्ल्याचा पाघळणारा रस हातरुमालानें चोरून पुसण्यासाठीं तोंड फिरविताना वशिल्या एलेल्बीने शेरा दिला.

' आणि टेबलाटेबलावर ' कांहीं तरी बोलायला हवें म्हणून मींही म्हणालों. मीं कुन्दाकडे मधूनमधून पहात होतों. ती खूष होती. सर्व मंडळी टेबलावरच्या पदार्थांवर तुटून पडण्यांत गुंतली होती.

आणि एकाएकी उल्कापात व्हावा तसा आवाज आला.

' भल्या माणसांनो, जनाची राहिली तरी मनाची थोडी लाज ठेवा! काल हलक्या वाटलेल्या गणोबा घड्याळजीच्या घरांत आज तोबरे भरतांना कांहीं शरम वाटत नाहीं कुणाला ?'

कुन्दाचा बाप प्रवासी पोषाखांत दिवाणखान्याच्या दारांत उभा होता! भयंकरच बिघडला होता म्हातारा. वरचीं दोन वाक्यें काय ती सभ्य भाषेंत बोलला तो-नंतर त्यानें भीडभाड न ठेवतां राखीव वऱ्हाडींत सुरवात केली. वऱ्हाडी भाषा किती संपन्न आहे ही मला त्यावेळपर्यंत कल्पना नव्हती. अव्याहतपणें पंधरावीस मिनिटांच्या वक्तृत्वांत गणोबानें मतलबाचे मुद्दे सुरवातीसच सांगून टाकले; ते असे कीं, गाडी चुकल्यामुळें स्टेशनवरून परत येतांना भेटलेल्या अमीन फळवाल्यानें ' आज एवढी ऑर्डर कशाबद्दल ' म्हणून विचारलें, त्यामुळें संशयित होऊन छेलशंकर हलवायाकडे शोध करतां त्याच्याकडूनही मोठा पुरवठा आपल्या घरीं झाल्याचें कळलें; ज्या अर्थीं दोन्ही ऑर्डरी क्यान्सल झाल्या नव्हत्या त्याअर्थीं आपल्या आचरट पोरीला गंडविण्याचा कांहीं कट असल्याच्या संशयानें वक्ता घरीं आला व त्याचा संशय खरा ठरला.

हे मुद्दे सांगून टाकल्यानंतर ( मधें बोलण्याचा कोणी प्रयत्न केल्यास त्याच्यावर वसकन् खेकसून त्याला गप्प करीत ) गणोबांनीं उपस्थित [ व त्यांच्या मतें आगंतुक ] पाहुण्याबद्दल आपलें मत कांहीं निवडक शब्दांत व्यक्त केलें. हजर मंडळींचा इतिहास व चारित्र्यच नव्हे तर पूर्वपीठिका व वंशावळ देखील आक्षेपार्ह असल्याची आपल्याला यत्किंचितही शंका नाहीं असें गणोबा ( अर्थातच वऱ्हाडी भाषेंत ) म्हणाले. त्याचप्रमाणें थोरपणाचा आव आणणारे लोक खरोखर किती निर्व्रीड व बुभुक्षित असतात हें सोदाहरण सिद्ध करून देण्याची गणोबानीं तयारी दर्शविली; समारोपादाखल असल्या लोकांची तोंडें पाहून काम होतें तें बीभत्स शब्दांत मांडून गणोबांनीं त्यांना तात्काळ व वेळ पडल्यास आडदाण्डपणें निरोप देण्याची तयारी दर्शविली.

या भाषणाच्या शेवटीं जहागिरदार टेबलाखालीं, एलेल्बी लीग-चिटणिशीणबाईच्या मागें, कैसर-इ-हिंद कोंपऱ्यात, अशा प्रकारें संस्कार समीक्षा मंण्डळाचे सदस्य विखुरले गेले होते.

‘ आम्हांला आमन्त्रण होतें–’ एक क्षीण आवाज निघाला.

विकट हास्य करून गणोबा ओरडले,

‘ बस्स करा ! दुसऱ्या कुणाला सांगा या थापा ! काल या बन्याबापूंच्या माडीवर मी हलका म्हणून माझी टिंगल करणारे लोक माझ्या घरचं आमंत्रण घेतील ? कां त्यापेक्षां माझ्या नांवावर माझ्या मागें खाऊन पिऊन चंगळ उडवतील—या माझ्या गंवार पोरीला हाताशीं धरून ? मीं ओळखतों सारं—”

‘ बन्याबापूंनींच बोलावलं आम्हाला ’ ती फीमेल लीगर बया मुसमुसत

म्हणाली—आणि या ठिकाणीं मला दुसरा धक्का बसला, कुन्दा, ती थिल्लर पोरटी माझ्यावर उलटली !

'होय बाबा, हेच म्हणाले ऑर्डरी क्यान्सल करूं नको म्हणून—"

त्या क्षणालाच तेथें राहण्यांत अर्थ नाहीं असें मीं ठरवलें व वायु-वेगानें बिऱ्हाडाचा रस्ता पकडला. थोडयाच वेळांत सामान—म्हणजे चार कपडे नी चव्वेचाळीस घडयाळें गोळा करून मोटरस्टॅंडवर गेलों, मात्र जाण्याच्या आधीं गणोबाला खुलाशाचें एक पत्र लिहून ठेवलें कीं, झालेल्या प्रकारानन्तर, बडयाबडया लोकांचा आपण असा अपमना केल्यानंतर, त्यांनीं पसंतीसाठीं ठेवलेलीं घडयाळें तरी परत मागूं नयेत वा किंमततरी मागूं नये, नाहीतर ते लोक आपल्याला अब्रुनुकसानीसाठीं कोर्टांत खेचण्यास कमी करणार नाहींत. माझ्यावर कायदेशीर इलाज करण्याची वगैरे कल्पना असल्यास आधीं आपल्या मुलीला विचारावें, नाहींतर आपलेंच नुकसान होईल.

सर्व्हिस मोटरनें मेनलाईनच्या एका स्टेशनाला गेलों, आणि तेथूनच आलेला तुला हा भेटतों आहे. संस्कारसमीक्षासमिती, काटदरे वॉचमेकर, आणि त्याची कुन्दा सगळेच डाव हुकले—बरें झालें एक प्रकारें, अशी दगाबाज मुलगी जन्माची गळ्यांत पडण्यापेक्षां हीं चव्वेचाळीस घडयाळें जास्त बरीं.

पण माझ्या या अनुभवावरून तात्पर्य काय निघतें असें तुला वाटतें ?

........शिवाजीनगर स्टेशनांत गाडी शिरत होती. फटफटूं लागलें होतें कांहीं लोक सामानाची आवराआवर करीत होते,

“ तात्पर्य कसलें ? ” मीं जांभई देऊन म्हणालों, “ मला तात्पर्य हेंच दिसत आहे कीं, मध्यप्रांतांत राहून देखील तूं ज्ञानप्रकाशीं भाषेशीं इमान कायम ठेवलेंस ”

आणि माझ्या म्हणण्याला पुष्टी म्हणून कीं काय बऱ्याच्या ट्रंकेंतून त्याच्या चव्वेचाळीस घड्याळांपैकीं एका घड्याळाचा गजर वाजूं लागला. समोरच्या बांकावरचा साधू जागा होऊन तिरसटपणें आमच्याकडे पाहूं लागला....



# शिकार ५.

वडगांवच्या अधिपतींकडे पिंपळपूरचे नरेंद्र पाहुणे येणार हें ठरल्यावर वडगांव संस्थानांत अपूर्व उत्साहाचें वातावरण खेळूं लागलें होतें. वडगांव आणि पिंपळपूर या दोन दूरदूरच्या राज्यांचा ऋणानुबंध नवीनच होता. वडगांवकरांच्या राजकन्येची सोयरीक चिंचियाच्या चीफसाहेबांशीं जमवून देण्याच्या बाबतींत पिंपळपूरच्या महाराजांच्या मध्यस्थीचा बराच उपयोग झाला होता, व या त्यांच्या मदतीबद्दल कृतज्ञता व्यक्त करण्यासाठींच वडगांव स्टेटकडून पिंपळपूरच्या हायनेसना मोठ्या अगत्याचें बोलावणें जाऊन त्यांचा स्वीकारहि झाला होता. तसे वडगांवकर एरवीं मोठ्या इतमामात राहणारे अशातला भाग नव्हता; दोन तीन नवे वाडे, साठसत्तर नोकरचाकर, पंधरातीस प्रजाजन आणि पितळेचे कंदील असलेल्या एकदोन अनुभविक मोटरी, हा सारा त्या राज्याचा थाटमाट. सरकारांनां शोक असे फारसे नव्हते, द्रोण-पत्रावळी लावण्याच्या वार्षिक चढाओढी, रफुगारीच्या परीक्षा, गाईम्हशी व मेंढ्या वळण्याचे सामने, किंवा नवींनवीं पुस्तकें हाताने ‘नकलून’ काढण्याचे प्रयोग, इतपतच महाराजांच्या हौशी होत्या. बोलूनचालून सव्वा तोफेच्या सलामीचें संस्थान, जास्त ऐषआराम हवा कशाला?

तथापि पिंपळपूर हें दीड तोफेचें राज्य होतें; वडगांवकरांच्या सलामीला जर एक तोफ व एक बंदूक उडविण्यांत आली तर पिंपळपूरवाल्यांच्या सन्मानार्थ एक तोफ व दोन बंदुकांची फैर झडावी अशी सार्वभौम सरकारची मंजुरी होती, तेव्हां पाव तोफ अधिकच असा ज्यांचा दर्जा, त्या पिंपळपूर नरेशांना पाहुणे म्हणून बोलावल्यावर उभ्या वडगांवराज्यांत गडबड उडून जावी यांत आश्चर्य काय ?

वडगांवची श्रीमंत स्वारी राजनीतिनिपुण होती. ज्या पाहुण्यांना आपण बोलावतो त्यांच्या आवडीनिवडी काय, त्यांना विशेष हौस कसली, त्यांना कोणत्या गोष्टींनीं सर्वांत जास्त खुषी वाटेल, वगैरे माहिती काढ-ण्यासाठीं श्रीमंत हुजुरांनीं आपले खाजगी कारभारी सरदार कोंडिबासाहेब यांना मुद्दाम (थर्ड क्लासचें भाडें व आठ आणे रोज देऊन) पिंपळपुरीं पाठविलें होतें. कोंडिबासाहेब या मुत्सद्यानें राजवाड्यावर व आसपास बारकाईनें चौकशी करून अशी बातमी आणली होती, कीं हिज हायनेस ऑफ पिंपळपूर यांना शिकार करण्याची भारी हौस आहे; खुद्द पिंपळपूर राज्यांत सारें वाळवंटच असल्यामुळें व जंगलवाले संस्थानिक भाडें घेतल्याशिवाय आपल्या जंगलांत कोणाला शिकारीला निमंत्रण देत नसल्यामुळें, आज कित्येक वर्षें पिंपळपुराधीपांच्या मनाची आस शिकार हीच एक होती. त्यामुळेंच शिकार मिळाल्यास (आणि तीहि भाडें न आकारलें जातां) ते वडगांवी पाहुणे येण्यास राजी होते.

अशी खानगी कारभाऱ्यांनीं जेव्हां खबर आणली तेव्हां वडगांवचे हुजूर विचारातच पडले. त्यांच्या राज्यांत जरी थोडें जंगल होते, तरी उदमांजरें, मुंगसें, पिसाळल्यास एकादें गांवठी कुत्रे, बिघडल्यास एकादा मारका गांवरेडा, फारफार तर दोनतीन फुरशीं आणि घोणस या पलीकडे

हिंस्र प्राणी वडगांच्या राज्याच्या हद्दींत मिळत नव्हते. राजवाड्यावरच्या दोनतीन तट्टाखेरीज खुद्द महाराजांच्या मालकीचें नामांकित जनावर म्हणजे त्यांना दक्षिणेच्या एका संस्थानिकाकडून गेल्या वर्षी नजर आलेला एकशेंदोन वर्षांचा हत्ती. तेव्हां पाहुण्यांना शिकार हवी हें ऐकून हुजूर-चरणांना बुचकळा पडला यांत नवल नव्हतें. यापूर्वी राजांतली अगदीं अलिकडची शिकार म्हणजे पोलिटीकल एजन्टच्या कचेरीचे पर्सनल क्लार्कसाहेब पाणकोंबड्या मारायला वडगांव राज्यांतल्या सुप्रसिद्ध ' दर्या-सागर सरोवर ' या ( सव्वातीन एकर क्षेत्रफळाच्या ) डबक्याकांठीं आले होते तेव्हां. स्वत: सरकारस्वारीला शिकार नुसती ऐकूनच माहित असल्यामुळे, त्या प्रसंगीं हुजूर शिकार पहाण्यास म्हणून आपल्या नव्या मिळालेल्या हत्तीवर देवपूजेचें नेसतें सोवळें पेहरूनच गेले होते. एकंदरींत राज्याला शिकारीचा अनुभव असा फार थोडा होता; तेव्हां राजवाडया-वरच्या खंडोजी हुजऱ्यानें ' एखादा माहितगार शिकारी बोलावून त्याच्या कडेच सर्व व्यवस्था सोंपवावी ' असें महाराजसरकारांना जेव्हां सुचवलें, त्या क्षणीं हुजूरस्वारीनें पेस्तर खंडोजीला 'प्रीमियम' किंवा मुख्य प्रधान नेमण्याचें अभिवचन दिलें. ( पण शिकारीचा पाहुणचार यशस्वी न झाला तर मात्र 'डिफेन्स ऑफ दि वर्ल्ड' या वडगांव संस्थानाच्या मे १९४० च्या तेराव्या कानूप्रमाणें खंडोजीला बिनमुदत देवस्थान खात्यांत डांबून ठेवलें जाईल हेंहि श्रीमंतांनीं खंडोजीला तेथेंच बजावलें. )

× × ×

शिकारीचा माहितगार तज्ञ किंवा निष्णात असा मनुष्य शेजारच्याच चुर्मुरा संस्थानांत मिळाला. मुंबई युनिव्हर्सिटीचे एकंदर लक्षण पाहून तो तिसऱ्याच मॅट्रिक-वारीनंतर सरळ उत्तरहिंदुस्तानी मॅट्रिकला गेला

होता. त्यानें डिग्रीहि त्याच बाजूला मिळविली होती. पंजाब-मॅट्रिक, अलिगड-इंटर, डाक्का-बी. ए. असे उद्योग करून अलाहाबाद एम्. ए. नंतर वाटल्यास मुंबईची पी. एच्. डी., असा सुमारें पंधरा वर्षांचा कार्यक्रम त्यानें आंखला असतां, डाक्का बी. ए. नंतरच त्याला अचानक 'डेअरी सुपरिंटेंडंट' किंवा गोशाळापंडित ही नोकरी कोलदांडा स्टेटमध्यें लागली होती. तेथून लौकरच जंजाळ संस्थानांत रेकॉर्ड ऑफिसर, जनोईराज्यांत विद्याधिकारी ऊर्फ 'डी. पी आय्.,' धोती मुलुखांत 'इन्स्पेक्टर जनरल ऑफ फॉरेस्टस्' (किंवा सरजंगल तपासनीस) हीं कामें करून तो नुकताच शेजारच्या चुर्मुरा राज्यांत मुख्य न्यायाधीश (अथवा 'चीफ जस्टिस ऑफ दि सुप्रीम कोर्ट') या हुद्यावर पांसष्ट रुपये पगारावर रुजू झाला होता. तो शिकारी होता.

त्याला सध्यांसध्यांदेखील तीनचार एकवीस तोफी राज्यांची शिकारीला बोलावणी होती. पण चुर्मुरा संस्थनच्या निबन्धशुद्धीकरणांत (किंवा 'लॉ रिफॉर्म'च्या कामांत) गुंतल्यामुळें आपल्याला येता येत नाहीं, असें कारण देऊन सर्व निमंत्रणें त्यानें नाकारली होतीं. खरें कारण म्हणजे त्याच्याजवळ तुमान नव्हती. तो पैजम्यातच सुप्रीम कोर्टाचे बहुतेक काम पहात असे—चुर्मुरा राज्यांत अम्मलदार लोकांवर पोषाखाची सक्ती नव्हती. बंदुक नसली तर शिकाऱ्याला कोणीहि ऐनवेळीं ती देते. पण तुमान नसली तर ते मित्रमंडळींत व्यक्त करायचें कसे, आणि त्यांनीं आपली नड भागवायची कशी ? मित्रांना असें कांहीं लिहितां येत नाहीं कीं 'प्रिय सहस्रार्जुनसिंहजी, चांगली एक दडस पाटलोण अंगावर असल्याखेरीज मला राजधानी सोडतां येत नाहीं'— किंवा 'मित्रवर्य वेंकटेश्वरम्, निघतो. अमुक मापाची पँट तयार ठेवा,'

अशी तारही करता येत नाहीं. सुतना घालून किंवा धोतर नेसून एखाद्या राज्याचे पाहुणे म्हणून शिकारीला जाणें या शिकाऱ्याला रुचत नव्हतें. तेव्हां शिकारींची सर्व आशा सोडून उद्योगमंत्रि (मिनिस्टर फॉर इण्डस्ट्री), देवस्थानाधिकारी ('कॉर्डिनल—खुद्द देवस्थान अधिकारी शंकरभटजी याना तो शुद्ध म्हणतां देखील येत नव्हता ते त्याचा उच्चार बालडीनळ असा करीत), 'होम मेंबर' (दमाजी फौजदार—हें खुद्द वाड्यातच रहात असत हें चतुर वाचकांनीं ओळखलेच असेल. म्हणूनच हायनेसनी यांना तो हुद्दा खास फर्मान काढून दिलेला होता.) वगैरे लोकांबरोबर तो 'फुकट्ब्रिज' खेळत बसे. शेजारच्या वडगांव राज्यातून "शिकारमाहितगार अधिकारी या हुद्यावर एक महिन्यापुरतीं आपली नोकरी उसनी मागण्यांत येत आहे, राहण्याचा सर्व खर्च व पंधरा रुपये मिळतील' असा वडगांव राज्याचा खुद्द प्रधानमंत्र्यांनीं दोन्ही वेगवेगळ्या हुजुरांचा निरोप आणल्या-वर, शिकारी कबूलच झाला बिचारा. त्यानें पांच रुपये कोषाध्यक्षांकडून मागणी करून घेतले, व जवळच्याच तालुकागांवच्या शिंप्याकडे मशीन होतें त्याच्याजवळून समोर बसून एक 'खाकी लांडी' शिवून घेतली. (खास उसन्या दिलेल्या नोकरीसाठीं चुमुरा राज्याचे सुप्रीम कोर्ट चीफ जस्टिस एक महिना गैरहजर राहिल्यामुळें कोषाध्यक्ष विसोबा पिंगुळ यांनीं तात्पुरतें सरन्यायाधिशाचेही काम पाहिलें—व त्या मुदतींत दिवाणी तुरुंगातील आपले दोन्ही मित्र मोकळे केले हे सांगावयास नकोच.)

× × ×

नवी खाकी शॉर्ट घालून नव्या एक महिन्याच्या नोकरीवर रुजू होतांना शिकाऱ्याला थोडा उत्साह वाटत होता. चुमुरा शस्त्रागारातल्या ठांसून दारू भरण्याच्या कारबिनी पाहिल्यानंतर त्याचे गळालेले हातपाय 'वड

गांवच्या हत्यारशाळेंत बिनकेपानें उडणारी एक काडतुसी बंदुक आहे' ही कुणकुण ऐकून थोडे ताठ वाटूं लागले होते.

कामावर दाखल होतांच शिकाऱ्यानें हुजूरस्वारीशीं मुलाखत केली. 'पिंपळपूरचे महाराज पाहुणे यायचे आहेत. त्यांना एक शिकार करायची आहे. व्यवस्थेला काय खर्च येईल—उचलून द्यावा लागण्यासारखा?' खुद्द श्रीमंत सरकारस्वारीनें प्रश्न केला. शिकाऱ्याचें अंदाजपत्रक मूळ रकमेच्या दहा टक्के उरेपर्यंत त्याच्यावर कपात सूचना आणून अखेर खासास्वारीनें 'दहा रुपयांच्या आसपास एकादी योजना असल्यास सांगा' असे अगदीं छातीठोक सांगितलें. शिकारी कांहीं उगाच इतक्या देशी राज्यांतून हिंडला नव्हता. त्यानें 'तेवढ्यांतहि बसवून देतो' म्हटलें, व लगेच तो कामाला लागला. बंदूक बाळगणाऱ्या चारपांच मित्रांना त्यानें संस्थानचे पाहुणे म्हणून बोलावून घेतलें. असा हत्यारांचा प्रश्न मिटल्यानंतर फक्त शिकारच पहायचें उरलें. मुलखातून एक दरवेशी अस्वल व चित्ता घेऊन जातो आहे असें कळतांच राज्याची एकोणीसच्या एकोणीस लोकांची सेना धांवत नेऊन त्या दरवेशाला शिकाऱ्यानें गराडा दिला, आणि जेवण व दोन आणे रोज या बोलीवर चित्ता—अस्वलासकट दरवेशाला संस्थानच्या जंगलांत आणून सोडलें. त्यांतल्यात्यांत दाट जंगलांतली एक विस्तीर्ण साफ जागा पाहून तेथें राज्याच्या म्हाताऱ्या हत्तीला बांधून उभे केलें आणि 'चित्त्याची व अस्वलाची शिकार तयार आहे' अशी राजाधिराजांकडे वर्दी दिली.

सरकार थोडे सचिन्त होते.

'चित्ता?' त्यांनी विचारले.

शिकाऱ्यानें मान लववली.

'आणि अस्वल ?' महाराजांनीं प्रश्न केला.

शिकाऱ्यानें मानेनें होय म्हटलें.

'पण धोका फार, बंदुका ?'

'सरकारी पाहुण्यांच्या आहेत तीनचार.'

'हत्ती उभा केला आहे जंगलांत ?'

'होय. त्याच्या पाठीवरून शिकार करायची '

'चित्त्याची ?'

'चित्त्याची'

'आणि अस्वलाची ?'

'आणि अस्वलाची'

'पण फारच धोकेबाज जनावरें,' हुजूर गुणगुणले, 'नाहीं मारता आली तर आमच्या प्रजेचा भयंकर संहार सुरू होईल !'

'ती सर्व व्यवस्था झाली आहे.' शिकारी पाठ केल्यासारखें सांगूं लागला. 'दरवेशाशीं असा करार केलेला आहे कीं गोळी लागून जनावर मेलें तर पांच रुपये त्याला द्यायचे, चुकून दरवेशाला गोळी लागली तर पांच रुपये अस्वल व चित्ता या दोघांत वाटून द्यायचे. हा करार नुकताच वडगांव राज्याचे इन्स्पेक्टर जनरल ऑफ रेजिस्ट्रेशन—'

'बरं बरं, पुढें ?' महाराज अधिरेपणें विचारू लागले.

'त्यांच्या पुढें हा दरवेशाशीं केलेला करार नोंदला आहे—'

'पण जनावरें अंगाबिंगावर तर नाहीं ना यायचीं ?'

'नाहीं. त्यासाठीं आठ दिवस त्यांच्या खाण्यात त्यांना अमली पदार्थ घालायचा; गांजाचें पाणी दिलेला चारा अस्वलाला आणि चित्त्यासाठीं

गांजा मिसळलेलें मांस असें दोघांपुढें टाकायचें, म्हणजे नाहीं साधली शिकार तरी जनावरें अंगावर येण्याचें भय नाहीं—आपले खंडोजी करणार आहेत चोख सारी त्या खुराकाची व्यवस्था. '

' आणि खुद्द शिकारीचा लवाजम काय ?'

' हत्तीच्या पाठीवरच्या हौद्यातून पाहुणे शिकार करतील. महेमान-साहेबांची स्वारी आपल्या सोयीप्रमाणें सकाळपासून संध्याकाळपर्यंत केव्हांतरी शिडीनें चढून हौद्यांत जाऊन बसेल. आपले तीनचार शिकारी पाहुणे बंदुका सरसावून हत्तीवरच महाराजांच्या भोंवतालीं सज्ज राहतील. संस्थानचे सर्व नोकर आरडाओरडा करून व डबे बडवून जंगल उठवतील, चित्ता आणि अस्वल यांना मोकळ्या जागेत बांधलेल्या हत्तीच्या आसपास आणतील व पाहुणे शिकारीवर गोळ्या झाडतील. जनावरें बहुतेक पळून जातील, त्यांच्या मागोमाग कांहीं लोक पाठलाग केल्यासारखें करतील—दुसऱ्या दिवशीं वाड्यातलें एकादें चित्त्याचें किंवा अस्वलाचें कातडे पाहुणेसरकारची शिकार म्हणून त्यांना नजर करता येईल. धोका उत्पन्न झाला तरच आपले बन्दूकवाले पाहुणे गोळी सोडतील. एरवीं इन्तजाम वरील प्रमाणें.'

' पण हत्ती बिचकला बिचकला तर ?'

' हत्तीलाही त्या दिवशीं थोडा अमली पदार्थ चारावा लागेल.'

' हं....मग चोख समजायची सारी व्यवस्था ?'

' जी हुजूर.'

× × ×

पिंपळपूर राज्याचे अधिपति हिज मॉडरेट हायनेस महाराजाधिराज सार्वभौम श्री चक्रवर्ती (१०८) दरबार महारावळेश्वर छत्रचामरेन्द्र

सिंहजी बहादुर (कैसर-इ-हिंद तिसरा वर्ग) हे वडगांव देशाचे प्रभू रावोत्तम पन्तबहादर श्रीमंत सरदार हिज मॉडेस्ट हायनेस बाजीराव चन्द्रशेखर दाजीसाहेब गंधपुले बी. एल्. आर. बेंच मॅजिस्ट्रेट यांजकडे पाहुणेही आले होते व दोघांचें थोडें राजकारणही त्यांत होतें. नरेन्द्र मंडळांत प्रेक्षकांच्या गॅलरीतील एक जागा या दोघां नरेशांना आलटून-पालटून मिळावी अशी धाडसी मागणी साम्राज्यसरकारकडे जोडीनें करण्याचा उभयता स्वाऱ्यांचा विचार होता. शिकार संपल्यावर स्वारीद्वय आपल्या राजकार्याला बसणार होतें. आज शिकारीची सारी तयारी जय्यत होती. खंडोजी हुजऱ्याचा उत्साह कांहीं विशेषच दिसत होता. संकेता-प्रमाणें सर्व दरबारी लोक रान उठवायला उभे केलेले होते. जंगलांतल्या साफ रंगणांत मध्यभागीं बांधलेला वृद्ध हत्ती निमुटपणें वडाचा व पिंपळाचा पाला चावीत उभा होता. लौकरच शिडी लावून पाहुणे महाराजांची स्वारी हौद्यांत चढली. हौद्याभोंवतालीं दुसरे शिकारी बसले. श्रीमंत वडगांवकरांची स्वारी जवळच्याच एका झाडाखालीं पितळी कंदिलांच्या मोटरींत (कांचा बंद करून) शिकार पहाण्यास उभी होती. 'शिकार माहितगार' अधिकाऱ्यानें इशारा देतांच रान उठविण्यास सुरवात झाली. बांधलेले अस्वल व चित्ता यांना मोकळे करून दरवेशानें (शिकाऱ्यांपासून स्वतःचा जीव बचावण्यासाठीं) धूम ठोकली.

थोडया आरड्याओरड्यानंतर चित्ता संथपणें मैदानात आला. पाहुणे महाराजांनीं श्वास कोंडून धरून व डोळे मिटून आपली बंदूक झाडली व थोडया वेळानें डोळे किलकिले करून काय झालें तें ते पाहूं लागले.

चित्ता जमिनीवर मागच्या पायांवर बसून पुढच्या उजव्या पायाचा पंजा चाटीत होता.

पाहुण्यांनीं आणखी एक गोळी मारली, ती चित्याच्या खांद्याला चाटून गेली—त्यानें हत्तीकडे पाहून जांभई दिली.

पाहुणे सरकारनीं दुसरी बंदूक घेऊन अगदीं दांतओठ खाऊन आणखी एक गोळी सोडली. चित्ता प्रेमळ मुद्रेनें हत्तीकडे येऊं लागला. त्याच्या तोंडावर एक मधुर स्मित विलसत होतें.

त्याच वेळेला अस्वल मोकळ्या मैदानांत उतरलें; त्याच्यावर गोळी टाकण्याची इच्छा देखील कोणाला होईना, कारण तें अस्वल मागच्या पायांवर शांतपणें चालत हत्तीकडे येत होतें.

चित्याचें लक्ष अस्वलाकडे गेलें व तोही मागच्या पायांवर उभा राहिला. नंतर त्याच्या मनांत काय आलें कोणास ठाऊक, अस्वलाचे पुढचे पंजे आपल्या पुढील पंजांत धरून तो हलकेहलके विलायती पद्धतीच्या नाचासारखी कसरत करूं लागला.

सगळेजण शिकार विसरून या विलक्षण दृश्याकडे पहातच राहिले. तें दृश्य पाहून हत्तीला देखील जागच्या जागीं स्वस्थ उभे रहाण्याचा कंटाळा आला. तोही मागच्या पायांवर उभे राहाण्याचा प्रयत्न करूं लागला—हौद्यातले व पाठीवरचे लोक सांडून खालीं पडूं लागले.

लौकरच कमेरेइतक्या खालीं सरलेल्या रिकाम्या हौद्यावर हत्ती टेंकून बसला व चित्ता—अस्वल ही जोडी त्याच्या पुढ्यांत आली; तिघांचीहीं डोकीं एके ठिकाणीं आलीं व मधूनमधून दूर उभे असलेल्या शिकाऱ्यांचा पुढच्या पायांनीं निर्देश करीत तिघे मिष्किलपणें आपासांत हांसत आहेत असें दिसूं लागलें........

× × ×

खंडोजीनें एकंदर पांच पंचवीस चित्ते, अस्वलें आणि हत्ती इतक्यांना पुरेल असा गांजा त्या जनावरांना चारला होता असें नंतर कळलें. सध्या खंडोजी देवस्थानखात्यांत बिनमुदत कैदेत आहे. वडगांव व पिंपळपूर यांची साम्राज्यसत्तेकडे होणारीं जोडमागणी रहित झाली —इतकेंच नव्हे तर ब्रिटिश सरकारच्या परवानगीनें या दोन राज्यांत घाटत असलेला 'अनाक्रमण करार' देखील जागच्या जागींच रद्द झाला.



## ६. दण्ड कोणी भरला ?

इंग्रजांनीं कोलम्बोहून परत पाठवलेले लोकमान्य टिळकदेखील इतके चिडले नसतील, पुण्याहून हिमालयाला जाणाऱ्या विराग्याची गाडी रेल्वे कंपनीनें कांहीं एक कारण न देतां चिंचवडाहून परत फिरवली तर तो सुद्धां इतक्या बुचकळ्यांत पडणार नाहीं, उन्हाळ्यांत न्हाणीघरांत जाऊन निजलेल्या मांजराला उचलून दिवाणखान्यांत आणून ठेवलें तर तेंहि इतकें चकित नि हिरमुष्टी होणार नाहीं—

इतका सौ. डॉ. प्रेमाबाईचा विरस झाला होता. बायकापोरांना औषध-पाणी करून भरभराटीस चालणारा त्यांचा दवाखाना त्यांच्या ध्येयवादाला पुरला नव्हता; याहूनहि कठोर त्याग आपल्या हातून झाला पाहिजे, देशप्रेमाच्या एकाद्या कठीण कसोटीला आपण उतरायला हवें, एकाद्या लोकोत्तर आत्मयज्ञांत उडी टाकावी, असा नैतिक नेट सारखा त्यांच्या मनाला लागला होता. त्यामुळेंच सौ. डॉ. प्रेमाबाई सत्याग्रहाच्या मोहिमेंत दाखल होऊन एक वर्षाची शिक्षा पावल्या होत्या.

त्या शिक्षेबदली साडेबाराशें रुपये दंड भरला तरी चालण्यासारखें होतें, पण डॉ. प्रेमाबाईनीं तुरुंगांतच जायचें असा निश्चय केला होता. दंड देण्यांत तितकासा त्याग, मोठीशी कसोटी किंवा विशेषसा आत्मयज्ञ

नव्हता—तें सारें वर्षाच्या ( कदाचित् ‘ ब ’ वर्गाच्या ) बंदिवासांत आहे असा त्यांचा निश्चय झाला होता.

—आणि त्या जेलखान्यांत जाऊन पोंहोचतात न पोंहोचतात तोंच कोणी दण्ड भरून त्यांना मोकळें केलें होतें ! म्हणूनच सुटून तडक दवाखान्याकडे परत येतांना त्यांच्या डोक्यांत बुचकळा आणि चीड या भावनांची चढाओढ लागली होती. कोणी बरं भरला असेल दण्ड ? पतिराजांनीं छे ? अशक्यच तें. बायको तुरुंगांत गेली तर आयतीच तिची खावट बँकेंत पडेल—एखादे वेळीं असा देखील हिशेब करणारा स्वतःचा व्यवहारी भ्रतार तिला पुरा माहीत होता. कॉंग्रेसनेंच भरला असेल का दण्ड ? नाहीं, इथल्या कमिटींत एवढा उद्योग करणारा कोणी—छे ! वर्किंग कमिटीकडून तर दण्डाची रक्कम भरली गेली नसेल ? सत्याग्रहाची मोहिम रंगली तर कॉंग्रेस हॉस्पिटल सुरू व्हायचें होतें; त्यासाठीं कॉंग्रेसनिष्ठ डॉक्टरणी लागतील असें कोणीसें म्हणत होतें खरें....

डॉ. प्रेमाबाई दवाखान्यापुढें उतरल्या. दवाखाना उघडाच होता. कपाळाची आठी कायम ठेवूनच आंत गेल्या. आपली वाट पाहात बसलेल्या बायाबापड्यांसाठीं वापरण्याचें नेहमींचें कनवाळू स्मित त्यांचा चेहरा विसरला होता. त्यांचा कांपौंडर हसत हसत पुढें आला. डॉ. प्रेमाबाई चकित झाल्या.*

बराच वेळ झाला तरी टेबलापुढें स्वस्थ बसलेल्या डॉ. प्रेमाबाई केसेसना हात लावीनात किंवा तपासणीसाठीं उठतील असेंहि दिसेना,

* कांपौंडर यूनियनच्या ११३ ( अ ) या नियमाप्रमाणें मेंबर्सना लोकांपुढें हंसण्याची बंदी आहे, त्यामुळेंच कांपौंडर आपल्या काचेच्या खोलींत स्वतःशींच हसतांना दिसतात.

कांपौंडर तिथेंच घोटाळत उभा होता. डॉ. प्रेमाबाईंनीं पाहिलें नाहीं, नाहींतर त्रिंबकरावांची मुद्रा संतुष्ट पाहून त्यांना आणखी एकदां आश्चर्य वाटलें असतें.

एकाएकीं प्रेमाबाईंच्या डोक्यांत कांहीं आल्यासारखें त्यांनीं वर पाहिलें. समोर त्रिंबकराव आहेत हें त्यांना दिसलें. त्यांनीं एकदम विचारलें,

"त्रिंबकराव, दण्ड कुणी भरला हें कळलं का ?"

'ह्यः ह्यः' ! त्रिंबकराव गुदगुल्या होत असलेल्या आवाजांत म्हणाला,

"मींच भरली रक्कम—"

"काय ?"

× × × ×

"होय, त्या कंत्राटदार वाटमाऱ्याकडचं सात बाळंतपणाचं बिल एकदम आलं, नि शिवाय या महिन्याची वसुलीहि जमली होती—"

"पण–कुणी, कुणी सांगितलीं होती ही लुडबुड तुम्हांला ?"

"लुडबुड ?"

"हा नसता उपद्व्याप कशाला केलात ?"

"उपद्व्याप ? हा चांगला न्याय आहे ! तुम्हीं हौसेनं तुरुंगांत जातां आहां हें मला काय ठाऊक ? आणि तुम्ही जाल तुरुंगांत पण माझ्या नोकरीची काय वाट ?"

प्रेमाबाई उठून दवाखान्यांतून तावातावानें निघून गेल्या.

"हें काय ? गेली प्रेमा डाक्तरीण ?" बायाबापड्यांनीं विचारलें.

"उद्यां सकाळीं येतील–" त्रिंबकरावांनीं नेहमींच्या गुर्मीत उत्तर दिलें.

आतां मात्र त्या दवाखान्याला सौभाग्य आल्यासारखें सर्वांना वाटलें....

# मिशा ७.

[illegible] युद्धाची चर्चा सुरू झाल्यानंतर, शस्त्रास्त्रांची गोष्ट [illegible] अगदीं साहजिक होतें.

"हिटलरचें गुप्त शस्त्र दुसरें तिसरें कांहीं नसून त्याच्या मिशाच होत" एका राजकारणपटूनें अभिप्राय दिला. श्रोत्यांनीं भुंवया उंचावल्याचें पाहून गृहस्थानें आपल्या आश्चर्यकारक विधानाचा अधिक सविस्तर खुलासा केला.

"हिटलरच्या मिशा ही एक 'ताबीज' किंवा जडीबुट्टी आहे; चेहऱ्यावरच्या त्या उभ्या काळ्या पट्टीकडे शत्रूचें लक्ष वेधून घ्यायचें, व याप्रमाणें तो बेसावध झाला कीं त्याला मारायचें—हें तन्त्र म्हणजेच हिटलरचें तें गुप्त शस्त्र का अस्त्र" स्वतःच्या युक्तिवादानें पूर्ण संतुष्ट होऊन राजकारणपटू मागच्या वळकटीला टेंकला. तथापि मंडळींत त्याच्या विचारपद्धतीला फारसे कोणी अनुकूल दिसले नाहींत.

"मिशांचें ऐतिहासिक कार्य हा प्रबन्धच मीं मुंबई युनिव्हर्सिटीच्या पी एच्. डी. साठीं लिहीत आहे," त्या माणसानें अगदीं बिनतोड पुरावा म्हणून माहिती पुढें केली. मंडळींतली कुजबूज चालूच राहिली.

" मिशांचें ऐतिहासिक कार्य कांहींही असो, पण एका माणसाच्या जीवनांत मात्र मिशांनीं क्रान्ती केली हें मला नक्की माहित आहे. " एक गंभीर गृहस्थ निश्चयी मुद्रेनें म्हणाला. त्याच्याकडे प्रश्नार्थक चेहरे वळले.

" माझा मित्र नाना चितारी याला मिशांच्या भानगडींत एक फक्कड पोरगी मिळाली व त्याची ऊर्जितावस्था आली–" गंभीर मनुष्य सांगूं लागला.

" त्यानें मिशा ठेवल्या म्हणून ? " एका शंकेखोरानें पुसलें.

" नाहीं. ' त्यानें मिशा ठेवल्यामुळें एक सुंदर छोकरी त्याच्यावर खूष झाली ' असें मूर्ख विधान मीं कधींही करणार नाहीं. "

" मग झालें काय ? "

" तें सगळें पहिल्यापासूनच सांगतों, " गंभीर इसम म्हणाला. कांहीं श्रोते कपाळाला हात लावून बसले व कांहीं कावरेबावरे होऊन इकडे तिकडे पाहूं लागले. कांहींनीं दुसरा विषय सुरू करण्याचे हताश प्रयत्न केले; पण गंभीर माणसानें तात्काळ मोठ्यानें सुरवात केली.

× × × ×

नाना चितारी म्हणजे एक महा भडक प्राणी म्हणून आपल्या मित्र-मंडळींत प्रसिद्ध होता. तथापि त्याच्या गुणाबद्दल प्रश्न नसल्यामुळें सगळ्यांकडे त्याचें स्वागतच होत असें. असाच तो एकदां रावबहादुर राण्यांकडे चहाला गेला असतां तेथें त्याची कोकिला महाजन नांवाच्या पोरीशीं भेट झाली. त्यानंतर वेळोवेळीं सर वजीरण्णा वडके, नामदार धोंडपगांव, दिवाणबहादूर टिळे, मंचरशा कॅशवाला आणि शेठ भिकूभाई धनजी, त्याचप्रमाणें जुहू, तुरुम्बें, ताज, मरवा, एरॉस, आणि क्रिकेट क्लब

ऑफ इण्डिया या ठिकाणींही त्यांच्या भेटी झाल्या. यावरून पुष्कळ गोष्टी उघड होण्यासारख्या आहेत: एक तर दोघांना एकमेकांचा सहवास पसंत असला पाहिजे, व दुसरी गोष्ट म्हणजे वरील ठिकाणीं फिरण्याइतकी ऐपत व वेळ दोघांना पाहिजे. कोकिला महाजनला [ ती वंगणगांवच्या श्रीमंत मल्हारराव महाजनांची मुलगी असल्यामुळें ] ऐपतीचा प्रश्नच नव्हता व वेळही पुष्कळसा होता. नाना चितारी हा श्रीमंत मित्रांशीं दोस्ती ठेवणारा एक चतुर कलावन्त असल्यामुळें त्याला विशेषशी ऐपत नसली तरी जरूर तेव्हां वेळ हवा तेवढा होता. नाना व कोकिळा यांचें हळूहळू बरेंच सख्य जमलें. आतां ती वंगणगांवाला परत गेली तरी त्याला मधून मधून पत्र लिहीत असे.

ती पत्रें हाच एक विरंगुळा नानाला अलीकडे वाटूं लागला होता; कारण त्याच्या कलेला या दिवसांत पाझर फुटत नव्हता, आणि त्याच्या अंगांत होत्या नव्हत्या त्या साध्या कला उफळून येणें याच वेळीं जरूर होतें. तीन लाख रुपयांची सिनेमा कंपनी काढून बसलेला एक तीन मण वजनाचा व्यापारी नानाला सारखा आग्रह करीत होता कीं, " तूं वॉल्ट डिस्नीच्या ' मिकी माउस ' सारखें एखादें पात्र काढ, आपण मोठ्या प्रमाणावर देशी ' कार्टून्स ' सुरू करूं. " त्या शेठजीची या ऐसपैस विधानापलिकडेही जाण्याची तयारी होती; मनाजोगता प्राणी रौप्यपटावर आणता यावा, म्हणून नानाला सढळ हातानें द्रव्य देण्यासही तो तयार होता. नानालाच मात्र कांहीं सुचत नव्हतें; ' कावळोबा काळे ' आणि ' बगळोपंत पान्ढरे ' ' तिमाजी कोल्हे ' आणि ' चिमाजी घुले ' असे अनेक प्रकार त्यानें करून पाहिले, पण त्याच्या चितारी कसबांत जीव येत नव्हता. तो काढीत होता त्या चित्रांना त्याचे मित्र अगदीं पोट

धरधरून हांसायचे, पण मुलांनीं तींच चित्रें पाहिलीं तर त्यांच्यावर कांहींच परिणाम व्हायचा नाहीं. ज्याला पाहतांच आबालवृद्धांना गुदगुल्या होतील असा एकही प्राणी नानाच्या कुंचलींतून निघत नव्हता. डोकें खाजवून खाजवून तुटलेल्या त्याच्या केसांच्या पुंजक्यांनीं त्याच्या चित्र-शाळेची जमीन नमदा टाकल्यासारखी दिसण्याची वेळ आली, पण अखिल हिंदुस्थानाला हांसवील असें 'ठठ्ठाचित्र' ('कार्टून' चें गुजराती नांव) नानाला सुचेना.

अशा परिस्थितींत कोकिळेच्या नव्या पत्रानें त्याला पुन्हां थोडा धीर आला. तिनें लिहिलें होतें, 'तुमच्याकडून तसबीर रंगवून घ्यायची असें माझ्या आग्रहावरून बाबांनीं ठरवलें आहे. त्यासाठीं इथं वंगणगांवीं येऊन महिना पंधरा दिवस तुम्हाला राहायला पाहिजे. चित्राला योग्य ती किंमत मिळेलच—पण फार खूष होऊं नका; दोघा तिघा नामांकित चित्रकारांनीं हात टेकले आहेत—आमच्या बाबांच्या मिशा—त्या पाहिल्यात म्हणजेच तुम्हाला कळेल.'

तसा नाना हा प्राणी कोणाच्या मिशांना डरणारा नव्हता. तसबीर रंगवायचें काम आलें आणि तें देखील आपल्या आवडत्या तरुणीच्या घरीं, इतकें समाधान त्याला पुरें होतें. दुसऱ्याच दिवशीं पंधरा दिवस मुक्कामाचें सामानसुमान व चित्र काढण्याची सामुग्री घेऊन तो वंगणगांवीं जाण्यास निघाला. (बरोबरीच्या सामुग्रींत भरपूर काळा रंग बरेचसे बारीक ब्रश घेण्यास तो विसरला नाहीं.)

× × ×

वंगणगांव स्टेशनवर तो उतरतो तोंच 'म्हाजनांचे पाव्हने कोन?' असें पुकारीत एक चाबूक घेतलेला मिशाळ मनुष्य प्लॅटफॉर्मवरून जात

होता, तोच आपल्या प्रेयसीकडचा सारथी हें ओळखून नानानें आपलें सामान त्याच्याजवळ दिलें. लौकरच त्याला घेऊन महाजनांची चारचाकी गांवाकडे निघाली. गांव बाजूला टाकून ती चांगली कोसभर गेल्यानंतर एका बागेंतल्या जुनाट बंगल्यापुढें गाडी थांबली. नाना उतरून आंत दिवाणखान्यांत गेला. सगळा वेळ त्याला वाटत होतं कीं कोकिळा कुठं आहे ?

दिवाणखान्यांत एक भव्य गृहस्थ बसला होता. त्याचा निम्मा भव्य-पणा त्याच्या मिशांत होता. त्या तोंडाकडे पाहून नानाला क्षणभर वाटलें कीं, गवताच्या गंजीआडूनच कोणी आपल्याकडे पाहत आहे. एक वेळ त्याला शंका आली कीं डांस मारायच्या चवऱ्या तर या माणसानें दातांत धरल्या नाहींत ? शाईच्या धबधब्याचे प्रवाह खालीं खोल पडत असल्याप्रमाणें त्या माणसाच्या नाकाखालीं उगवलेल्या मिशा ओसंडत होत्या. ओठाच्या भोंवतालीं तर रानच माजलें होतें. नाना आलेला पाहून त्या गृहस्थानें मिशा विंचरणें बंद केलें आणि कंगवा व आरशी खिशांत ठेवून दिली.

कांहीं म्हणा, पण पूर्वीसारख्या मिशा आजकाल दिसत नाहींत. सुजा-उद्दौला, सुरजमल जाट, महादजी शिंदे, लॉर्ड लिटन वा डफरिन या ऐतिहासिक व्यक्ती घ्या, किंवा अलिकडचे कैसर, किचनेर, कॉनन डॉइल, मार्क टेन, हे लोक पहा—फार कशाला, आपल्या महाराष्ट्रांतलेच आगरकर, गणेश जनार्दन आगाशे, फेरोजशहा मेहता किंवा इचलकरंजीकर बुवा यांचीं चित्रें बघा—वाटल्यास आजच्या जमान्यांतील राजेन्द्रबाबूंच्या मिशा आठवा, माटे मास्तरांचें स्मरण करा, किंवा 'हरलों तर यशवंत गोपाळ जोशांसारख्या मिशा वाढवीन' ही प्रल्हाद केशव अत्र्यांची घोर प्रतिज्ञा

सिद्धीस गेल्याचें कल्पनाचित्र डोळ्यापुढें आणा—आपल्याला खास पटेल कीं पुरुषाच्या कर्तृत्वांत मिशांचा भाग फारच महत्त्वाचा आहे. तथापि आतां पूर्वींच्या त्या ठळक मिशा दिसत नाहींत. भलें थोरलें चक्री पागोटें आणि गजरेदार मिशा एवढ्यावर पृथ्वीचा भार शेषानें मस्तकावर धारण केल्यासारखें भव्य चित्र उभें करणारे मोहरे अलीकडे आढळत नाहींत. खांद्यापर्यंत लोळणाऱ्या मिशांच्या रुबाबांत पहिलवानी पवित्र्यांत फोटोला बसणारे संस्थानिकहि आतां राहिले नाहींत. नानाला स्वतःला मिशा नव्हत्या तरी समोरची पैदास पाहून असे विचार त्याच्या मनांत येऊन गेल्याविना राहिले नाहींत.

'आपल्या मुलीनं आपली ओळख अगोदरच करून ठेवलेली आहे, आतां प्रत्यक्ष भेट झाली!' नानानें औपचारिक सुरुवात केली.

'तिळा उघड' असें म्हणतांच अलीबाबाची गुहा उघडल्यासारखा त्या माणसाचा जबडा मिशांत उघडलेला दिसला.

'मला मुलगी नाहीं.' तो म्हणाला.

'म्हणजे? कोकिळाबाई सांगत होत्या कीं—मिशांवरून तिच्या वडिलांना सहज ओळखता येईल. ह्यः ह्यः!' नाना थोडा ढेपाळून म्हणाला. त्या गृहस्थाला नानाचें म्हणणें रुचलें नाहीं असें दिसलें.

'कोकिळेचा बाप मीं नाहीं. असं भलतंच कसं वाटलं तुम्हांला?'

'माफ करा. मल्हारराव महाजनांना चांगल्या भव्य मिशा आहेत असं मीं ऐकलं होतं—'

'कोण म्हणतो? कोण लेकाचा म्हणतो कीं मल्हारराव महाजनाला भव्य मिशा आहेत? मला तरी तसं वाटत नाहीं—भव्य मिशा! हेट्!'

‘ चूक झाली माझी. आपण मल्हारराव महाजन नव्हे तर ?’

‘ मुळींच नव्हे. यत्किंचिही नाहीं. मीं मल्हारराव महाजन नसून खण्डेराव खोत आहे—’

तितक्यांत एक गोळीबन्द कोऱ्या चेहऱ्याचा मनुष्य आंत आला—

‘ आणि हे आमचे चिरंजीव–या बाळेराव.’

या नव्या माणसाला नानानें नमस्कार केला. त्यानेंही वडलांचें वळण ओंठावर गिरवण्यास सुरवात केली होती. मुलगा बापाचा लाडका दिसला.

तितक्यांत आंतल्या दारानें कोकिला आली. ‘ सॉरी, मला यायला झालं नाहीं स्टेशनवर–चला तुम्हांला तुमची खोली दाखवते.’ ती एका दमांत म्हणाली. ‘ खण्डेराव आणि पुत्र’ यांचा निरोप घेऊन खोलीकडे जातां जातां नानानें तिला विचारलें,

‘ वऱ्हाडी आणि गणगोत मिळून साधारण किती पाहुणे आहेत ?’

‘ म्हणजे ?’

‘ मी समजलों होतों कीं तसबीर रंगवायची म्हणजे तुझे वडील, मी–आणि जवळच तूं–एवढी मंडळी फारतर असतील. बघतों तो ही जत्राच भरलेली दिसते इथं. ‘ जाहीर सभेंत चित्रकलेचें प्रात्यक्षिक’ असा कांहीं चावटपणा आहे–का आहे काय ? का लगीन व्हायचं आहे इथं ?’

‘ तुम्ही कसं ओळखलंत ?’

‘ म्हणजे ?’–म्हणून नाना एखाद्या जुन्या पायपेटी सारखा मिटणारसें दिसूं लागलें.

‘ ही तुमची खोली. बरी आहे ना ?’

' पण—पण तुझं खरोखरच लग्न आहे कीं काय ?'

' ठरण्याच्या बेतात आहे.'

' कुणाशीं ?'

' आतांच पाहिले नाहींत का ?'

' बाळेराव का ?'

कोकिलेनें होकारार्थीं मान डोलवली.

' हरहर !, नाना डोळे मिटून म्हणाला. एकदम चिडून त्यानें विचारलें, ' ही काय बदमाषी आहे ? मला उगीचच बनवीत होतीस होय ?'

' अहो हलके बोला. बनवीत कसली होते ? मला हौस आहे कीं काय त्या बाळसेदार बाळ्याची ?'

' त्याला निदान मिशा नाहींत...' नाना अर्धवट स्वतःशीं म्हणाला.

' पण तोही तशी बागाईत करणार आहे मोठेपणीं ' कोकिळा सांगूं लागली, ' असं आपलं सुखस्वप्न काल्च सांगितलंन् त्यानं मला.' कोकिळेच्या अंगावर एक शहारा येऊन गेला.

' तुला त्याच्याशीं लग्न नको आहे हें तूं आपल्या वडलाना स्पष्ट सांगितलंस ?'

' उपयोग काय ? खोतांची कित्येक लाखांची इस्टेट आहे—शिवाय कायदेशीर रीतीनं वयांत आले नाहीं मी अजून. त्याखेरीज ' बाळेरावाला माझीच मुलगी देईन ' अशा इरेस पेटले आहेत ते बडवे इनामदाराच्या विरुद्ध—नि बाबा इरेला पेटले कीं मुलीला देखील मुलगी देतील—मग त्या शंभ्याची गोष्ट काय ? स्वतःचं तें मिशांचं छप्पर देखील बाबांनीं या खण्डेरावांची तेढ धरून वाढवलं आहे. दोघांनांही उद्योग नाहींत या गामढ्यांत राहून, मिशा वाढवायची चढाओढ लावतात !'

‘ मग तूं माझी होण्यासाठीं कांहीं मार्ग ? ’

‘ तुम्हीच काढा कांहींतरी. एकदोन महिने तरी लग्न लागायला आहेत अजून. ’

‘ ठीक आहे. ’ नाना धीरोदत्त आवाजांत म्हणाला.

× × ×

मल्हारराव महाजनांच्या मिशांबद्दल त्यांच्या मुलीनें दिलेला इषारा अगदीं वाजवी होता हें नानाला त्यांची तसबीर काढूं लागतांच पुरें पटलें. मल्हारराव ‘ बसणारा ’ या दृष्टीनें जरी त्रासदायक नव्हते तरी त्यांच्या मिशा भयानकच होत्या. खण्डेराव खोतांच्या मिशा डोंगरदरडीवरून डोकावणाऱ्या दाट गवताप्रमाणें भासल्या तर मल्हाररावांच्या नदीच्या कांठावर माजलेल्या ताठ लव्हाळ्यासारख्या होत्या. मल्हाररावांनीं खण्डेरावांपेक्षां जास्त तडफ दाखवण्याकरतां आपल्या झुपक्यांना ‘ उ ’ कारान्त उर्ध्व वळण लावलें होतें. त्यामुळें महिरपी मिशांनी युक्त अशा खण्डेरावांच्या मुद्रेवरील गंभीर आत्मविश्वासाला तोड म्हणून कीं काय, मल्हाररावांच्या चेहऱ्यावर उग्र आश्चर्याचा एक कायम भाव विलसत होता. ‘ इतिहासप्रसिद्ध तरवारींप्रमाणेंच मिशांनाही नांवें कां नसावींत ’ असें वाटून कोकिलेनें खण्डेराव खोतांच्या मिशांना ‘ दख्खन–दिमाख ’ व मल्हाररावांच्या मिशांना ‘ सुलताना रेझिया ’ अशीं आवडतीं नांवें दिलीं होतीं.

पण चित्रकार या नात्यानें त्या मिशा थट्टेवर नेण्यासारख्या नव्हत्या. त्यांची एक अजब नजरबन्दी चित्रकारावर पडूं लागे; कित्येक चित्रकारांनीं प्रथम भराभर उभ्या काळ्या रेषा काढून भोंवतालीं चेहरा

रंगवण्याचा प्रयत्न करावा, तर कोणी एक बिनमिशांचा चेहरा कल्पून अखेर एकदम त्याच्यावर एक काळा पुंजका रंगवून पहावा–पण एकाही चित्रकाराला त्या घनदाट अरण्यांतून मार्ग सांपडला नव्हता. उदासीनपणें तसवीर रंगवण्याचा आविर्भाव करतां करतां नानाला वाटे, कीं या गृहस्थाचा चेहरा मिशांशिवाय कसा दिसत असेल–कां पाहणाराला 'याला मिशाच बऱ्या' असें वाटायला लावण्यासारखा तो असेल?

'त्या मिशा कशा साधणार?' या काळजीनें नानाला जागरणें होऊं लागलीं. त्याला अन्न गोड लागेना आणि जिथेंतिथें तो बाळेराव असल्यामुळें कोकिळेचा सहवासही त्याला हवा तसा मिळत नव्हता. अशा हैराण परिस्थितींत मल्हारराव महाजनांचा जुना नोकर धर्माजी–घरांतल्या साऱ्या नोकरांचा दादा–हा त्याच्या साहाय्यास धांवून आला [ धर्माजीच्या मिशा फारच वाजवी प्रमाणांत तुरपलेल्या होत्या ] एके दिवशीं तो दुपारचा चहा नानाच्या खोलींत घेऊन आला, तेव्हां नाना चितारी आपल्या दोन्ही हातांच्या मुठींत डोक्याचे केंस घट्ट धरून बसलेला त्याला आढळला.

'मालकांच्या मिशा नडत्यात जनू चितारी साहेबांना?' धर्माजीनें नम्रपणें विचारलें. नानानें विष्णूकडे पाहणाऱ्या गजेन्द्राच्या डोळ्यानीं त्याच्याकडे पाहिलें. धर्माजी फारच मायाळू. स्वभावाचा असल्याचें नानाला आढळून आलें. पूर्वीं तसबिरी काढण्यास येऊन गेलेल्या चिताऱ्यांचे हाल धर्माजीनें वर्णन केले. एक बंगाली चितारी अखेर झोपेंत उठून वस्त्राचीही शुद्ध न राहतां बागेंतल्या वडाच्या पारंब्यावर कसा चढूं लागला, दुसऱ्या एकजणानें नुसत्या कांद्याच्या हिरव्या पाती खाऊन 'मिशा' 'मिशा' म्हणून मल्हाररावांची तसवीर रंगवण्याचा प्रयत्न कसा केला, अशा अनेक गोष्टी धर्माजीनें नानाला सांगितल्या.

'पण तूं बरेच दिवस यांच्याजवळ आहेस. तुला संवय झाली असेल या मिशांची–तरुणपणीं त्या इतक्या नसतील—'

'गेल्या सालापावेतो इकश्या नोहत्या. गेल्या हंगामाला खोतसाहेबाशीं डिष्ट्रिक बोर्डांत मालकांची झकाझकी झाली. मग मालक म्हणाले, 'ह्यो कोंबडिचा आपल्या मिशांचा लई रुबाब मारतो–पुढल्या हंगामाला ह्याच्यापरीस भारी मिशी नाहीं पिकवली तर मिशीच उतरून देईन' म्हणून ही औस्था आली.' धर्माजीनें एक निश्वास सोडला.

'मिशा नव्हत्या तेव्हां कसे दिसत होते हे ?'

धर्माजीला हंसू आलें. 'कोळ्याच्या पाटीतल्या माशावाणी. पण आतांपेक्षां तें बरं.' तो उद्गारला.

'मला वाटलंच ! कारे तूं सिनेमा पाहतोस का ?'

'कधींकधीं पाहतो जी–आजच जानार है.'

'कारे, तुझ्या मालकासारख्या चेहऱ्याचा एखादा मासा जर सिनेमांत दिसला तर ?'

'लई हसूं येईल लोकांना !'

नाना चिताऱ्याच्या डोळ्यांत कसली तरी मोठ्या कल्पनेची चमक आली.

'मग हें बघ धर्माजी, मालकांचा बिनमिशांचा चेहरा बरा वाटतो ना तुला ?'

'आतांपेक्षां बरा—'

'त्यांना मिशा नसल्या तर मलाही त्यांची तसबीर ताबडतोब साधेल.

मल्हाररावांना मिशा नसाव्या असें आपणा दोघांनाही वाटतं खरं कीं नाहीं ?'

'व्हय जी.'

'समज, कुठल्याही कारणानं त्या मिशा उडाल्या, एका रात्रींत नाहींशा झाल्या,तर आपल्याला दोघांना कांहीं वाईट वाटणार नाहीं नव्हे ?'

'जी.'

'इतकंच नव्हे तर समाधान होईल, होय ना ?'

'व्हय धनी'

'मग तुझी मदत मला पाहिजे–पण कुणी नाहीं ना आसपास ?'

'नाहीं–सारी मंडळी खोताच्या मळ्यांत गेली हैती.'

'मीं आज रात्रीं मल्हाररावांच्या मिशा कापणार, तोडणार, उडवणार–त्यांचा निःपात करणार–पण तूं एक केलं पाहिजेस.'

'काय साहेब ?'

'ते झोपले असतां मला त्यांच्यापर्यंत पोहोंचवणं—'

'तें सोपं है. मालक भाएर झोंपाळ्यावर झोंपतात त्या जाइच्या मांडवाजवळ.'

'त्यांना गाढ झोंप लागते का ?'

'झोंपेची गोळीच घेतात ना ? एक गोळी एक गलास दुधांत टाकून मी सवताच रात्रीं धाला त्यांच्या उशाजवळ न्यून ठिवतो.'

'उत्तम. मग तुझं काम इतकंच कीं, तूं एका गोळीबदली तीनचार गोळ्या दुधांत टाकायच्यास.'

' पण सायब—'

' पणबीण कांहीं नाहीं. मल्हाररावांना ' निर्मूळ ' करणें हें एक पुण्य-काय आहे, समजलास ? '

' जी '

' मग मी तुझ्यावर भिस्त टाकून आपलं पुढचं काम करीन—करूं ना?'

' हूं...' म्हणून धर्माजी खालीं मान घालून निघाला.

' ए धर्माजी ऐक, तूं एवढं काम केलंस, आणि मी माझं काम केल्यानंतर जर तुझ्या मालकाचा चेहरा एखाद्या माशासारखा निघाला, तर आपलं भाग्य उदयाला येईल असंच समज. तुझ्या मालकाच्या चेहऱ्यावर मीं जी अलोट संपत्ति मिळवीन तिच्यांतला तुझा हिस्सा तुला दिल्याविना मीं कदापि रहाणार नाहीं. एके दिवशीं तुझ्या झोंपडी-पुढें—झोंपडी आहे कां तुझी ? '

' है जी '

' तुझ्या झोंपडीपुढं सोन्यारुप्यानं आणि माणिक मोत्यांनीं लादलेले हत्ती, घोडे आणि उंट, त्याचप्रमाणं गाढवं व खेचरं यांची रांग येऊन उभी राहील—पण त्या दुधाच्या ग्लासांत गोळ्या टाकायला मात्र विसरूं नकोस. '

× × ×

दुसऱ्या दिवशीं सकाळीं नाना खुशींत जागा झाला. त्याच्या कलावन्त आत्म्याला लागलेली तळमळ त्यानें रात्रीच एका तीक्ष्ण कात्रीनें छाटून टाकली होती. मध्यरात्रीं झोंपाळ्यावर घोरणाऱ्या त्या बेसावध गृहस्थाच्या मिशा नानानें आपल्या कात्रीनें अगदीं पुऱ्या कापून टाकल्या होत्या

तोंडबिंड धुऊन दिवाणखान्यांतल्या टेबलापाशीं वर्तमानपत्र चाळीत तो चहाची वाट पहात बसला असतां त्याला एकच विचार समाधान देत होता, कीं आजची तसबीर रंगवण्याची बैठक सुखाची होणार; मिशांचें जंजाळ उडविल्यानंतर मल्हारांवाचा चेहरा जर खरोखरच मच्छीसारखा दिसला तर पडद्यावरील एक हुकुमी चेष्टा–चित्र आपल्याला मिळेल. पडेल बोलपट आपल्या ' कार्टून ' बरोबर दाखविल्यामुळें दोनदोन आठवडे जास्त देखील चालतील....काय नांव द्यावें बरें या पात्राला ? ' मच्छिंदरसिंग ? ' ' पाप्लेटखां ? ' ' मासोबा ? ' नको 'मासोपन्त ?'— मासोजी ? बस्स ' मासोजी म्हावरे ' ! छान् !...

' मालक छाला आले न्हैत जनू ?' धर्माजी आपल्या देखरेखीखालीं वाढप्याकडून चहा देत म्हणत होता. नाना थोडा दचकला, पण लगेच धर्माजीकडे पाहून सस्मित म्हणाला,

' झोंपले असतील. झोप चांगली येते बरं का तुझ्या मालकांना. चळवळ करीत नाहींत मुळींच, एकदां निजले म्हणजे—'

' फिरून काल त्यांच्या दुधाच्या कपांत, झोपेच्या गोळ्याही माझ्या हातून एकदोन जास्ती पडल्या. ' धर्माजी एका कपाकडे पाहात गंभीरपणें म्हणाला. एकाएकीं त्याला कसली तरी आठवण होऊन हांसू आलें.

' कालच्या सिनेमांत लई गम्मत साहेब–हातांनीं काढलेल्या चित्रावाणी एक फिल्लुम होती–अन् त्यांत एक असं वेडशिवं पात्र होतं, हा–हा ! नांव काय तर म्हणे ' मासोजी म्हावरे ' ! "

मुंबईहून रात्रीच्या गाडीनें पुण्याला जाणाऱ्या माणसानें सकाळीं जागें होऊन पहावें आणि त्याला मुंबईच दिसावी असें नानाला झालें.

'मासोजी म्हात्रे म्हणून मासा आहे त्या सिनेमांत?'

'लई चावनट मासा—हासून बेजार झालों मीं!'

पडलेल्या बंगल्याचीं पानें गोळा करायला देखील नानाला वेळ मिळाला नाहीं.

'अरे वा! चहा आलाच वाटतं?' म्हणत घराचे यजमान श्रीमंत मल्हारराव महाजन टेबलाच्या रोखानें आले. टेबलावरच्या चहावर—आणि त्यांतल्या त्यांत खाण्याच्या पदार्थांवर—त्यांची करडी नजर फिरत होती. स्वारी खुषींत होती.

पण नानाचें लक्ष एकाच गोष्टीकडे होतें, मल्हाररावांच्या मिशांकडे—त्या मिशांचा केसन् केस जाग्यावर होता! या क्षणाला नानाच्या समोर त्या मिशांनाच मल्हारराव चहाचें पाणी देत होते. झोपेंचें औषध या माणसानें घेतलें कां आपण?' असा दुष्ट संशय नानाच्या मनाला यायला लागला. इतक्यांत बाळेराव घाबऱ्या घाबऱ्या आले.

'काका, बाबा नाहींसे झाले!' त्यांनीं उद्गार काढले. दो बाजूच्या केंसाळ साताच्या आंकड्यांनीं आधींच प्रश्नार्थक अस-णारा मल्हाररावांचा चेहरा अधिकच प्रश्नार्थक झाला—ते घोगऱ्या आवाजांत ओरडले,

'काय? म्हणता आहांत काय बाळेराव?'

'खरंच,' बाळेराव तक्रारी आवाजांत सांगू लागला, 'रोज सकाळीं दूध पिण्याची वेळ झाली म्हणजे बाबा येऊन मला उठवतात. आज कांहीं आले नाहींत! त्यांच्या खोलींत पाहिलं तर तिथंही नाहींत!'

' हात्त्याच्या ! ' मल्हाराव हांसून म्हणाले, ' मला वाटलं, काय झालं ! खण्डेराव आपल्या खोलींत झोपलेच नव्हते काल रात्रीं. त्यांची ' झोंप येत नाहीं ' अशी तक्रार होती म्हणून मींच त्यांना बागेंतल्या झोंपाळ्यावर निजा म्हटलं—'

' काय ? ' नाना म्हणाला.

' म्हणून माझ्या नेहमींच्या जागीं काल रात्रीं खण्डेराव निजले होते.'

' पर—पर म्यां तर औषधाचा गल्लास उशाशीं ठेवला होता झोंपाळ्याच्या—' धर्माजी चांचरत म्हणाला.

' वाहवा ! तोही ते प्याले असतील ! आज चांगलीच गाढ झोंप लागली असेल खंडेरावांना ! ' मल्हाररावांच्या हांसण्यानें दिवाणखाना हादरून गेला. इतक्यांत घाबऱ्या घाबऱ्या बागेंतून कोकिळा आली.

' बाबा, बागेंत एखादी बकरी मोकळी सुटली होती का काल रात्रीं ? कारण खण्डेरावकाकांच्या मिशा झोपेंत कोणी तरी कुरतडून टाकल्या आहेत—'ती सांगू लागली.

नानाच्या मनानें एक उचल खाल्ली. मल्हाररावच्या नाहीं तरी निदान खंडेरावच्या मिशा झडल्या होत्या. त्या मिशांच्या आंतला त्यांचा चेहरा एखाद्या नव्या प्राण्याची कल्पना देईल कदाचित्—

पण तितक्यांत एक भयंकर संतापलेला मनुष्य दिवाणखान्यांत आला; प्रथम तो कोणाला ओळखूंच येईना, पण त्याच्या ओरडण्यामुळें कळलें—कीं ते खण्डेराव खोतच होते. त्यांच्या सफाचट चेहऱ्यानें नानाची पूर्ण निराशा झाली; ' एक ' निर्मिश ' माणूस ' या पलीकडे खंडेरावच्या नव्या चेहऱ्यांत चित्रकाराला स्फूर्त करील असें कांहींच वैशिष्ट्य नव्हतें.

खण्डेराव मल्हाररावकडे रोखून पहात होते. मल्हारराव चहा–फराळा-वर ताव मारीत होते. प्रतिस्पर्ध्याच्या चेहऱ्याकडे एकदांच तुच्छतेनें पाहिल्यानंतर त्यांना पुढच्या खाण्यापिण्याची अधिक निकड लागलेली दिसली.

‘ ही दगलबाजी, आं ?’ खण्डेराव खेंसकले.

‘ कसली ?’ मल्हारराव संथपणें म्हणाले.

‘ माझ्या मिशांशीं बरोबरी करतां येत नाहीं म्हणून अशा भ्याड मार्गानं जातां काय ? बेसावध माणसावर हल्ला ? तुमच्या घरीं आलेल्या पाहुण्याचा असा विश्वासघात ?’

‘ तुमच्या मिशा मीं उडवल्या म्हणता कीं काय ? जरूर काय मला असल्या भिकार मिशांशीं स्पर्धा करायची ? कापणी झाल्यावरच्या भातखेंचरसारख्या त्या दरिद्री मिशा ! मीं कशाला कापायला जाऊं त्या ? बाकी गेल्या हें बरंच झालं एक प्रकारें, तुमचा चेहरा पुष्कळ बरा दिसतो बिनमिशांनीं ’ मल्हाररावांनीं अभिप्राय दिला.

‘ मल्हारराव, माझ्या मिशा गेल्या रात्री कापल्याचें कबूल करता कीं नाहीं बऱ्या बोलानं ? ’

‘ कां म्हणून ? तुमच्या तोंडावरचे चाई लागलेले ते दरिद्री मिशांचे पुंजके—’

‘ खामोष ! ’

‘ माझं म्हणणं इतकंच कीं कोणी तरी परोपकारी माणसानं येऊन हें काम मुकाट्यानं केलेलं दिसतं. एकंदर रयतेवर उपकार केलेन् त्यानं मोठे तुमच्या त्या भुक्कड मिशा बोडून.’

'बस्स! तुम्ही इतके उलट्या काळजाचे असाल कल्पना नव्हती मला!'

'झालं हें वाईट नाहीं असं मला वाटतं—उगीच खोटं कशाला बोलूं? पण मीं तें काम केलं नाहीं—'

'पुरे करा! या घरांत एक मिनिटही राहण्याची माझी इच्छा नाहीं!'

'मर्जी तुमची!'

'आणि आपली सोयरीक मोडली—या क्षणाला मोडली!'

'जशी तुमची इच्छा. चहा तर घ्या थोडा—'

'चला बाळेराव!' खंडेराव चिरंजिवाकडे वळून म्हणाले. 'या दगाबाज लोकांकडे घोटभर पाणी देखील प्यायला नको मला! चला, या क्षणाला आहोंत तसे इथून निघून जाऊं!' बाळेराव आज्ञाधारकपणें उठून बापाबरोबर दरवाज्याकडे निघाले.

'तुमचं सामान स्टेशनवर पाठवूं का?' मल्हाररावांनीं जागेवरूनच विचारलें.

'वाटेल तिकडे मसणांत पाठवा!—पण,' दारांतून थोडे परतून खंडेराव गरजले, 'डिष्ट्रिक्ट बोर्डांत माझ्याशीं गांठ आहे हें लक्ष्यांत ठेवा'

'कांहीं केलंत तरी मिशा कांहीं पुन्हां वाढत नाहींत तुमच्या!' मल्हारराव हांसून बोलले. खण्डेराव आणि पुत्र चालते झाले. अशा अनपेक्षितपणें मोडलेल्या त्या लग्नानें थक्क होऊन नाना चितारी व कोकिला महाजन एकमेकांकडे पहात बसलीं होतीं.

'हें काय भलतेंच झालें—पण झालें तें ठीकच झालें' असें नानाला

वाटत होतें. कोकिळेच्या डोळ्यांत एक नवी आशा चमकत असलेली त्याला दिसली.

'काय मूर्ख मनुष्य आहे!' मल्हारराव म्हणत होते. 'त्याच्या मिशा तोडायला मीं कशाला जाऊं? त्याच्याच मुलानं उडवल्या असतील त्या एखादे वेळीं. रोज तो चेहरा पाहून पोरगाही कंटाळला असेल. नाहीं तर मला वाटतं खण्डेरावच्या गांवकऱ्यांनींच वर्गणी करून एखाद्याला पाठवलं असेल तो कचरा काढून टाकायला!'

नानाचें त्या बोलण्याकडे इतकेंसें लक्ष नव्हतें. कोकिळा आपली होण्याचा आतां बराचसा संभव उत्पन्न झाला, असे गुलाबी विचार त्याच्या डोक्यांत चालले होते—मध्येंच आपल्याला उद्देशून मल्हारराव कांहीं बोलतो आहे हें त्याच्या लक्षांत आलें.

'काय?'

'कांहीं नाहीं, काडी मागतो आहे मीं विडी पेटवायला, तुमचं लक्ष आज दुसरीकडेच आहे कुठं!'

यजमानाकडे दुर्लक्ष केल्याची भरपाई म्हणून नानानें शहरी ऐटींत काडी पेटवून मल्हाररावांच्या विडीखालीं धरली. त्याचे विचार दुसरीकडेच होते; कोकिळा आपली झाली तर आपण तिचीं कशीं कशीं चित्रें काढूं—

एकाएकीं किटसनची बत्ती भडकल्याप्रमाणें भपकन् जाळ होऊन एक करपट घाण नानाच्या नाकांत शिरली व कोणी तरी कळवळून फोडलेल्या डुरकणीनें सारा दिवाणखाना दुमदुमून गेला. नानानें दचकून मल्हाररावांकडे पाहिलें. त्याच्या हलगर्जीपणामुळें त्याच्या पेटल्या काडीनें मल्हारराव महाजनांचा चेहरा निर्मूछ झाला होता!

पहिला धक्का कमी झाल्यावर ते भयंकर खवळले—पुढल्या कप, बशा, किटली वगैरे हत्यारांनीं नानावर त्यांनीं हल्ला सुरू केला.

नाना ते घाव चुकवीत इकडून तिकडे पळूं लागला. पण तेवढ्यांत मल्हाररावांचा चेहरा त्यानें नीट पाहून घेतला.

‘ पळा, जीव बचावा ! ’ कोकिळा ओरडली.

नाना त्या तयारींतच होता, पण आणखी एकदां त्यानें तिच्या वडलांचा चेहरा पाहून घेतला—

जयश्रीएकलिंगजी ! सांपडला ! मिळाला.

रौप्यपटावर अमर होणारा प्राणी नानाला त्या क्षणाला दिसला—

डराकराम बेडूक !

मल्हाररावांचें जंगल जळून उरलेल्या चेहऱ्याच्या या स्फूर्तीमुळें त्यांनीं फेंकलेल्या खुर्चीचें त्याला कांहीं वाटलें नाहीं. दिवाणखान्याबाहेर निसटतां निसटतां तो ओरडला,

‘ कोकिला ! ’

‘ ओ—सांभाळा, बाबा अरगीन फेकताहेत ’

‘ कोकिला, माझी भाग्यरेषा उमटली ! ’ बागेंतून फाटकाकडे जात जात, नानानें पुकार केली, ‘ आतां यापुढं पैसाच पैसा ! तूं माझी होशील ना ?’

‘ हो—पळा, पळा, बाबा बंदूक आणायला वर गेले आहेत ! ’

‘ मुंबईला येशील ना ? ’

'तुमच्या पाठोपाठ—जा आतां लौकर!'

नानानें घाईघाईत तिच्या मुखचंद्राचें शेवटचें दर्शन घेतलें. त्या धांवपळींत देखील सारी पृथ्वी आपल्या पायाशीं आहे असें त्याला वाटत होतें.

—आणि खिडकींत दिसलेला धर्माजीचा कृतज्ञ चेहरा त्याला धीर देत होता.



# बकऱ्यांची घटना परिषद्                                   ८.

शेगांव मुक्कामीं गांधी महाराजांजवळ असलेल्या प्रातःस्मरणीय शेळीची तब्येत मध्यंतरीं एकाएकी बिघडली. ही तब्येत बिघडण्याचे कारण गांधी महाराजांनीं खाजगी संभाषणांत असें दिलें कीं, ही शेळी नैष्टिक ब्रह्मचर्यापासून किंचित् ढळल्यामुळें तिच्यावर हा दैवी प्रकोप झाला. [ इतरांच्या मतें, त्या शेळीला नीरा पाजून दुधाबदली ती उंसाचा रस देते कीं काय, हें पाहण्यासाठीं गांधीमहाराजांनीं केलेल्या प्रयोगाला ती शेळी व तिचा एक पुत्रही बळी जात होते—पण या आजारावर महाराजांकडून पुन्हां औषध घेण्याचे मात्र दोघांनींही मुंड्या खालीं करून नाकारल्यामुळें मायलेक बकरी नुसत्या आजारावर निभावून गेलीं. ]

आजारांतून उठल्यावर त्या शेळीला जरा लौकर हुषारी यावी, म्हणून गांधीमहाराजांनीं तिच्या सोबतीला चार बकऱ्या बोलावल्या. तिचा पुत्र तिच्या बरोबरीचा झाल्यामुळें गांधीमहाराजांनीं त्याला—'हरिजन'मध्यें तीन कॉलमी कारण सांगून—दूर बांधला होता, पण त्यामुळें त्या शेळीला आजारांत फारच एकलेपणा वाटत होता, गांधीमहाराजांच्या हें लक्षांत यायच्या आधींच शेळीनें मागच्या कुंपणावरून एका चौकस बोकडाशीं

तोंडओळख सुरू केली होती—आणि त्याच स्खलनाबद्दल महाराजांनीं एक दिवस नुसता खजुरावर उपवास करून त्या बकरीला संकट घातलें होतें. गांधीमहाराजांची बकरी ती! थोड्याच अवकाशांत, आपण गुरुमाउलीच्या केलेल्या घोर अपराधाचा तिला पश्चात्ताप झाला, डोळ्यांत आंसवें आणून तिनें गांधीमहाराजांच्या ‘पश्चात्ताप—मसुद्या’वर आपल्या पुढच्या उजव्या पायाचे खूर उठवले.

मोहाचा मार्ग दृष्टीआड असावा म्हणून महाराजांनीं त्या क्षण--पतित बकरीभोंवती आपल्या विश्वासांतल्या बकऱ्यांचा कोट उभा केला होता. निमन्त्रित बकरी मंडळींत, द्रावीड प्रांतांतील रगरखीत बकरीं, मराठ्यांतले कांहीं एकनिष्ठ बोकड, गुजराथच्या कित्येक साळसूद शेळ्या, उत्तरेकडचे मैद मेंढे व पूर्वेकडचे मखमली मेष असे' प्रातिनिधिक नमुने होते. त्यांचा सहवास इतका पवित्र होता कीं, दाणेबाजारांतल्या मस्त बोकडांना देखील त्या वातावरणांत उदात्त विचार सुचावे. या सोबत—बकऱ्यांची निवड गांधीमहाराजांच्या आदेशावरून वेगवेगळ्या प्रान्तांतील कॉंग्रेस कमिट्यांनीं करून पाठवली होती, त्यामुळें तीं बकरीं साहजिकच सत्य—अहिंसेच्या वर्गात बसून आलेलीं होतीं. सर्वांचे आंतले आवाज खुद्द महाराजांनीं पास केले होते.

या बकरे—मंडळाच्या विचारविनिमयांतूनच ‘अखंड हिंदच्या बकऱ्यांत राजकीय जागृति व्हावी’ हें विधायक तत्त्व निघालें. देशांतल्या इतर रहिवाशांप्रमाणें बकऱ्यानाही स्वयंनिर्णयाचा हक्क आहे, व तो मिळविण्यासाठीं ‘कॉन्स्टिटयुअंट ॲसेंब्ली’ बोलवावी असें त्या मजलिसींत ठरलें. त्यांच्यापैकीं एका बुढ्या बोकडानें ही कल्पना गांधी महाराजांपुढें ठेवली. महा-

राजांना ती पसंत पडून त्यांनीं आपला आशिर्वाद दिला—व अखिल भारतीय बकरीसभेच्या श्रीदपत्राचा खरडाही दिला. त्या खरड्यांत सत्य व अहिंसे-बरोबरच मेष—स्वातंत्र्याची घोषणा, तें स्वातंत्र्य मिळविण्याचे मार्ग, हाहि तपशील दिलेला होता. लौकरच बकरीसभेच्या विद्यमानें सर्व देशांतल्या बकऱ्यांची घटना—सभा बोलवण्यांत आली.

बकरीसभेला कॉंग्रेससारख्या अधिकारी संस्थेचें सहकार्य लाभल्यामुळें घटना-परिषदेचे प्रतिनिधी निवडण्याच्या कामांत एक नमुनेदार शिस्त दिसून येत होती. निवडणुकीचा कारभार सभेच्यातर्फे होत होता. पांढऱ्या दाढीचीं [ निदान दाढीला पांढरा रंग लावून येणारीं ] बकरी 'सभापक्षा' चीं खास प्रतिनिधी म्हणून परिषदेंत बसणार होतीं. अशा बकऱ्यांची भरती फार वेगानें होऊं लागली; शिवाय सभेच्या कार्यवाही शेळ्यांची ओळख असलेल्या मेंढ्यांनाच प्रमाणपत्रें लौकर मिळतात असा बोभाटा होऊं लागला. पोसलेल्या शेळ्यामेंढ्या निवडणुकीच्या वेळीं अर्धपोटीं शेळ्यामेंढ्यांना बनवूं लागल्या, त्यांच्याशीं धक्काबुक्की करूं लागल्या, व त्यांच्यामधून ' आपण सांगूं तेच प्रतिनिधी ' अशी दंडेली करूं लागल्या. क्वचित् आडमुठ्या खेडवळ एडक्यांची शहरगांवच्या तुकतुकीत शेळ्या मनधरणी करूं लागल्या. अखेर समजुती, तक्रारी, भानगडी, असे अनेक प्रकार होत होत घटनापरिषदेचे प्रान्तवार प्रतिनिधी एकदांचे निवडले गेले.

बकऱ्यांच्या घटनापरिषदेची कल्पना गांधीमहाराजांच्या शेळीदेवीच्या भेजांतून निघाल्यामुळें तिला या परिषदेचें अध्यक्षस्थान द्यावें, असा बकरीसभापक्षाचा बेत होता. पण ' मी शेळीच काय पण

करडूं देखील नाहीं' असा निर्वाळा देऊन त्या महाभागेनें मान नाकारला व फक्त सल्लागाराच्या भूमिकेंत मदत करण्याचें आश्वासन दिलें. अध्यक्षस्थानीं एका सात्विक बोकडाची निवड झाली. तो कैलासपर्वताच्या उतारावरचा 'देवबोकड' जातीचा प्राणी होता. स्वागताध्यक्षेचें काम बकरीसभा पक्षाची चिटणीस एक अनुभविक शेळी करणार होती. अधिवेशन शेगांवजवळ शेरडी मुक्कामीं भरणार असून प्रतिनिधींच्या राहाण्याजेवण्याची सोय [ व अधिवेशनाचा खर्चहि ] बेंबेचंद वृकोदर नांवाच्या एका मालदार मेषोत्तमानें केली होती. पाहुण्यांना उतरण्यासाठीं जवळचाच एक रिकाम खाटिकखाना घेतलेला असून रोज बाभळीच्या शेंगा व तरवडाचा पाला या सात्विक आहाराची व्यवस्था करण्यांत आली होती. [ अधिवेशन चालू असतां एके रात्रीं महाराजांच्या शेळीनें सर्व प्रतिनिधींना लांकडाचा रांधा व मुसंब्यांच्या बियांची मेजवानी दिली होती—व त्या मेजवानीचा परिणाम दुसऱ्या दिवशीं एका महत्त्वाच्या मतमोजणीवर झाल्याचीहि कुणकुण होती. ]

अखिलभारतीय बकऱ्यांच्या घटनापरिषदेचें अधिवेशन मोठ्या उत्साहाच्या वातावरणांत भरलें. बाभळीच्या झाडांवर घोंगड्या पसरून छायायुक्त असा मंडप तयार करण्यांत आला होता. उपस्थित मंडळींत अनेक प्रकारच्या शेळ्या मेंढ्या दिसत होत्या. कित्येकजणांचे मागचे पाय संवयीमुळें बांधलेले होते, तर कित्येकांनीं गोणपाटाचे पंचे परिधान केले होते. पांढऱ्या दाढ्या जिकडे तिकडे उठून दिसत होत्या, कित्येक पांढऱ्या दाढ्या मुद्दाम तोंडावर ओढून आणल्या सारख्या दिसत होत्या, व त्यांच्या मागचे चेहरे बकऱ्यांचेच आहेत कीं नाहीं असा संशय उत्पन्न होत होता. नियुक्त वेळीं अध्यक्षांची स्वारी मांडवाकडे आली. त्यावेळीं

'बें ऽ बें ऽ' ध्वनीनें मंडप निनादित झाला. प्रवेशद्वारापाशीं कोकरांच्या दोन रांगांनीं पाय उंच उचलून अध्यक्षांच्या मार्गावर स्वागत—कमान उभारली. अध्यक्ष व व्यासपीठावरील मंडळी स्थानापन्न होतांच करडांचें एक गर्बा—नृत्य झालें; 'बँ ऽ बँ ऽ कुरणभूमि' हें बकऱ्यांचें राजकीय गीतस्तवन होऊन अधिवेशन चालू झालें. स्वागताध्यक्षेनें प्रथम गांधी-महाराजांचा संदेश वाचून दाखविला [ व तो संपेपर्यंत तमाम सभावादी बकऱ्यांनीं पुढचे खूर जुळून धरले ] महाराजांनी म्हटलें होतें,

'राष्ट्राच्या रानांचें भवितव्य बकऱ्यांवर अवलंबून आहे. बकरी हिंदची राष्ट्रसंपत्ति आहे. बकऱ्यांच्या स्वार्थत्यागानेंच हिंदूधर्माची प्राचीन काळीं भरभराट झाली, मध्ययुगीन इस्लामियांना बकरीनेंच तगविलें; नव्या युगाच्या अहिंसा नीतीचें प्रतीकहि बकरी आहे. बकरी ही अहिंसेची, सविनय संवकार्याची, आत्मिक बळाची मूर्ति आहे. या जातीच्या प्रचंड संख्येची एकमेव देशाभिमानी संस्था 'अखिलभारतीय बकरी सभा' हीच आहे, व तिच्या नेतृत्वाखालीं बकऱ्यांच्या ठिकाणीं स्वयंनिर्णयाला जरूर अशी एकराष्ट्रीयता येईल अशी प्रार्थना आपण सर्व करूं या.'

यानंतर सभावादी बकऱ्यांनीं—'साची बकरी तेणें कहियूं जे जाणे मालीक रे' ही आपली सामुदायिक प्रार्थना म्हटली. त्यानंतर स्वागाताध्यक्ष बकरीनें आपलें भाषण वाचलें. त्यांत बकरीसभेचें ब्रीद स्वयंनिर्णयाला किती अनुकूल आहे, त्या ब्रीदाला अनुसरून धनगर व मालक यांच्या सहकार्यानेंच आपलें कल्याण कसें होणार आहे, सनदशीर चळवळ किती अवश्य आहे, प्रत्येक बकऱ्यानें आपल्या शेपटीचें निदान चार

कस तरी तारेच्या कुंपणाला अडकवून मालकाला मदत करणें कसें जरूर आहे, कुंपणानें शेत खाल्लें तरी शेळीनें कुंपण कां खाऊं नये, इत्यादि प्रश्नांची सोपपत्तिक चर्चा केलेली होती.

अध्यक्षांची औपचारिक निवड होऊन ते स्थानापन्न झाले. ते आपलें भाषण वाचूं लागणार तोंच अस्ताव्यस्त केसांचा एक सडपातळ बोकड उठून म्हणाला.

'थांबा, अध्यक्षमहाराज—ही जर बकऱ्यांची सभा आहे तर येथें सगळेच बकरे प्रतिनिधी आहेत काय? बकरें ही संज्ञा फार व्यापक अर्थानें घेतली आहे काय?'

'शेळ्या, मेंढ्या, बकरीं, बोकड, एडके, वयांत आलेलीं करडें व कोंकरें या सर्वांना मतदानाचा व प्रतिनिधित्वाचा हक्क जाहीर निवडणुकीच्या तेराव्या [अ] नियमाप्रमाणें आहे' अध्यक्षाआधींच, स्वागत-शेळीनें उठून सांगितलें.

'या यादींत लांडगे व कोल्हेही येतात काय? असल्यास ते बकरीं कसे ठरले? नसल्यास त्यांना येथें प्रवेश कसा मिळाला?'

या प्रश्नामुळें सभेंत गलबला सुरू झाला. वाजवीपेक्षां जास्त पांढऱ्या दाढ्या असलेले बरेच प्राणी बकरे नसून त्या दाढीच्या तिकिटावर निवडून आलेले लांडगे व कोल्हे असावेत हें स्पष्ट दिसूं लागलें बकरीसभेचे सदस्य नसलेल्या रानबकऱ्यांचा व आडदांड बोकडांचा एक बराच मोठा वर्ग सभेंत दिसत होता, तो वर्ग सर्वांच्या दाढ्या उपटून पाहण्याच्या धमक्या देऊं लागला; इतक्यांत अध्यक्षांनीं उठून एक कागद वाचला—

'बकरीसभेपुढें जी महत्त्वाची कामगिरी आहे, ती साधण्यासाठीं बकरीं म्हणवून घेणाऱ्या कोल्ह्या–लांडग्यांना पक्षांत व सभेंत सामील करून घेणें जरूर आहे. या बांधवांचा उपयोग आपल्याला संरक्षण व परराष्ट्रीय राजकारण यांच्या दृष्टीनें करून घेणें अवश्य होईल. त्याचप्रमाणें चरबीनें पुष्ट अशा जरूर तितक्या डुकर–बंधूचें सहकार्यही बकरी–समाजाच्या आर्थिक हितासाठीं आपण घेतलें पाहिजे. बकरीपणाची निशाणी जी पांढरी दाढी ती या मित्रमंडळींनीं स्वीकारली आहे; तेव्हां त्यांच्या सद्हेतूबद्दल, राष्ट्रहितैषी तळमळीबद्दल, स्वार्थत्यागाच्या तयारीबद्दल शंका घेणें हें घोर पाप आहे.'

या खुलाशानें शंकेखोर बकऱ्यांचें समाधान झालें नाहीं. पहिल्यानें हरकत काढणाऱ्या बकऱ्यानें एक अवतरण दिलें, 'अहिंसेचे ठराव मेंढरांनीं कितीहि पास केले तरी जोंपर्यंत लांडग्यांना ते पटत नाहींत तोंपर्यंत ते व्यर्थच आहेत.'

यावर बेंबेंचंद वृकोदर हा एखाद्या मस्तवाल शेठियासारखा त्या बकऱ्याकडे रोखून पाहूं लागला व वृकोदराच्या भोंवतालचीं मेंढरें मुनीम व गुमास्ते असल्यासारखी वृकोदराचा पाठपुरावा करूं लागलीं.

'लांडग्यांच्या ठिकाणीं हृदयपालट घडवून आणणें आपल्या हातीं आहे. व याच उदाहरण या सभेंत आपल्या डोळ्यांसमोर आहे.......'

कित्येक सफेत दाढींतल्या लांडग्यांनीं आपला अहिंसेवर अढळ विश्वास असल्याचें जाहीर केलें. त्यांच्यापैकीं एक म्हणाला, 'हिंसा म्हणजे काय–वेदना. हिंसेचें भय वेदनेमुळें. आम्ही वेदनांच्याविरुद्ध आहोंत. आमचा समाज अस्तित्वासाठीं बकऱ्यांवर अवलंबून आहे हें

खरें, पण आम्हांला बकऱ्यांचें मित्रत्व पाहिजे. आम्ही पूर्वीचे लांडगे राहिलों नाहीं. आमच्यामध्येंही पाश्चात्य सुधारणेमुळें फरक झाला आहे. पूर्वीप्रमाणें हालहाल करून मेंढ्या मारण्याचा मार्ग आतां आम्हीं सोडून दिला आहे. आतां शेळ्यांना कळत देखील नाहीं इतक्या हळूं आम्हीं त्यांना आत्मसात् करतों. तेव्हां आमच्यावर तुम्ही निर्धास्तपणें मदार ठेवा. आपल्या सर्वांवरच मालक–खाटीक यांची जरब आहे. ती झुगारून देण्यास आम्हींच तुमच्या उपयोगी पडूं. आधीं पारतंत्र्याची वाट लावूं–मग तुम्ही स्वयंनिर्णय खुशाल करूं शकाल–म्हणून आमच्याशीं आज राष्ट्रीय एकजूट करा.'

कित्येक भाविक बकऱ्यांनीं या भाषणाला टाळ्या दिल्या. एका सौम्य बोकडानें उठून सांगितलें कीं, 'लांडगा व बकरा असे क्षुद्र भेद आपण मानतां कामा नये. लांडग्यांनीं बकऱ्यांना ममतेनें वागविण्याचें आश्वासन दिल्यावर आतां शंका घेणें हा राष्ट्रद्रोह आहे.'

यावर विरोधी पक्षाचा एक बकरा संतापून उभा राहिला. तो म्हणाला,

'गड्यांनो, तुमची दिशाभूल होऊं देऊं नका; खाटकाच्या तावडींतून सुटण्याइतकाच महत्त्वाचा प्रश्न लांडग्यांच्या जबड्यांतून सुटण्याचा आहे. परतंत्र बोकडवर्गाला जोंपर्यंत संघशक्ति आलेली नाहीं तोंपर्यंत खाटीक लांडगे यांचें परस्पर वैर राहिलें तरी आपलें नुकसान नाहीं; त्या दोघांची झुंज आपल्या फायद्याची आहे. आज आपल्यातर्फे खाटकाशीं भांडणारे लांडगे व कोल्हे उद्यां त्यांच्याशी कराराहि करतील. तेव्हां आपलें बळ कोणालाच देऊं नका, आपल्या या दोन शत्रूंच्या जुलुमाखालीं रगडले जात असतां आपापसांतच होईल तेवढी एकी करूं. आज बकरे

म्हणवून घेणारें लांडगे उद्यां खाटकांच्या ओळीलाहि उभे राहतील. खाटिक बरा, तो सुरा लपवून तरी ठेवीत नाहींत; पण हे चार पायाचे खाटीक आपल्यासारखी कातडी दाखवितात, पण आपल्या कराल दाढा झांकून ठेवतात; मोकळ्या कुरणाकडे म्हणून नेऊन अचानक वाट लावतात. आम्हां बकऱ्यांना खाटकांची मालमत्ता व्हायचें नाहीं—आणि लांडग्याचें सावज त्याहूनहि नाहीं. तेव्हां इथें जीं खरीं, राठ, गावराणी, पोटासाठीं मेहनत करणारीं बकरीं असतील तींच फक्त स्वयंनिर्णय करूं शकतील. आपल्या स्वयंनिर्णयाला प्रथम हक्कांची घोषणा केली पाहिजे. बकराजातीचे मूलभूत हक्क चारा आणि निवारा प्रत्येकाला मिळालेच पाहिजेत. प्रत्येक मेहनत करणाराला कुरणें मोकळी पाहिजेत—कोणाची मिरास उपयोगी नाहीं. प्रत्येक बकऱ्याला हवें तें बें ऽ करण्याचा व वाटेल त्या कळपांत हिंडायचा अधिकार पाहिजे. मेषसृष्टीची सर्व संपत्ति एकंदर अजवर्गाच्या सामाइक मालकीची हवी—'

एव्हांना लांडग्यांनीं व कोल्ह्यांनीं उलट इतकीं हुल्लड उठविली व त्याच वेळीं गांवठी रासवट बकऱ्यांनीं उलट इतका जयघोष केला, कीं मंडपांत फारच कल्लोळ माजला. बेंबेंचन्द बृकोदर हा उघडकीस आलेला लांडगा बोकड—वक्त्यावर झांप टाकतो कीं काय असें वाटूं लागलें. इतर लांडग्यांनीं आपले दांत दाखवून गुरगुरण्यास सुरवात केली, व लांडग्यांनीं मुद्दाम पोसून ठेवलेलीं कांहीं कोंकरें, व करडें आपल्या जातभाईंवरच हुमला करण्यास उठलीं. सभेंत व्यत्यय आणण्याबद्दल विरोधी पक्षाच्या निषेधपर एक ठराव अध्यक्षांनीं आणला व पांढऱ्या दाढ्यांच्या बहुमतावर तो पसार झाला.

'या लांडग्यांच्या सभेंतून आम्ही आपखुषीनें निघून जातों' म्हणून

लढाऊ बोकड–एडके–मेंढे यांचा पक्ष सभेंतून निघून गेला, व ' आतां भेट मैदानावर ' अशी शेवटची सलामी त्यांनीं लांडग्यांना व कोल्ह्यांना जातां जातां दिली, ' आज नाहीं उद्यां आमच्या अणकुचीदार शिंगांना धार लावून खांद्यास खांदा लावून उभे राहूं; कडेकोट गंडस्थळांच्या अभेद्य तटानें तुम्हां कोल्ह्या–लांडग्यांनाच काय पण दिग्गजांना देखील टक्कर देऊं' अशी डुरकणी एका अडाणी पण खंबीर बोकडानें जातां जातां दिली.

त्यांनीं सभात्याग केल्यावर उरलेल्या शांतिप्रवृत्त बहुमतानें अनेक ठराव त्या घटना- परिषदेंत पास केले. त्यांत विशेष महत्वाचें खालील होते—

" त्याग व [ आपल्याकडून ] अहिंसा या गुणांचें द्योतक म्हणून ' अजापुत्रम् बलिं दद्यात् ' हें मेषराष्ट्राचें ब्रीदवाक्य राहील.

" ज्या लांडगेबंधूंचा किंवा खाटिकवर्गाचा आहार शेळीं आहे, त्यांनीं खातांना तिला वातड म्हणायचें नाहीं, हें तत्त्व या परिषदेला मान्य आहे.

" उंटावरून शेळ्या हांकणाऱ्या सरंजामदार वर्गाला त्यांनीं खालीं उतरून शेळ्यांच्या विनंतीप्रमाणें त्यांना हांकावें, अशी या परिषदेची सविनय प्रार्थना आहे.

" शेळ्यामेंढ्या नामक सोंगट्यांच्या खेळामुळें आमच्यांत अकारण जातिभेद माजतो, म्हणून ही परिषद त्या खेळाचा तीव्र निषेध करीत आहे.

" इसापनीतींत लांडगेवर्गाला झालेल्या अन्यायाप्रीत्यर्थ त्या पुस्तकांच्या जाहीर होळ्या करण्याची शिफारस करून, ही परिषद मेषराष्ट्राचा घटक म्हणून लांगडेवर्गाचें स्वागत करीत आहे.

" लांडग्यांप्रमाणें खाटीकवर्गांतही सविनय मनधरण्यांनीं हृदयपालट घडवून आणावा, तत्प्रीत्यर्थ श्रमानें गुजराण करणाऱ्या शेळ्यांनीं व कष्ट करणाऱ्या बोकडांनीं जरूर तो सर्व स्वार्थत्याग करावा, असें या सभेचें मत आहे.

" दरवर्षी भादरणाऱ्या धनगरापेक्षां, किंवा सुरा उगारणाऱ्या खाटका-पेक्षां, नकळत गळ्याला दांत लावून मोकळे करणारे लांडगेभाईच बकऱ्यांना जास्त, जवळचे आहेत, असें ही सभा ठरवीत आहे.

" चित्तशुद्धीसाठीं ब्रम्हचर्याची आवश्यकता या परिषदेला पटली असून या व्रताचे बाबतींत, बाजारांतल्या बोकडांना व शेळ्यांना माफी देण्याची जरूरी आहे, या अपवादाची ही सभा नोंद करीत आहे."



# शाडूचा गणपति ९

*१९४० मध्यें माधव मनोहर यांनीं ‘ ज्वाला ’ नामक कादम्बरी लिहिली. त्यांच्या आग्रहास्तव अनन्त काणेकर यांनीं तिच्यावर परीक्षण लिहिलें; त्यांत केलेल्या कांहीं विधानांबद्दल माधव मनोहर यांनीं आक्षेप घेतला; दरम्यान प्रभाकर पाध्ये यांनीं या वादांत सामील होऊन आणखी तत्त्वचर्या सुरू केली; या तिरंगी सामन्यांत ‘ स्वप्नरंजन ’ ‘ इच्छापूर्ति ’ ‘ वास्तववाद ’ वगैरे शब्दांचा धुरळा–बुक्का–गुलाल उधळला जाऊन साप्ताहिकांचा वाचकवर्ग कांहीं दिवस हैराण झाला.*

अखेरीस एकदांचा तो गाजलेला गणपति पुरा झाला. शहादू शिलावटानें ‘ स्थानिक हुन्नर उत्तेजक बाजार ’ या बारमाही प्रदर्शनांत तो स्वतःच्या खर्चानें ठेवला—ठेवला म्हणजे त्याची स्थापना केली नाहीं, पण त्या दुकानांतलाच एक लहानसा गाळा भाड्यानें घेऊन त्यांत तो गणपति त्यानें मांडून ठेवला. शहादू स्वतःच्या त्या कलाकृतीवर निहायत खूष झाला असता, पण एक रुखरुख त्याला बेचैन करीत

होती; आपली कारागिरी लोकांपुढें ठेवण्याच्या घाईंत, शहादूनें तो गणपति डोक्याकडून सुरू करून पायाकडे बनवीत आणला होता; पाय करण्याच्या कामांत त्यानें भलताच उतावळेपणा दाखविला होता आणि त्यामुळेंच त्याच्या त्या भव्य आकृतीचे पाय अधू राहिले होते.

शहादू जातीनें जरी पाथरवट तरी धंद्यान एक शाडूकुट्या होता. मातीच्या चिखलांत चार कापसाबिपसाचे धागे नि दोन-चार तेलाचे थेंब टाकायचे, आणि तो लगदा कुटीत बसायचें हा त्याचा मुख्य व्यवसाय होता. दोनचार ठसेपाडे 'गणपतीचे कारखानदार' त्याच्याकडून शाडू नेत असत. त्यांच्या ओळखीनें त्याचें मूर्तिकार वगैरे कलावंतांत पुष्कळ जाणेंयेणें होतें. शिवाय शहादूनें बरींच देवळें नि लेणींहि पाहिलेलीं होतीं; पण स्वतः दगडफोडीचा त्याला कंटाळा असल्यामुळें त्याचा बहुतेक वेळ दुसऱ्या कारागिरांच्या कामाची चिकित्सा करच्यांतच जात असे; इतरांच्या चुका सुधारण्याची त्याची तळमळ कधीं कधीं इतकी अनावर होत होती, कीं एकादें नकसकाम पाहायला जातांना तो आपली छन्नीहातोडी बरोबरच घेऊन जायचा—मग त्या कामाची दुर्दशा विचारायलाच नको! शहादू कधीं एखाद्या ठिकाणीं 'बोटें चुकलीं' म्हणून दोन घाव मारून तीं छिन्नविछिन्न करून टाकायचा, तर कधीं 'इथें असें हवें होतें' म्हणून मातीचे गोळे लिंपावयाचा! आपल्या कारागीरबंधूंना तो बजावीत असे कीं, 'मी क्षेत्रांतलीं देवळें आणि डोंगरांतील लेणीं पाहिलेला मनुष्य आहे; तेव्हां कुठल्याहि कारागिरीचा गुण मोजण्याचा गुण्या माझ्यापाशींच आहे.'

कोणी 'छांदिष्ट आहे झालं' म्हणून त्याच्याकडे दुर्लक्ष करीत, तर कोणी म्हणत, 'अहो नकसकामांतल्या कसबाला काय काय लागतं हें

सर्व जर तुम्हांला माहीत आहे तर मग एकदां तुमची करामत तरी दिसूं द्या !'

त्यामुळेंच इरेस पेटून शहादू शिलावटानें गणपति करायला घातला होता. अगदीं 'बेफाम' गणपति घडला पाहिजे, या आकसानें त्यानें मूर्ति बऱ्याच मोठ्या प्रमाणावर बांधायला काढल्या होत्या—गणपति व त्याच्या जवळपास चांगल्या तीन-चार ऋद्धि-सिद्धि, असा एकंदर थाट उठवून द्यायचा त्याचा विचार होता; पण एवढ्या मोठ्या कामाचा शाडू कुटतां कुटतां त्याचे दंड इतके भरून आले कीं अखेर गणपतीच्या पायांना जेव्हां शाडूच उरला नाहीं तेव्हां मूर्तीला चिखल-वाळूचेच पाय बसविण्याचा अंग-चुकारपणा त्यानें केला. तथापि ते त्याचें त्यालाच डांचूं लागलें. चारचौघांना त्यानें हलकेंच सांगून ठेवलें, कीं 'करतोय् खरा; पण आपल्या शहादू शिलावटाला सांभाळून घ्या बरं का दादा !' गणपतीच्या पायांकडे कोणी बारकाईनें पाहिलेंच, तर शहादूनें सबब तयारच ठेवली होती—कीं महादू म्हणून माझा एक भाऊ होता; काम लवकर उरकावें म्हणून, मी मूर्तीच्या डोक्याकडून कामावर लागलों होतों, व त्याला पायांकडून वर बांधीत आणायला लावला होता—मधेंच तो मेला, तेव्हां जी काय खामी राहिली असेल ती महादूची आणि जें काय कसब दिसत असेल तें—ह्यः ह्यः शहादूचं !'

* * * *

'स्थानिक हुन्नर उत्तेजक बाजार' या नमुनेदार संस्थेच्या एका गाळ्यांत शहादू शिलावटाचा गणपति तयार होऊन मांजरपाटाच्या पडद्यामागें बसला होता. त्याच्यावरचा पडदा दूर करून तो जगाला

दाखवायच्या निमित्तानें शहादूनें एक पानसुपारी केली. त्या ठिकाणीं स्वतःचाच एक जुना फोटो हार घालून ठेवून ‘ हा माझा मेलेला भाऊ शहादू ’ असें सांगण्यास तो विसरला नाहीं. गांवांतले मूर्तिकार, पाथरवट, गवंडी, फार काय, एकदोन एंजिनियरदेखील उपस्थित झाले. त्यांच्यांतला एक चिडखोर एंजिनिअर म्हणजे गांवांतली ठळक व्यक्ति होती; त्यानें दोनचार नामांकित बंगले बांधलेले होते व मोठा माहीतगार म्हणून तो ‘ ख्यातनाम ’ होता. दुसरा एक मेकॅनिकल एंजिनियर होता; त्याची जरी सध्यां एक नुसती पिठाची गिरणीच होती, तरी जंगी कारखान्यांचें सारें ‘ गणित ’ त्याला तोंडपाठ होतें; चिडखोर सिव्हिल एंजिनियरला मधूनमधून तोंडचे हिशेब विचारून चुकवण्यांत मे. एंजिनियर मोठा विजय मानीत होता. कर्मधर्मसंयोगानें हेच दोघे त्या दिवशीं शेजारशेजारच्या खुर्च्यांवर आले.

हारून रंगाऱ्यानें गणपतीचा अनावरणसमारंभ केला. मांजरपाटाचें पांघरूण बाजूला होतांच लोकांनीं टाळ्या वाजवल्या, वाजंत्रीं वाजूं लागलीं, पानसुपारी, अत्तरगुलाब वाटण्यास सुरुवात झाली. हळूहळू सर्व मंडळी मूर्तीच्याभोंवतीं गोळा झाली. कोणी सौजन्यानें म्हटलें, ‘ वा ! छान केला आहेत हो गणपति !’ कोणी तो पाहून आपापसांत कुजबुजून स्मित करूं लागले. कांहीं गंभीर लोकांच्या भुंवया वर गेल्या व कित्येकांनीं तेथून काढता पाय घेतला. तिरसट एंजिनियर व पिठाची गिरणीवाला मेकॅनिकल एंजिनियर हे दोघेहि निसटण्याच्या बेतांत होते, पण शहादू त्यांना अडवून म्हणाला ‘ वा ! हें काय, कॉफी आणताहेत ना ! ” ते दोघे नाइलाज म्हणून त्या गणपतीजवळ उभे राहिले. दोघांचेहि चेहरे त्रासलेले होते, दोघेहि गणपतीकडे शक्य

तों व पाहण्याचा प्रयत्न करीत होते. शहादूनें विचारलें, 'काय मालक कसं काय झालं आहे काम?'

शहादूनें गणपतीला स्वतःच्या सुखस्वप्नांतले सारे सोहाळे केले होते. चार ऋद्धिसिद्धींना काबूंत ठेवण्याच्या आवेशांत तो गणपति जागेवरून अर्धवट उठून उभा राहण्याच्या बेतांत आहे असें दिसत होतें, उजव्या हातानें मांडीवरच्या ऋद्धीला सांभाळीत डाव्या हातानें सिद्धीचा परामर्श घेणाऱ्या त्या गजाननाचे दोन जादा हातही कामाला लावलेलेच होते; जादा उजव्या हाताच्या वेंगेंत एक चवरी ढाळणारी 'शुद्धि' सापडली असून जादा डाव्या हाताच्या बोटांनीं सोंडेनें जवळ ओढलेल्या 'बुद्धि'ची हनुवटी श्रीविनायकानें उचलली होती. ती सोंड वाजवीपेक्षां बारीक झाल्यामुळें दुरून पाहणाराला 'सुग्रीव, तारा व दासी' असा कांहीं तरी देखावा मांडल्याचा भास होत होता.

सि. एंजिनिअर म्हणाले, "ठीक आहे कीं, ठीक आहे—चला." शहादू म्हणाला, "तें नाहीं साहेब, खरंच सांगा, साधलंय् का?'

सि. एंजिनियर म्हणाला, "खरं सांगायचं—तर—हें नसतं केलंत तर बरं झालं असतं"

"कां?"

"कारण हें चित्र लांबून कसं दिसतं तें पाहिलंत कां?"

"तें तुमच्या दृष्टीला तसं दिसतं—"

"पण कशाला केलंत हें? तुमचं म्हणणं काय आहे ह्या चित्रांत?"

"ही आपली एक स्वर्गाची कल्पना आहे!"

"करायची काय स्वर्गाची कल्पना? डोळ्यांसमोर काय आहे तें पहा–"

"पण हेंहि कसब आहेच कीं नाहीं?"

"कशाला हें निरर्थक कसब? गणपतीच्या जागीं आपण हवे होतों ही जर तुमची स्वर्गाची कल्पना, तर ती मातींत पुरी करण्यापेक्षां प्रत्यक्ष कांहीं खटपट तरी करा–चाराबद्दली निदान दोघी तरी जमा होतील!"

"या तुमच्या गणपतीकडे पाहून कांहीं नवीन जीवनानुभव मिळतो का?" इतका वेळ नुसता प्रश्नार्थक चेहरा करून उभा असलेल्या मेकॅनिकल एंजिनियरनें विचारलें, 'अरेच्या, हेंच बरं का!'–असं वाटतं का?"

"पण त्यांच्या मध्यें ती बाजूच नसली तर?" सि. एंजिनियर म्हणाला

"दोन्हीहि मनांत मांडे खायचेच प्रकार. पण–" मे. एं. बोलूं लागला.

"नाहीं, दोन्ही सारखे नव्हेत. गणपतीच्या जागीं आपला पुतळा घालायचा ही इच्छापूर्ति, उलट 'असतों तर?' हें नुसतें स्वप्नरंजन—"

"मला वाटतें—"

"आतां वास्तव दृष्टि म्हणजे प्रत्यक्ष व्यवहारांत इच्छापूर्तीचे मार्ग विचारपूर्वक शोधायचे—"

"मला वाटतें जीवनानुभव—"

"कसचं जीवाणुभय!" शहादू शिलावट मधेंच रागावून म्हणाला, "हौशीसाठीं मानसानं कसली मूर्तीबी करूं नये व्हय?"

"तुम्ही गप्प बसा, मी यांच्याशीं बोलतो आहे" मे. एं. नें सांगितलें.

"पण मी तुमच्या दोघांशींहि बोलतों आहे–" शहादू गुरगुरला.

"शाडू चांगला वापरला आहे" सि. एंजिनियर न्यायबुद्धीनें बोलला.

"तरी पण—"मे. एं.

"बस करा राव—" शहादू.

"याच्या नीटसं लक्षांत येणार नाहीं तें" सि. एं.

"सारा घोटाळा माजला आहे डोक्यांत"

"तुमच्या डोक्यांत माजला असेल—"

"चला मी जातों—"

"कांहीं समजत नाहीं याला, नि-गणपती करतो–"

"चला हो—"

"तुम्हांला फार समजत नाहीं?"

"तुमच्यापेक्षां अधिक—"

या तिरंगी वादविवादांत सि. एंजिनियर, मे. एंजिनियर व शहादू शिलावट गणपतीच्या मूर्तीजवळ इतकी दंगामस्ती करूं लागले, कीं कच्च्या पायाचें तें सबन्ध धूडच या मंडळींच्या अंगावरच कोसळलें. सि. व मे. एं. कसेबसे निसटले, पण शहादूला मात्र एक चमत्कारिक शिक्षा झाली. कांहीं गणपतीचे हात व कांहीं ऋद्धिसिद्धींचे मिळून त्याच्या गालांना चांगलाच प्रसाद मिळाला.

कोणी म्हणतात या लोकांच्या वितंडवादाला कंटाळून आसपासच्या मंडळींनीं तो गणपति मुद्दाम ढकलला होता....

---

# प्रोफेसर सिंहदमन

१०

साडेसहा वाजून गेले कीं, सुखवस्तु मध्यमवर्गाच्या वस्तींतून जाणाऱ्या रस्त्यांना कांहीं कांहीं अत्यंत करुणास्पद दृश्यें नजरेस येऊं लागतात. दुतर्फा बांधलेल्या आधुनिक पद्धतींच्या फ्लॅटस्‌मधून, एकेकाळीं मानव असलेले कांहीं जीव बाहेर पडूं लागतात. अजूनही ते उभेच चालतात, माणसांसारखे दिसतात आणि बोलतातही; पण त्यांची प्रगति जनावरांपलीकडे नाहीं हें आपल्याला लगेच दिसून येतें. त्यांच्यातल्या प्रत्येक जीवाला एकेक जनावर ओढून नेत असतें, दोघांना एका बनावट पाशानें जोडलेलें असतें. दुःखाची गोष्ट म्हणजे भर शहरांतून पाळींव कुत्र्यांना फिरविणारे हे हताश जीव बहुधा स्त्रीच्या गुलामगिरीमुळें या लाजिरवाण्या अवस्थेला येऊन पोहोंचलेले असतात. कोणी मनधरणीला तर कोणी लांचेला बळी पडून, तर कोणी हुकमाचे बन्दे म्हणून, केंसाळ लाडक्याच्या सांखळ्या धरून चालतात, गलेलठ्ठ श्वानांपुढें हांजीहांजी करतात, सोकावलेल्या कुत्र्यांच्या मागें तीं ठरवतील ते टप्पे घेत जातात बिचारे! त्यांच्या मुद्रा सांगतात कीं, या दास्यांतून सुटका होण्याची त्यांना आशा देखील उरली नाहीं. कित्येक दगडी चेहऱ्यानें मार्ग आक्रमीत असतात, लोकांच्या हांसण्याची त्यांना पर्वाही

उरलेली नसते. दिव्याच्या खांबांभोंवती गुंडाळणाऱ्या सांखळ्या शांतपणें सोडवीत, लोकांच्या पायाला बसणारे तिढे निगरगट्टपणें काढीत, ते आपलें गांभीर्य इतकें कायम ठेवतात कीं, नशिबीं आलेलें गोड करून घेण्यावांचून यांना इलाजच नाहीं हें स्पष्ट दिसतें व त्यांच्याविषयीं मन द्रवते. दुसरे नुकतेच या कामाला जोडले गेल्यामुळें थोडे चिडखोर असतात. त्रासदायक आरोप्याला घेऊन जाणाऱ्या तिरसट पोलिसासारखे ते आपल्या कुत्र्यावर सारखी शिस्त गाजवीत असतात. लोक आपल्याला हांसत आहेत या संशयी नजरेनें ते आजूबाजूला पाहात असतात. गुलामगिरीला हे अजून पुरे रूळलेले नसतात. यांच्याजवळचें कुत्रें आपला पाय हुंगावयाला आल्यास त्याला लाथ न मारणेंच धोरणीपणाचें असतें. या वर्गांतले सर्वांत कनिष्ठ व सर्वांत सुखी म्हणजे पोऱ्ये लोक; ते कुत्र्यांना पगारावर फिरवीत असतात. धंदा म्हणून एखादी गोष्ट करायला लागल्यावर चेहऱ्यावर जो बेछूटपणा येतो तो या अल्पवयी गुलामांच्या चेहऱ्यावर दिसतो—कित्येक तर त्यांत भूषण मानतात.

फिरायला नेण्यांत येणारीं कुत्रीं अनेक जातींचीं असतात. पण गुण सगळ्यांचे सारखे. फाजील खाऊन माजलेलीं, लाडावलेलीं, चावरीं, भोकरीं, छांदिष्ट आणि कागाळखोर. फूटपाथवरून सरळ कधीं चालायचीं नाहींत, सांखळीला किंवा वादीला सारखा ताण देतील, प्रत्येक फाटकापुढें, कुंपणापुढें आणि खांबापुढें हुंगून पाहिल्याखेरीज पुढें व्हायचीं नाहींत, हवें तेव्हां मध्येंच बैठक मारून आराम करतील, सारा वेळ धांपा टाकतील मात्र एखाद्या जेवून दमलेल्या शेटजीसारख्या. वाटेंत ड्रेनेजचें झांकण उघडें असलें, नेमकीं तेथें जाऊन धडपडतील—दिमतीच्या माणसाला पळभर उसन्त द्यायचीं नाहींत कधीं हीं पाळीव

शहरीं कुत्रीं. बरोबरचा माणूस झक् मारीत आपल्याला सांभाळतो आहे हें बेट्यांनीं पुरतें उमगलेलें असतें; सांखळीच्या दुसऱ्या टोकांचा दुपायी प्राणी बिचारा निमूटपणें चतुष्पादामागें त्याच्या कलानें जात असतो. मालकाला घरीं किंमत काय आहे, हें त्या द्वाड कुत्र्यांना जणूं समजलेलेंच असतें; कारण घरीं देखील 'मालकिणीच्या परिवारांतला एक' असा तो बापुडा मालक कुत्र्याच्या खालोखाल आपली जागा हें ओळखून, 'बाळ टॉम्या' गुरगुरेल या भीतीनें वेळींच कोंचावरून उठून त्याला जागा देत असतो. 'कुत्र्याचें जिणें' म्हणून दैवाला दोष लावणारांनीं 'कुत्रेकऱ्या'चें कुत्र्याहूनहीं हीन असें हें जिणें डोळ्यापुढें ठेवून जिवाला समाधान देणें बरें नाहीं काय ?

असेच एका सायंकाळीं कारभारणीच्या विनवणीला किंवा दरडावणीला मान लववून कित्येक कुत्रेकरी घराबाहेर निघाले होते. त्यांच्यांतला एक गुलामगिरीला शोभण्यासारखा दिसत नव्हता; चांगला टणक गडी दिसत होता, पण तोंडावर भकास खिन्नता होती त्याच्या. एका तुंदिल केंसाळ पांढऱ्या कुत्र्याशीं चामड्याच्या वादीनें जखडला गेला होता तो. महा त्रासदायक कुतरडें होतें तें, त्या गृहस्थाला छळण्यांत धन्य मानीत होतें जणूं. किंग्ज सर्कलकडून दादरकडे निघालेला तो गृहस्थ ट्रॅमचा तरणाताठा रस्ता सोडून 'सर भालचन्द्र रोड'च्या मध्यमवयस्क रस्त्याकडे वळला. आपली बदनक्षी शक्य तितक्या थोड्या लोकांनीं पहावी असें त्याला वाटत होतें. तें कुत्रें तितक्याही चालण्याच्या श्रमांनीं दमा झाल्यासारखें करीत होतें. एकाएकीं तें थांबलें. एक उंच, धिप्पाड, हातभर उंचीची केंसाळ टोपी घातलेला, कानापर्यंत

मिशांचा व स्वाराचा पोशाख केलेला गृहस्थ, हातांतली छडी आपल्या चामडें मढवलेल्या पायावर आपटीत पुढें उभा होता.

"अरे टेंचिकी! कोन, सिंदिया?" तो उद्गारला.

"जलालशा?" कुत्रेकरी आश्चर्यानें म्हणाला.

"ओत्तारीकी! अरे हात मिलाव, दोस्त हात मिलाव!"

सामान्य शहरीं हातांचा चुराडाच करतील अशा दोन पंजांची पकड झाली.

थंडीउन्हानें रापलेल्या जलालशाच्या चेहऱ्यावर खुषीच्या असंख्य सुरकुत्या हांसत होत्या. तो म्हणाला,

"अरे पांच वरसमंदी मिलला नाहीं, कुटे गेला होता? एक हप्ता ज्याला, मीं मुंबईमंदी है, कोणी भेटतेबी नही. तुमी तो ते हेडमास्तणरच्या संगाती शादी लावूनसी गडप ज्याला—अरे साला तुमी है कुटे?"

कसला तरी एक गुरगुरणारा बोळा आपला पाय हुंगीत बूट चावण्याचा प्रयत्न करीत आहे हें जलालशाच्या लक्षांत आलें.

"हे कोटूनसी पैदा केला, लेप डोग? के पांजरापोळमंदी नोकरी पकडला? येला काय कुत्ता म्हनते का मष्करी?"

शिद्याला आपल्या दुःखाची ही आठवण सहन झाली नाहीं.

"चल सोडा घेऊं" तो म्हणाला. दोघे एका इराण्याच्या दुकानांत गेले. शिंद्याचें तें सुजलेलें कुत्रें खुर्चीच्या पायांना वेढे घालून इराण्याच्या मांजरावर केंकाटूं लागलें. पोऱ्यानें टेबलावर दोन ग्लास व सोडयाच्या दोन बाटल्या उघडून ठेवल्या.

जलालशानें हलकेच आंतल्या खिशांतून एक मोठी चपटी बाटली काढली.

" आमी थोरा टाकते, तुमी ? "

" मलाही, " शिंदे म्हणाला.

" तुमी जाडिया किती ज्याला ! " जलालशा एका मोठ्या भडक लाल हातरुमालानें मिशा पुशीत म्हणाला, " अने तद्दन खलास ज्याल्यावानी लागते ! ए बम्बईच्या लाइफ तुमाला कसा गमते ? तिकरे समदा लोक तुमची चोकसी करते. तुमी छोडला ते वखतापासून सर्कसमंदी कई मजा राहिला नही, तें बंद बी होऊन गेला. ते दोघा जपानी लोका—मोटो अने सोटो !—ते सोडूनसी गेला. ते घोडयाचा काम करनार औरत निंदिया ? तेनी 'कलाऊन' धोंडूसी सादी कली. आमी रिंगमास्तरच्या काम सोडून देऊन इष्टेबलच्या घोडेखानाच्या धंदा करते. राजा तो आतां डेअरी फार्म च्यालवते—राजाची याद है के नही ? मोमिनाबादला सर्कस होता ते बख्ताला तुमच्या संगतीच ते हेडमास्तरण-वर लव्ह करीत होता—माफ करशोजी, आखीर—तुमी ते मास्तरणशी शादी केला नही ? कसी है मिसीस सिंदिया ? "

" श्रू ऽ ऽ क्... आणखी सोडा सांगूं ? "

" टाकू आणखी एकवार ? "

" मला बी " शिंदे म्हणाला. " मिसेस शिंदे ठीक आहेत. त्यांना मुंबईशिवाय दुसरीकडे राहायचं नाहीं. आम्हीं तीन खोल्यांच्या जागेंत रहातों. रोज संध्याकाळीं सहाला मीं कुत्र्याला फिरायला नेतों. मिसिसचा फार लाडका कुत्रा आहे हा—माझा नाहीं. आमच्या दोघांत उभा दावा

आहे. त्याचं नांव माझ्या बायकोनं ठेवलं आहे ' छकुला '. आम्हीं परत जाईपर्यंत जेवण तयार होतं–रात्रीं येतोस जवायला ?"

"अरे नहीं, थँक्यू, रातच्या ट्रेननें तो आमी च्यालला. आबूला ज्याते. घोडेखाना ठेवायला गांव लई च्यांगला. बडाबडा महाराजाचा गऱ्हाक मळते. साडेआठची गाडी."

"मी येतों स्टेशनपर्यंत तुला पोहोंचवायला," शिंदे बोलला.

' धी ग्रँड एशियाटिक सर्कस ' मधला माजी रिंगमास्तर जलालशा आणि माजी सिंहाचा खेळ करणारा ' प्रोफेसर सिंहदमन ' ऊर्फ शिंदे हे दोघे दादरच्या पुलावरून बी. बी. च्या बाजूला निघाले–पण त्याआधीं इराण्याच्या दुकानांतील खुर्चीत शिंद्याचें कुत्रें इतकें गुंतलें होतें कीं, त्याला सोडवून काढतां काढतां शिंदे हैराण झाला, आणि त्या कुत्र्यानें कोकलून कोकलून अगदीं नको नकोसें करून टाकलें.

"अरे छोडून देनी तुझ्या कुत्त्याला ? मरूदे साला" जलालशानें सुचविलें.

"नको," शिंदे घाबरून म्हणाला, "घरीं तें माझ्या बिछान्यावर निजतं, नी मीं खालीं सतरंजीवर झोंपतों. त्याच्याकडे मीं नुसतं पाहिलं तर तें बोंबलत मालकिणीकडे जातं. पण एक दिवस–एक दिवस मीं त्याचीं बिस्किटंच लपवून ठेवीन, मग कळेल म्हणावं."

अरे ? वार्ता काय करते ? तुमी तो लई बदलून गेला शिंदिया ! ए मुंबईमंदी राहूनसी तुमी ढिला ज्याला. मला याद है तुमी तीनतीन ' लायन ' च्या खेल करीत होते, नुसती नजरच्या पावरवर. एकवार तो एका बदमाष लायनला तुम्हीं च्याबुकच्या दांडियानें ठीक केला

होता. 'सिंदिया लायन–टेमर' च्या नाम ऐकला कीं, सारा जानवर पिशाब करीत होता–आतां काय ज्याला तुमाला ?"

शिंद्याच्या डोळ्यांत क्षणभर चमक येऊन गेली.

"काय झालं कुणाला ठाऊक ! या कुत्र्यानं केलन् मला असं–"

"मिसिसच्या लई तरास होते ?"

"श ऽऽऽऽऽ क्–हें पहा इथं एक इराण्याचं दुकान आहे, बाटलींत आहे का कांहीं ?"

"अरे पुसकल है, च्यल." जलालशा म्हणाला. दोघे आंत गेले. सोडा टेबलावर आला.

"आमी एक टाइमाला एक पेग टाकते" जलालशा म्हणाला.

"मला पण तितकाच" शिंदे पुटपुटला.

"आबूला घोडेखान्यामंदी तुमच्या लई काम येईल, मॅनेजरतरीके––"

"परवा मीं दुधावरची मलई चहाला घेतली म्हणून माझ्या पोटरीला चावलं हें कुत्रं–मलई त्याला लागते."

"आबूच्या हवा लई फस्टक्लास, अने सीनसीनरीबी––"

"तें झोपेंत गुरगुरतं, घोरतं. मला घरांत सिगारेट् ओढायची देखील चोरी–त्याला चालत नाहीं म्हणून. त्याची झोपमोड होईल म्हणून कधीं कधीं मला स्वैपाकघरांत निजावं लागतं."

"पण तुमची मिसिस–"

"जाऊं दे जाऊं दे–किती वाजले ?"

"और एक डोज ?" पाहुण्यानें विचारलें.

" मलासुद्धां. " कुत्रेकरी म्हणाला.

दोघे स्टेशनाकडे जाण्यास निघाले,

" चल उठ, लुतऱ्या मुतऱ्या भिकारड्या खत्रुड कुतरड्या ! " शिंदे आपल्या कुत्र्यावर खेंकसला आणि त्याच्या वादीला एक हिसका देऊन त्याला रस्त्यावर आणून फरफटत नेऊं लागला. मालकाचा हा नवा अवतार पाहून कुत्रे संतापानें कुरकुरत चालूं लागलें.

" आम्ही त्रीस च्यालीस घोडा ठेवला है. मला सवताला इकडूनसी तिकडे फार ट्रॅव्हल करावा लागते. कोई मॅनेजर मिळेल तो पाहात होता...येते ? "

" मला वाटतं कीं हें कुत्रं पिसाळलेलं आहे. एक दिवस मिसिसच्या हातावर डांस बसला होता तो मीं मारला—तर एकदम हें येऊन मला चावलं—बाई घाईघाईनं धांवत गेल्या—मला वाटलं डॉक्टरला आणतील, पाहिलं तर आणला व्हेट—जनावरांचा डॉक्टर. "

" कमॉन, लास्ट राउंड ? " जलालशा स्टेशनबाहेरच्या सोडा लेमन दुकानापाशीं थांबून म्हणाला.

" मला देखील " शिंदे म्हणाला.

दोघे तिकिट—खिडकीकडे निघाले. एकाएकीं तीन चार लाथा झाडल्या गेल्या, एका कुत्र्यानें टाहो फोडीत स्टेशनाबाहेर पोबारा केला—तें एकटेंच पळत गेलें.

" वन आबू रोड प्लीज " तिकीट मास्तरला जलालशा म्हणाला.

"और हमारे लिये भी एक" खिशांतून पाकीट काढीत शिंदे बोलला.

---

# चोविसावा प्रेमभंग ११

इराण्याच्या दुकानांतल्या पार्टिशनच्या आड एकाद्या मुलीला "आपल्याशीं लग्न करशील कां?" म्हणून विचारणें अरुण-कुमाराला विशेषसें पसन्त नव्हतें, पण प्रीतीची निकड असल्यावर काय करणार? समोरचा फालुद्याचा ग्लास बाजूला सारून हिरण्यबालेकडे अनिमिष नेत्रांनीं पहात तो हळूंच म्हणाला,

'हिरन्, माझ्याशीं लग्न कर ना'

त्याच्या फालुद्यांतलें ऐस्क्रीम चमच्यानें आपल्या ग्लासांत घेत हिरण्यबाला म्हणाली,

'अरु, तुला मीं कितीवेळां नाहीं म्हणून सांगितलं?'

'बावीस वेळां'

'मग ही तेविसावी वेळ'

'असं कां करतेस? माझी तुला दया येत नाहीं का?'

'मुळींच नाहीं.'

'मीं काय केलं म्हणजे तुला माझ्याशीं लग्न करावंसं वाटेल?'

'तूं? तूं काय करणार?'

‘असं? ऑल राइट्, कर्मोन्, वाटेल तें करायला सांग.’

‘वाटेल तें?’

‘वाटेल तें. साता समुद्रापलीकडून गुलबकावलीचें फूल आणायला सांग. किंवा क्यांपातून हवा तो पावडरचा डबा आणायला सांगून पहा अगर—’

‘डोक्याचं काम काय होणार आहे तुझ्याकडून—होईल?’

‘कसलं डोक्याचं काम? इंटरला बसून दाखवूं? ए—तुझं लक्ष-देखील नाहीं माझ्याकडे.’

“मला, सांगू का, फार राग आला आहे अगदीं”

‘कुणाचा, माझा? हिरन्—’

‘छि! तुझा नाहीं, त्या आमच्या प्रेमावहिनींचा–’

‘म्हणजे आपल्या मिसेस फणीन्द्र?”

‘हो माझ्या मावसभावाची–फणीदादाची ती बायको!’

‘कां, इतका राग कां?’

‘राग नको तर काय? समज तुझा पुनर्विवाह झाला–आणि त्या बाईनें तिन्ही त्रिकाळ आपल्या पहिल्या नवऱ्याचं गुणवर्णन केलं, तर तुला कसं होईल?’

‘बाय जव्ह!’

‘हा त्रास आहे प्रेमावहिनीचा अलीकडे! आमचा फणीदादा बिचारा गरीब, म्हणून मुकाट्यानें सहन करतो आहे–पण एक दिवस त्यालाहि असह्य होईल!’

‘ इतकं त्या प्रेमावहिनी करतात तरी काय ? ’

‘ सकाळीं उठल्या कीं पहिल्या नवऱ्याची तसबीर कपाटांतून काढून तिच्याकडे पहात बसतात. दुपारीं जेवण झाल्यावर तोच प्रकार. रात्रीं तासभर त्या तिसऱ्या मजल्याच्या माळ्यावर एकट्या बसतात आंतून कडी लावून, नी ती तसबीर पुढें ठेवून. ’

‘ ओ माय ! ’

‘ आमचा फणीदादा अगदीं खंगत चालला आहे बिचारा. बायकोच्या यादींत आपला दुसरा नंबर असावा हें पाहून कोण नवरा कष्टी होणार नाहीं ? एरवीं प्रेमावहिनी फारच चांगल्या वागतात त्याच्याशीं.’

‘ पण “ तुझ्या पहिल्या नवऱ्याचें स्तोम फार झालं आतां,” असें फणीन्द्र सांगत कां नाहींत प्रेमाबाईना ? ’

‘ छे छे ! फारच सालस आहे आमचा फणीदादा. तो असा फट्‌दिशीं बोलायचा नाहीं कधीं बायकोला. ’

‘ आणि तिच्यामुळें तर खंगत चालला ! ’

‘ म्हणूनच कांहीं युक्ती पाहिजे–’

‘ ती सांगितली तर—माझ्याशीं लग्न करशील ? ’

‘ तर तुझ्या डोक्यांत माणसाची बुद्धी आहे इतकें मीं कबूल करीन ’

‘ मग ? ’

‘ मगच मग पाहूं. ’

‘ ठीक आहे, अशी युक्ती काढतो सोळा आणे—’

‘ काय ? ’

'आतां सुचत नाहीं मला, पण काढतों. अशी युक्ती कीं, जिच्यामुळें प्रेमावहिनीचें पहिल्या नवऱ्याचें कौतुक कमी होऊन त्यांचें लक्ष दुसऱ्या म्हणजे चालू नवऱ्याकडे लागावें'

'तोंपर्यंत मला तोंड दाखवूं नकोस'

'सिनेमाला जाण्यासाठीं देखील? बरोबर येणार नाहींस माझ्या?'

'पाहीन.'

* * * *

प्रेमदेवतेनें लावलेल्या पणावर विचार करीत अरू एका हॉटेलांत बसला असतां तेथें एका शिष्टानें त्याला सांगितलें कीं, तुम्हांला धूम्रपान सोडावयाचें आहे काय? एका दिवसांत शंभर सिगारेटस् ओढा म्हणजे आपोआपच तंबाखूचा वीट उत्पन्न होईल व असें तुमचें व्यसन सुटेल.

हा प्रयोग केल्यावर डॉक्टरकडून परत येत असतां एकदम अरूच्या डोक्यांत वीज चमकल्यासारखें झालें. 'अरेच्या' तो स्वतःशींच म्हणाला, 'प्रेमावहिनींच्या बाबतींतदेखील हाच प्रयोग करून पाहावा. प्रेमावहिनींच्या आवडीची गोष्ट म्हणजे पहिल्या पतीची आठवण; ठीक आहे, त्या आठवणीचा इतका अतिरेक झाला पाहिजे कीं नको आतां त्याची आठवण असें त्यांना होऊन जावें.'

फणीन्द्र आणि प्रमावहिनी यांच्याकडे त्याची ओळख होतीच. प्रेमावहिनींच्या पहिल्या पतीची माहिती काढून फणीन्द्र तेथें नसेल अशा वेळीं त्या पहिल्या पतीची गोष्ट प्रेमावहिनीजवळ काढावी, हा क्रम अरूनें सुरू केला. प्रेमावहिनींना असें कोणी ऐकणारें हवेंच होतें. दरखेपेला हौसेनें, डोळ्याला पाणी आणून, आपल्या गतपतीचे गुण त्या अरू-

जवळ गाऊं लागल्या. कधीं कधीं तर तीन–तीन तास त्या माणसाचे आख्यान अरूला ऐकावें लागे. त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट एवढीच कीं, फणीन्द्राकडची स्वैपाकीण फारच सुगरण होती, व प्रेमावहिनींच्या पहिल्या नवऱ्याचे वर्णन ऐकण्याच्या बदलां खाण्यापिण्याची त्याची सोय यथास्थित लागत होती.

पण प्रेमावहिनींना कंटाळा येण्याचे चिन्ह दिसेना.

'रोज रात्रीं एक तासभर ही तसबीर मीं हृदयाशीं कवटाळून त्यांचें चिंतन करीत बसतें.' त्या तारगद्गद स्वरांत सांगत होत्या. अरूनें आलेली जांभई मोठ्या मुष्किलीने दाबली.

'जेवण झाल्यावर?' त्यानें विचारलें.

'हो, आठ ते नऊ. तिसऱ्या मजल्यावरच्या माळ्यावर आंतून कडी लावून बसतें मी. मुद्दाम जागा केली आहे तिथं निवांत बसायला!' प्रेमावहिनी भावनोद्रेकानें म्हणाल्या.

त्यांनीं अरूला वर नेऊन ती जागाही दाखवून आणली.

'त्यावेळीं फणीन्द्र कुठें असतात?' त्यानें विचारलें.

'ते बाहेरून येऊन जेवतात नऊ वाजेपर्यंत. मी आधींच जेवून घेते, आमच्या श्रीमतीकाकूंना—स्वयंपाकीणबाईना—नवानंतर पुराणाला जायचं असतं—'

त्यावेळीं अरूच्या डोक्यांत ती युक्ति आली. तिसऱ्या मजल्याच्या माळ्यावर पहिल्या पतीची तसबीर घेऊन एक तास घालवण्याचें एखाद्या बाईला कांहींच वाटणार नाहीं, पण चार पांच तासांत तिला खात्रीनें कंटाळा येईल—असा कंटाळा आला तर प्रेमावहिनी आपल्या गेलेल्या

नवऱ्यापेक्षां दुसऱ्याकडे—फणीन्द्राकडे—जास्त हौसनें वळतील—बस् ! अरुण स्वतःच्या युक्तिवर स्वतःच खूष झाला व शक्य तितक्या लौकर त्यानें ती युक्ती अंमलांत आणण्याचें ठरविलें.

* * *

एके संध्याकाळीं आठाच्या सुमाराला अरुण फणीन्द्राकडे आला, तेव्हां त्याच्या अपेक्षेप्रमाणें बाहेरच्या खोल्यांतून अन्धार होता, फक्त स्वैपाक-घराच्या बाजूला दिवा होता. बाहेर कोणी नव्हतें पण तिसऱ्या मजल्याच्या माळ्यावर दादर चढून जाणारीं पावलें ऐकूं येत होतीं. क्षणाचाहि विलंब न करतां अरुण चोरपावलांनीं वर धावला. प्रेमावहिनी आपल्या एकांत चिंतनासाठीं माळ्यावर गेल्या हें उघड होतें, हळूच जाऊन त्यानें माळ्याची कडी लावून घेतली व पायऱ्या उतरून तो परत अंधारांत दिवाणखान्यांतल्या एका आरामखुर्चीवर येऊन बसला.

त्याचा व्यूह सोपा होता—फणीन्द्र बाहेरून आले, कीं त्यांना जवण उरकायला लावून कोठेंतरी सिनेमाला घेऊन जायचें, साडेबारा एकाला ते परत आले म्हणजे सावकाश माळ्याची कडी काढतील—मग त्यानंतर प्रमावहिनी त्यांच्याकडे पहिल्या पतीपेक्षां अधिक लक्ष खात्रीनें पुरवतील. मग हिरनूला कळेल आपल्यालाही डोकें आहे कां नाहीं तें—यानन्तर तिला ‘ नाहीं ’ म्हणूं दे, मग पाहतो काय तें............

हळू हळू त्या दिवाणखान्यांतल्या आरामखुर्चीवर अरूला डुलकी लागूं लागली. फणीन्द्रांना येण्यास आज इतका उशीर कां ? दूर कोठेंतरी दार कोण वाजवीत आहे ? किती वाजले ? वगैरे आळसट विचार त्याच्या

डोक्यांत येऊन गेले, पण न सुटणाऱ्या प्रश्नांत डोकें घालण्याचा त्यानें कंटाळा केला. अरूला झोंप लागली.

त्यामुळें दिवा लागतांच त्यानें दचकून उडी मारली. फणीन्द्र, प्रेमा-वहिनी आणि हिरण्यबालाहि समोर उभी होती.

' अरे तुम्ही इथें कसें ? केव्हां आलांत ? बाहेर कुलुप नाहीं—म्हटलं आहे काय ? श्रीमतीकाकूंना आम्ही बजावून ठेवलं होतं कुलूप लावून जा म्हणून '

आपण झोपेंतच आहोंत असें अरूला वाटूं लागलें. ' मी आठानंतर आलों होतों तुम्हांला सिनेमाला न्यायला; किती वाजले ? ' तो फणींद्रांना म्हणाला.

' साडेबारा, आम्हीं सगळे सिनेमालाच गेलों होतों. ' ते म्हणाले.

' दार कुठं वाजत आहे सारखं ? ' हिरन् म्हणाली.

' अगबाई स्वैपाकघरांत दिवा तसाच ? ' प्रेमावहिनी आंत जात जात म्हणाल्या.

त्या लौकरच बाहेर आल्या—

' हें काय ? स्वैपाक अर्धाच सारा—श्रीमतीकाकू मधेंच टाकून गेल्या कीं काय ? '

' वर कुठलं तरी दार ठोठावतं आहे कुणी तरी ! '

' वर ? '

' माळ्याचं दार कोण ठोठावणार ? "

' चला पाहूं तर ? '

' तुम्ही व्हा पुढें—'

फणींद्र जिवाचा धडा करून अरूला घेऊन वर निघाले. ' आपण आंत कोणाला कोंडलें ? ' हें अरूलाहि पाहायचेंच होतें. त्यांच्या पाठोपाठ प्रेमावहिनी आणि हिरन् आल्या.

तिसऱ्या मजल्याच्या माळ्याच्या दारापलीकडून ठोठावण्याचे व अस्पष्ट ओरडल्याचे आवाज येतच होते. फणीन्द्रानीं धीर धरून कडी काढली व ते एकदम बाजूला झाले.

आंतून म्हाळसेसारख्या श्रीमतीकाकू बाहेर आल्या !

" आठवाजतांलोणच्याचीमोठीबरणीपाहायलाआलें,तोंकोणीमेल्यानं बाहेरूनकडीचलावूनघेतली?एकक्षणभरयाघरांतराहायचंनाहींमला !मध्यरात्र उलटूनगेली,भुकेनंप्राणव्याकूळझालेमाझे !' इ. इ. तणतणत फणफणत श्रीमतीकाकू स्वैपाकघराकडे गेल्या. त्यांच्या मागोमाग त्यांची समजूत करायला प्रेमावहिनींनीं फणीन्द्रांना पाठवलें.

' कोणी कडी लावली कोण जाणे ? ' प्रेमावहिनी म्हणाल्या.

' मीच लावली ' अरू बोलून गेला, अगदीं हलकें.

' तुम्ही ? ' हिरननें विचारलें.

' ती कां ? ' प्रेमावहिनींनीं प्रश्न केला.

त्याला तो उत्तर काय देणार ?

माळ्यावर गेलेल्या त्या तुम्हीच या समजुतीनें मी बाहेरून कडी घातली—हेतू हा कीं तुमच्या पहिल्या पतीच्या आठवणीचा तुम्हांला अगदीं वीट यावा, असें थोडेंच त्या बाईला तो सांगणार ?

'त्यांची थट्टेची आचरट कल्पना असेल कांहीं तरी' हिरन् तिरस्कारानें म्हणाली.

'नाहीं, नाहीं—' तो काकुळतीनें म्हणूं लागला.

'छे, राहात नाहींत त्या!' फणीन्द्र बाहेर येऊन उद्विग्न चेहऱ्यानें म्हणाले, 'स्वयंपाकघरांत गुळाचा नि दाण्यांचा डबा पुढें घेऊन श्रीमतीकाकू बसल्या आहेत, दोन्हीं हातांनीं खाणं चालू आहे, फक्त "उद्यांपासून येत नाहीं" एवढं सांगण्यापुरत्या थांबतात कीं पुन: सुरू.'

हिरण्यकुमारी व प्रेमावहिनी यांचे डोळे कट्यारीसारखे अरूला आरपार भोंसकून जात होते—

'कोणी कोंडून ठेवलं बुवा त्यांना?' फणीन्द्र विस्मयानें पुटपुटले.

'यांनीं' दोघी एकदम म्हणाल्या.

'तें कां?'

या पुढची चिकित्सा होण्यापेक्षां तेथून निघून जाणेंच अरूला अधिक पत्करलें.

अरुणकुमाराचा चोविसावा (व हिरण्यबालेच्या बाबतींत शेवटचा) प्रेमभंग कसा झाला याची ही अधिकृत हकीकत आहे.

---

# छन्दाचा जन्म १२

ऊन कडकायला लागलें तरी एल्या कोळ्याला शिकार सांपडली नव्हती. चार घटका तीरकमान एकसारखी तयार ठेवूनही मध्यान्हीपावेतों त्याला सावज भेटलें नव्हतें. साऱ्या रानांत जणूं शुकशुकाट वाटत होता. गर्द झाडींनें व्यापलेल्या त्या लहानशा दरींत एल्या इतका वेळ सावधपणें हिंडत होता, पण चिटपाखरूंदेखील त्याच्या बाणाच्या टप्प्यांत येत नव्हतें. तसें म्हणावें तर जंगलांत जनावरें पुष्कळ नजरेस पडून जात होतीं...हरणांचें एखादें टोळकें चटकन् उड्या मारीत इकडून तिकडे जायचें, समोरून पण दुरून. एक अस्वल त्याला पाहून अगोदरच निमूटपणें झाडाच्या शेंड्यापर्यंत चढून गेलें. पलीकडे हिरवळीवर पांढरे मोर नाचत होते, पण क्वचित् उडणारे तेसुद्धां एल्याचें लक्ष जातांच सावकाश उडत दूर गेले. आभाळांतून लुसलुशीत पारव्यांची रांग संथपणें जायची पण टप्प्याबाहेरून. आवाजदेखील फारसे कसले येत नव्हते. मधूनमधून एखाद्या झऱ्याची खळखळ कानांवर पडे, वारा 'गुं-गुं' असा आवाज करीत होता, आणि त्या आवाजाबरोबर दुसराहि एक स्वर एल्याच्या कानांवर मधूनमधून अस्पष्टपणें पडत होता. एखाद्या फांसेपारध्यानें दोन झाडांत ताणलेली तांत एखाद्या टहाळीनें जशी

छेडली जावी तसा ' तुंग् तुंग् ' असा अस्पष्ट आणि मंजुळ ध्वनि. तो ध्वनि त्यानें आयुष्यांत एकदांच, स्वप्नांत ऐकला होता—ज्या दिवशीं त्याची वनी त्याच्याकडे पाहून पहिल्यांदा हंसली होती त्या रात्रीं ! आज शिकारच नको असा एक विचार एल्याच्या मनांत येऊन गेला, पण त्या त्याच्या वनीनें आतांपर्यंत सहा पोरांना जन्म दिला होता, आणि तींच पोरें लांडग्याच्या पिलांसारखीं भुकेनें कावून आपली वाट पाहत आहेत हें एल्याला दिसत होतें. आज सारी सृष्टि प्रसन्न होती, पण दिवस पुरता वर आला, पोटांत भुकेची आग पटली, आणि माथ्यावरचा ताप एल्याला दुपटीनें जाचूं लागला.

खालच्या रानांत कुठेंही शिकार मिळाली नव्हती म्हणून नाइलाजानेंच एल्या शिकारीच्या हद्दीबाहेर या ' वाल्याच्या दरीं'त आला होता. इकडे कधीं कोणी फिरकत नव्हतें. असें सांगत कीं, फार मागें केव्हां तरी वाल्या नांवाचा एक अट्टल वाटमाऱ्या या दरींतल्या एका गुहेंत जो गेला तो बाहेरच आला नाहीं ! कोणी म्हणत तो विवरांतून दुसऱ्या रस्त्यानें तिसरीकडेच कुठें निघून गेला, तर कोणी म्हणत तो तेथें भूत होऊन राहिला आहे. कांहींच्या मतें तो अजूनही त्याच गुहेंत कोठेंतरी आहे—पण गुहेंत मधमाशांची पुरुष–पुरुष उंचीचीं मोहोळें होतीं, तेव्हां वाल्या वाटमाऱ्याचा शोध जास्त कसोशीनें करण्याच्या कोणी भानगडींत पडलें नव्हतें. एक जास्त चौकस कोळ्याचें पोर एकदां गुहेंत जाऊन आलें होतें, पण आंतून ' म्म्म्ममम् ' असा अस्पष्ट आवाज आलेला ऐकून तें भेदरून परत आल्यापासून वाल्याच्या दरीकडे वावर असा नव्हताच. इथें हटकून कांहीं तरी शिकार मिळेल म्हणून एल्या हिमतीनें आणि जिवावर उदार होऊन इकडे आला होता, पण त्याला कांहीं

मिळालें नव्हतें. निरुपाय होऊन, परत जावें नि झाडपाल्यानें पोट भरावें म्हणून तो वळला—आणि त्याला ती करकोच्यांची जोडी दिसली.

उथळ पाण्यांत मधून मधून उगवलेल्या लव्हाळ्याचें वाऱ्यानें हालतें मखर केलें होतें, आणि दोन शुभ्र हत्तींच्या सोंडांचा खेळ चालावा त्याप्रमाणें दोन करकोच्यांच्या त्या गोल, धवल, मृदु माना विळखे घेत होत्या. कधीं त्यांचे पंख चक्रें धरीत होते तर कधीं त्यांचे लाल तुरे नाचत होते.

नेम धरतांना, करकोच्याचें मांस चिवट नि बेचव असतें हा विचार एल्याच्या डोक्यांत एकदां येऊन गेला, पण मिळणारें मांस बेचव असलें तरी न मिळणाऱ्या मांसापेक्षां बरें, हा विचार त्यानें केला आणि तीर सोडला. एक कर्कश आणि आर्त किंकाळी ऐकूं आली, अस्ताव्यस्त पंख फडफडले, एक करकोचा ओरडत उडून गेला, पडलेल्या करकोच्याची मुंडी मुरगळायला एल्या धांवला, इतक्यांत्

'कधीं नाहीं अरे क्रूरा! मुक्ति ती मिळणें तुला
ऐन रंगामधें दोघें—एकाला मारुनी असें!'

या गंभीर गर्जनेनें ती दरी एकाएकीं निनादली. एल्यानें पाहिलें तो एक भयंकर उग्र पुरुष लाल डोळ्यांनीं पाहत त्याच्याकडे येत होता. त्याच्या डोईचे केस आणि दाढीमिशा अस्ताव्यस्त वाढलेल्या होत्या. त्याच्या अंगावर कसल्यातरी झाडाची साल गुंडाळली होती की त्याच्याच अंगच्या केसांवर माती बसून कुडासारखा कपडा तयार झाला होता हें सांगतां येत नव्हतें. त्याचे ओठ कांहीं तरी पुटपुटत होते आणि ती भेदक दृष्टि गेल्या युगांतून पाहत असल्यासारखी खोलांतून

धुमसत होती. शेंकडों वर्षांच्या अंधारांतून बाहेर आल्यासारखी दिसणारी ही नजर आपल्याला जाळून राख करते कीं काय असें थोडा वेळ एल्याला वाटलें; पण आपण एवढें केलें तरी काय असेंही त्याला वाटत होतें. जोडींतलें सावज कां मारायचें नाहीं? तर दुसरें निसटतें म्हणून, हा शिकारीचा नियम एल्याला कबूल होता, पण अडचणींत सांपडून तो मोडला म्हणून या जंगलीबुवाला इतकें भडकण्याचें कारण त्याला दिसेना. धीटपणानें त्याला विचारावें म्हणून एल्या त्याच्याकडे पाहतो—तों ते डोळे कांहींच पाहात नव्हते. ती दृष्टि एल्याच्या आरपार जात होती. दिसणारें असें सारें त्या नजरेंत सामावून जात होतें. दाढीमिशांतून कांहीं तरी अस्पष्ट शब्द मधूनमधून निघत होते. एक तर्जनी ताल देत होती. एल्या आतां त्या पुरुषाच्या गांवींहि नव्हता. त्याच्या डोक्यांत दुसरेंच कांहीं आलें होतें. खडबडून जागें झालेल्या माणसाच्या मुद्रेनें ती अजब व्यक्ति दुसरीकडे वळली आणि आपल्याच नादांत चालत जात अरण्यांत दिसेनाशी झाली!

मारलेला करकोचा घेऊन घरीं जातांना आपल्यावर क्षणभर आग पाखडणाऱ्या त्या विचित्र माणसाबद्दल एल्याच्या मनानें चांगलीच तेढ घेतली. माणसाच्या अडचणीची ओळख नसलेला हा शिष्ट कोण? एकदां खेचला पाहिजे चांगला आणि दिली पाहिजे समज चांगली याद राहण्यासारखी. मग पाहूं दे त्याच्या लाल डोळ्यांनीं हवा तेवढा—त्या म्हाताऱ्याच्या विचारामुळें एल्याला त्या करकोच्याच्या मांसांत अगदींच कांहींसुद्धां गोडी वाटली नाहीं.....

हळूहळू त्या डोंगरांतून बोलबाला व्हायला लागला, कीं वाल्या कोळी गुहेबाहेर आला आणि तो देखील शेंकडों वर्षांनीं! त्यानें

सांगितलें म्हणे कीं, वाटमारी करीत असतां एक शहाण्या माणसानें आपल्याला उपदेश केला आणि त्यामुळें पश्चात्ताप होऊन आपण शेंकडों वर्षें एका निवान्त जागेंत बसून माणसांचें बरें कसें होईल हा विचार केला. माणसांनीं एकमेकांचें बरें केलें म्हणजे सर्वांचेंच बरें होईल हें सार आपण शेवटीं काढलें; व एकमेकांचें बरें कसें करावें हें लोकांना समजावें म्हणून राम नांवाच्या एका भल्या माणसाची सविस्तर हकीकत आपण लवकरच सर्वांना सांगणणार आहोंत.... तो जरी स्वतःला वाल्या कोळी म्हणूनच घेत होता तरी इतकें गोड व शहाण्यासारखें बोलत होता, कीं लोकांनीं त्याला वाल्मीकि हें नांव देऊन त्याला ऋषीसारखा मान देण्यास आरंभ केला होता—आणि ती रामाची गोष्ट सांगण्याची त्याची तऱ्हा अशी होती, कीं ऐकणाराला मोठ्या थेंबांनीं पण अगदीं सावकाश पडणाऱ्या पावसांत उभें राहिल्यासारखें वाटावें.

पण वाल्या असो का वाल्मीकि, त्यानें आपल्याला थोडा वेळ तरी खाऊं कां गिळूं करून आपल्यावर त्या डोळ्यांनीं आग पाखडली आणि ती देखील क्षुल्लक कारणाकरतां, हें एल्याच्या डोक्यांतून जाईना; उलट जसजशी वाल्मीकीची कीर्ति दुमदुमूं लागली तसतशी एल्याची चीड वाढत गेली. त्याला अरण्याचा धर्म माहीत होता आणि स्वतःचाही; मृगयेचा निर्बंध मोडला याचें दूषण ऋषीचा आव आणणाऱ्या आपल्यासारख्याच एका कोळ्याकडून निमूटपणें ऐकून घ्यायला तो तयार नव्हता; याचा जाब विचारायलाच हवा होता.

एक चांगला मोठा धोंडा एका हातानें मागें लपवून एल्या वाल्मीकीला भेटायला गेला. जास्त गडबड केली तर वेळप्रसंगीं वाल्मीकीचा

कपाळमोक्षहि करूं, नंतर न्यातीला सांगूं फार तर, कीं माझ्या पोटाच्या उद्योगांत त्यानें मला छेडला, मी मारला—अशा एकेरीवर त्याचे विचार येत होते; वाल्याला सरळ आव्हान द्यावें, कां ' तुझ्या बापाला शिव्या देतोस थेरड्या?' म्हणून हातांतला गोटा एकदम त्याच्या डोक्यांत हाणावा हें ठरवीपर्यंत तो वाल्मीकीच्या झोंपडीपुढें आला. आंतून वाल्मीकीनें वर पाहिलें. एल्या चित्त्यासारखा जागच्या जागीं टीप धरून उभा राहिला.

' ये, एल्याभाऊ ये!' वाल्मीकि उठून आनंदानें म्हणाला. त्याच्या मुद्रेवर खरोखरचा हर्ष स्फुरत होता, ' अरे, मी तुझीच वाट पाहतों आहे इतके दिवस! एल्या, तुझे माझ्यावर केवढे उपकार झाले! मीच काय—सारें जग तुझें उतराई राहील! तूं काय केलेंस माहीत आहे? त्या करकोच्याच्या वधानें अभावितपणें माझ्या भावनांना ऊत आणलास; आणि त्या मला न कळत माझ्या तोंडून नाचत बाहेर पडल्या. सरपटणाऱ्या बोलीला पाय मिळाले, विचारांच्या ओघांवर तरणाऱ्या भाषानौकेला वल्हीं मिळालीं, मधुर स्वरांच्या रचनेला ताल मिळाला; विस्कळीत शब्दांचे सर जडले! म्हणजे पहा—

क–धीं—ना–हिं, अ–रे–क्रू–रा
मुक्ति–ती, मि·ळ·णें तु-ला

आठ आठ अक्षरांचे दोन खंड जसे या ओळींत, तसेच दुसऱ्याही ओळींत! दोन ओळींचा असा हा छंद झाला. ' अनुष्टुभ्' नांव देऊं आपण याला. कल्पनेला ही पहिला गति मिळाली. आतां काव्य आणि संगीत हें दिव्य अनुभव मानवमात्राला खुले झाले! धन्य, धन्य मीं या

चैतन्याचा पहिला वारसदार—आणि महाभाग्यवान् तूं—या प्रसादाचा नकळत वांटेकरी ! एल्या, माझ्या भावा, ये, मला कडकडून भेट ! '

म्हणून वाल्मीकीनें त्याला प्रेमालिंगन दिलें ! एल्याचा दगड हातांतून केव्हांच गळून पडला होता. त्याच्या हृदयांत कांहीं अढी राहिली नव्हती. वाल्मीकि बोलला त्यांतलें अक्षरहि एल्याला कळलें नाहीं; पण हा मनुष्य आपल्याबद्दल विलक्षण खुषी आहे हें त्याला जाणवलें. त्याच्याहि डोळ्यांतून आनंदाश्रु वाहिले.....

# गाढवाचें गाऱ्हाणें १३

स्वतःच्या कारखान्यात तयार होणाऱ्या मालाची जाहिरात करण्यासाठीं एका धंदेवाइक इसमानें वृत्तपत्रांतून मोठमोठ्या जागा घेतल्या, पण त्या भाडोत्री जागा मालाच्या जाहिराती-ऐवजी मालकाच्याच स्तुतीनें भरून जाऊं लागल्या. पैसे भरून करून घेतलेल्या या स्तुतीनें आपण खरोखरच थोर आहोत असें त्या इसमास वाटूं लागलें व त्याबरोबरच आपल्या थोरवीचा संशय घेणारे व आपल्या मालाची चिकित्सा करणारे टीकाकार वाईट, असा मूर्ख ग्रह त्यानें करून घेतला. कौतुक किंवा तारीफ म्हणजे अनुकूल अथवा विधायक टीका, उलटपक्षीं प्रतिकूल टीका म्हणजे दुष्टावा अगर विध्वंसक वृत्ति, असा साधा हिशेब त्यानें मनाशीं बांधला, आणि या तर्कवादाच्या आधारें एका मुलाखतीत आपलें हृद्गत असें सांगितलें कीं, पुढील जन्मीं मला टीकाकार व्हावेंसें वाटतें-म्हणजे लेखणीच्या फटकाऱ्यासरशीं लोकांच्या मेहनतीवर पाणी पाडण्याची संधि मला मिळेल. या ओबडधोबड वक्रोक्तीनें टीकाकाराच्या भूमिकेबद्दल

*आपलें अगाध ज्ञान दाखविणाऱ्या अशा इसमास खरोखरच नवनवे जन्म मिळाले तर काय होईल याचा अंदाज लावताना ही कथा तयार झाली.*

खरें पाहिलें असतां आपल्या पृथ्वीवरच्या दिवाळीबरोबरच स्वर्गांतही दिवाळी साजरी होते—व ती बातमी मिळतांच आपण पुन्हां 'देव दिवाळी' साजरी करतो. नुसत्या दिवाळीच्याच बाबतींत नव्हे तर दुसऱ्या कित्येक गोष्टींत देव आपली नक्कल करतात; साहजिकच आहे, पांच हजार वर्षांपूर्वी तेव्हांच्या कल्पनेप्रमाणें बनविलेल्या स्वर्गाच्या प्रजेला, मानवी प्राणी आपल्यापेक्षां अधिक सुखसोयी भोगीत आहेत ह स्वस्थपणें कसें पाहवेल? तेव्हां दरेक गोष्टीत पृथ्वीची बरोबरी करण्याचा दिवौकसांचा प्रयत्न असतो. आपण वर्तमानपत्रें काढतो हें पाहून देवांनीही 'स्वर्गसमाचार' नांवाचें पत्र काढलें आहे; या पत्राचें भांडवल कुबेरानें ( बारा टक्के दरानें ) पुरवलें असून मालकी ब्रह्मदेवाची आहे—कारण प्राण्यांच्या कोट्यवधि प्रती छापण्याचा कारखाना त्याचे जवळ आयताच तयार आहे. संपादकमंडळाचा प्रमुख चित्रगुप्त असून व्यवस्थापक तुंबरू आहे—मुख्य वार्ताहर नारद हें सांगण्याची जरूरच नाहीं.

भूलोकावर वृत्तपत्रें दिवाळी अंक काढतात हें पाहून ब्रह्मदेवानेंहीं या खेपेस आपल्या पत्राचा विशेषांक काढण्याचें ठरविलें. या अंकासाठीं इन्द्राच्या स्तुतिपर कविता, अप्सरांचीं चित्रें, निरनिराळ्या ऋषींचे विद्वत्ताप्रचुर लेख, विष्णु व शंकर या देवांचे संदेश वगैरे आकर्षक साहित्यही बरेंच जमा झालें; पण ब्रह्मदेवाला यावेळीं कांहींतरी नवें

व वेगळें हवें होतें. तसें कांहीं असल्याखेरीज दिवाळी अंकाचा खप तडाकेबन्द होणार नाहीं अशी त्याला भीति होती. तशांत सदासर्वदा असंतुष्ट असणाऱ्या विश्वामित्रमुनींनीं 'नवा स्वर्ग' म्हणून एक प्रतिस्पर्धी वृत्तपत्र नुकतेंच काढलें होतें. त्या चढाओढीनेंही विक्री पडण्याची धास्ती होती. अशा परिस्थितींत कोणतें नवें सदर सुरू करावें हा ब्रह्मदेवाला मोठा प्रश्न पडला.

या पेचप्रसंगांत 'पृथ्वीवरील निवडक प्राण्यांच्या मुलाखती' हें अभिनव सदर जेव्हां नारदानें सुचविलें तेव्हां ब्रह्मदेवानें मोठ्या उत्साहानें त्या सूचनेचा स्वीकार केला. संपादक चित्रगुप्त याला त्यांत विशेष तथ्य दिसत नव्हतें, पण त्याचा स्वभावच चिरचिऱ्या, कोट्यवधी आयुष्यांच्या खतावणीवर बसूनबसून आंबलेला देव तो, कुठल्याही नव्या कल्पनेनें थरारून जाण्यासारखी स्थितीच उरली नव्हती त्याची; म्हणून त्याच्या कुरकुरीकडे लक्ष न देतां ब्रह्मदेवानें नारदाला आपली कल्पना अंमलांत आणण्यासाठीं ( तसलमात भत्ता देऊन ) भूलोकावर पाठविलें.

'स्वर्गसमाचारा' तर्फे नारद पृथ्वीवर मुलाखती घेण्यास आला आहे हें कळण्याचा अवकाश, थोड्याच दिवसांत मुलाखतींच्या ऐवजीं खानेसुमारीचेंच काम आपल्याला करावें लागणार असें नारदाला वाटूं लागलें; कारण भूलोकावर मुलाखती देण्यासाठीं इतके लोक उत्सुक होते कीं, त्यांनीं स्वतःच तयार केलेल्या स्वतःबद्दलच्या माहितीची गोळाबेरीज एका मोठ्या प्रांताच्या शिरगणती–अहवालाइतकी सहज झाली असती. परीक्षा देणाऱ्या विद्यार्थिनी, परदेशी जाणारे व जाऊन आलेले लोक, निवडणुकीस उभे राहणारे व निवडून आलेले, पत्रें लिहिणारे व पत्रकें काढणारे, देणग्या देणारे व मागणारे, पदव्यांची आशा धरणारे व त्या

मिळविणारे, लग्नें करणारे, कुस्त्या जिंकणारे, विक्रम करणारे व विचित्रपणा करणारे, होऊन गेलेले, चालू व होतकरू पुढारी—थोडक्यांत म्हणजे वर्तमानपत्रांत कुठल्याही सबबीवर ज्या मंडळींचे फोटो व मजकूर छापून येतात, त्या सर्वांनीं आपापल्या फोटो व मजुकराचीं तयार टिपणें घेऊन नारदाचा अगदीं पिच्छा पुरवला. या गर्दींत बोलपट कंपन्यांतील मालक, नटनटी व अन्य कलावन्त यांच्या छापील मुलाखतींचे भारे डोक्यावर घेऊन नारदाच्या पायांत घोटाळणारे कांहीं पाळीव लेखकही होते; त्यांच्यापैकीं कित्येकजण नुसता मुलाखती छापण्याचाच नव्हे, तर सबन्ध अंकाचा खर्च देखील देण्यास तयार होते.

या एकंदर प्रकारानें गोंधळून जाऊन आपण मुलाखतींची कल्पनाच सोडून दिल्याचें नारदानें जाहीर केलें—व वरील मण्डळींनीं चिडून, ‘स्वर्गसमाचार’ पत्रावर बहिष्कार टाकण्याची धमकी दिली. पृथ्वीवर त्या पत्राचा खप नसल्यामुळें नारदाला त्या धमकीचें मुळींच भय वाटलें नाहीं; इतकेंच नव्हे तर त्या धमकीची वार्ता ऐकून चित्रगुप्तानें ‘लोकमताला जपा’ हा संवईनुसार दिलेला वायफळ इशाराही नारदानें धुडकावून दिला—पृथ्वीवरच्या लोकमताला जुमानण्याची स्वर्गाच्या वृत्तपत्राला जरूर काय? असो. नारदानें स्वतःला योग्य दिसलेल्या कांहीं प्राण्याच्या मुकाट्यानें मुलाखती घेतल्या—मुलाखतीसाठीं हपापलेल्या अशा एकाही प्राण्याला त्यानें संधी दिली नाहीं. ही मुलाखत आहे असें देखील कोणा ‘मुलाखिता’ला त्यानें भासूं दिलें नाहीं. मिळालेली माहिती गोळा करून नारदानें ( दुबऱ्या उपसंपादकाच्या शिरस्त्याप्रमाणें ) ती संपादक चित्रगुप्ताकडे न पाठवतां थेट मालक ब्रह्मदेवाकडे धाडली. या माहितीला नारदाच्या अपेक्षेपलीकडे महत्त्व प्राप्त झालें. ‘स्वर्गसमाचार’

पत्राच्या दिवाळी विशेषांकासाठीं टूम म्हणून घेतलेल्या भूतलावरील जीवांच्या त्या मुलाखती खऱ्या, पण त्या वाचून ब्रह्मदेवाला आपण निर्माण केलेल्या सृष्टींतील लोकमताची अनपेक्षित चुणुक मिळाली. त्याला दिसून आलें कीं, आपापल्या स्थितींत समाधान असें पृथ्वीवरच्या फारच थोड्या जीवांना वाटत आहे, बहुतेकांची कांहींना कांहींतरी तक्रार ही आहेच. त्यातल्यात्यांत (नारदाच्या इतिवृत्तावरून दिसलें कीं) मुलाखित मंडळींत एका कुम्भाराच्या गाढवाला स्वतःच्या परिस्थितीबद्दल विशेषच तीव्र असमाधान आहे.

त्या गाढवानें तें असमाधान अभिनव पद्धतीनें व्यक्त केलें होतें; नारदाजवळ हृद्गत सांगतांना त्या प्राण्यानें स्वतःच्या सद्यस्थितीबद्दल विध्वंसक तक्रार न करता, आपल्याला दुसरा जन्म मिळाल्यास कोणतें दुःख दूर होईल हे विधायक पद्धतीनें दाखवून दिलें होतें. ब्रह्मदेवाला या प्राण्याचें मोठें कौतुक वाटलें व त्यानें नारदाकडून त्याला भेटण्यास बोलावलें. आपल्या म्हणण्याचा ब्रह्मदेव देखील विचार करतो हें पाहून त्या गाढवाला मोठा हर्ष झाला; त्यानें मेल्याचें सोंग करून मालकाकडून रजा मिळविली व तें नारदाबरोबर ब्रह्मलोकीं गेलें. ब्रह्मदेवानें त्याचें ममतेनें स्वागत करून त्याला शेजारीं बसवून घेतलें आणि त्याच्या पाठीवर हात फिरवीत विचारलें,

"बाळा, पुढल्या जन्मींच दूर होतील अशा या जन्मींच्या तुझ्या काय तक्रारी आहेत?"

गाढव बोलण्यासाठीं अगदीं अधीर झालें होतें,

"काय सांगू देवा," तें दाटलेल्या गळ्यानें म्हणालें, व लगेच

दाटलेला गळा साफ करूं लागलें—ब्रह्मदेवाला आपल्या आठ कानांवर हात ठेवता ठेवता मुष्कील झालें. नारदानें ' जरा हलकेच ' म्हणून गाढवाला सुचविलें.

शक्य तितक्या हलक्या आवाजांत गाढव बोललें,

" देवा, मीं इतकी मेहतन करतो, पण त्याचें चीज नाहीं. माझ्या पाठीवर मी आजपर्यंत वाहून आणलेल्या मातीचा मेरू पर्वत उभा होईल, पण त्याची कुणाला पर्वा नाहीं. एका ठिकाणीं खणलेली माती माझ्या पाठीवर दुसरीकडे नेऊन मीं इकडची सृष्टी तिकडे केली, पण तें ओळखण्याची दृष्टी कुणाला नाहीं. मातीचीं मडकीं हजारोंवारी झालीं असतील, पण त्यांत माझ्या श्रमांचा भाग होता याची कुणाला कदर नाहीं. माझ्यामुळें इतकें कार्य होतें, पण त्याचें कौतुक नाहीं. मी इतका खपतो, झटतो, धडपडतो, त्याचा मोबदला काय तर बेफिकिरी, हेटाळणी, नापसंती ! खरोखर देवा–"

म्हणून गाढवाला गहिंवर असह्य होऊन तें सूर काढणार—इतक्यांत नारदानें त्याला पुन्हां आवरलं.

" तुझी तक्रार नीटशी कळली नाहीं मला. तुझा मालक तुला नीट वागवीत नाहीं असें तुझें म्हणणें ? "

" नाहीं देवा, मालक नीट वागवतो, खायलाप्यायला भरपूर देतो, माल चांगला खपतो, धंदा चालतो, तो मला कांहीं कमी पडूं देत नाहीं. "

" मग कुणाबद्दल गाऱ्हाणें आहे तुझें ? "

" मालकाच्या गिऱ्हाइकांबद्दल. मोठे चवंढाळ लोक आहेत ते देवा' मालकाच्या मालाची इतकी चिकित्सा करतात, आमचीं मडकीं इतकीं वाजवून पहातात कीं जणूंकाय मडक्याच्या मातीलाच काय ती किंमत— आमच्या मेहनतीला मोलच नाही—"

" पण ही तक्रार तुझ्या मालकाकडून आली तर जास्त शोभेल—"

" देवा, मडकीं घडवण्यांत माझीही भागी नाहीं का? मालक आणि भागीदार हे काय वेगळे आहेत? मी मालकाच्या बरोबरीनें नाहीं का कष्ट करीत?"

" पुन्हां तुमचीं गिऱ्हाइकें पैसे देतात. त्याचे मोल म्हणूनच मालाकडे पाहतात. माल बनवायला तुम्हीं काय केलेंत याची त्यांन कशाला पंचाइत?"

पण आम्हांला थोडेंतरी उत्तेजन? एकादा तरी आवडीचा शब्द? कांहींतरी निदान चुचकारणी?"

" मग काय तुमच्या मडक्यांना कोणीच चांगलें म्हणत नाहींत!"

" म्हणतात, पण ते सगळे आमचे आश्रित, नी एकादी थाळीपणती फुकट मिळेल या आशेवर घोटाळणारे बुभुक्षित असतात; तिऱ्हाइत कांहीं आम्हाला हवं तसं आमचं कौतुक करीत नाहींत!"

" मग पुढला जन्म कसला मिळाला म्हणजे तुला बरं वाटेल?"

" ज्यांत सगळे आपलं कौतुक करतील असा जन्म मला मिळावा देवा"

" तथास्तु" ब्रह्मदेव म्हणाला. त्यानें गाढवाला मानवयोनींत एका वेश्येचा जन्म दिला.

वेश्येच्या जीवनांत गाढवाला हवें तेवढें कौतुक मिळूं लागलें, 'वाहवा!' 'खाशी!' अशा उद्गारनीं त्याचे कान दुमदुमूं लागले. त्याच्या मेहनतीचें चीज होऊं लागलें, पण तरीही त्याला समाधान नव्हतें. पुन्हां त्यानें ब्रह्मदेवाकडे अर्ज केला. ब्रह्मदेवानें त्याला बोलावून विचारलें,

"आतां काय तक्रार आहे?"

"देवा, सगळ्यांचें कौतुक तोंडदेखलेंच असतें, माझ्या कलेचे नाजुक पाश कोणाला गुरफुटून टाकूं शकत नाहींत. माझ्या जाळ्यांत पुरतें कोणीही सांपडत नाहींत—मग माझ्या कलेचा उपयोग काय?"

ब्रह्मदेवानें वेश्येला कोळ्याचा जन्म दिला. त्या कोळ्याच्या नाजुक पाशांत एकेक सावज पुरतें गुरफटूं लागलें. जाळें विणण्यांत त्यानें खर्च कलेली कला पुरी उपयोगांत येऊं लागली.

तथापि त्या कोळ्याला संतुष्टता नव्हती; फिरून त्यानें ब्रह्मदेवाचा धावा केला आणि सांगितलें कीं माझी कला सहेतुक ठरली खरी पण ती फक्त बारीकसारीक कृमिकीटकांपुरती. तिला टिकाऊ असें स्वरूपच नाहीं. वाऱ्याच्या एका झुळकीसरशी माझी कला उडून जाते, माझ्या कारागिरीची वाट लागते, तरी ज्या जन्मांत माझ्या कलेला कांहीं प्रभावी स्वरूप येईल, माझें कसब जीवनाला मदत करील, असा जन्म, देवा मला प्राप्त व्हावा.

ब्रह्मदेवानें गाढवाला पुन्हां माणसाच्या जन्माला घालून एक न्हावी बनवलें. या जन्मीं त्याच्या कलेला स्थायी स्वरूप प्राप्त झालें. न्हाव्यानें बोडलेलीं डोकीं कित्येक दिवस त्याच्या कौशल्याची साक्ष देऊं लागलीं. वाऱ्याच्या

झुळकीनें त्यानें कापून टाकलेले केसच तेवढे उडून जात असत, कारागिरी शिल्लकच रहात असे. त्याच्या कलेचा प्रभाव त्याच्या वस्तऱ्यानें केलेल्या अनेक जखमांत दिसूं लागला. त्यानें कापलेले केस पुन्हां पुन्हा नव्या जोमानें उगवत राहिल्यामुळें त्याचें कसब जीवनाला मदत करत हेंहि स्पष्ट दिसूं लागलें.

तथापि तळमळणाऱ्या कलावन्ताच्या स्वप्नाची अशी परिणति जरी गाढवाला न्हाव्याच्या जन्मांत लाभली, तरी त्याला पूर्ण संतोष कांहीं लाभला नाहीं. नापितकलेपासून अविभाज्य असा जो बडबडण्याचा मोह तो न्हावीरूपी गाढवाला ग्रासूं लागला. तो गिऱ्हाइकाला जीव तोडतोडून ब्रह्मज्ञान सांगू लागला. आपलें काम व फार तर गिऱ्हाइकाची करमणूक, एवढेंच करण्याचें सोडून तो गिऱ्हाइकाच्या उद्धाराची आस्था दाखवूं लागला, त्याचा मार्गदर्शक होण्याचा प्रयत्न करूं लागला, त्याच्या जीवनाचें तत्त्वज्ञान आंखून देण्याची तयारी थाटूं लागला. थोडक्यांत म्हणजे नुसता हातचलाख न्हावीच नव्हे, तर साताऱ्याच्या दादामहाराजा-सारखा तत्त्वनिरूपणकारही होण्याची महत्त्वाकांक्षा त्याला जाळूं लागली. पण त्यामुळें त्याची गिऱ्हाइकी घटूं लागली; कर्तबगार कलावन्त अशी याची कीर्ति ऐकून या न्हाव्याकडे येणारीं गिऱ्हाइकें फक्त डोकीं करून घेण्यासाठीं येत, पण याच्या शहाणपणाच्या लंब्याचवड्या बातांनीं त्यांचीं डोकीं पिकूं मात्र लागलीं. अखेर त्या न्हाव्यानें विचार केला, कीं नापितकला हा निव्वळ आपल्या पोटाचा धंदा आहे, आपली जीवनांतली खरी भूमिका अशी आधिभौतिक नसून अध्यात्मिक आहे; मानवजातीला संदेश देणें व मोक्षाचा मार्ग दाखविणें हें आपलें अवतार-कार्य आहे—पण हा धंद्याचा डाग त्या कार्याच्या आड येत आहे.

त्यानें ब्रह्मदेवापुढें जाऊन आपली अडचण सांगितली. ब्रम्ह्यानें एक अक्षरही न बोलतां त्याला एका शंखाच्या जन्माला घातलें.

शंखाची पदवी प्राप्त झाल्यावर त्या (मूळच्या) गाढवाला सुरवाती-सुरवातीला मोठा अभिमान वाटत होता; देव्हाऱ्यांतल्या पंचायतनाचें पुढारीपण आपल्याकडेच आहे, असें अडणीच्या उच्चासनावर बसल्या-बसल्या तो स्वतःचें समाधान करून घेऊं लागला. शंखातून देवांना स्नान घालतात तेव्हां आपणच देवांना शुद्ध करतो, अशी त्यानें स्वतःची समजूत करून घेतली. आपल्याला जरूर तें अध्यात्मिक स्वरूप आलें अशी त्याची खात्री झाली. त्याची तक्रार होती फक्त एकच, कीं जगाला दिशा दाखवायला आपल्याला आंतला किंवा बाहेरचा कसलाच स्वतःचा आवाज नाहीं, दुसऱ्या कोणी फुंकावें तेव्हांच आपली गर्जना उमटते. त्यानें विचार केला कीं हें कांहीं उपयोगी नाहीं, आपल्याला मानव जातींत जागृति उत्पन्न करायची आहे, मनुष्यमात्राला कर्तव्याची जाणीव करून द्यायची आहे, आपण स्वयंस्फूर्तीनेंच आवाज काढला पाहिजे—म्हणून सर्व शक्ति एकवटून, प्राण कंठाशीं आणून, दम कोंडून त्या शंखानें आवाज करण्याचा एक जोराचा प्रयत्न केला.

तो आवाज हुबेहुब गाढवाच्या ओरडण्यासारखा निघाला—आणि स्मरण केलें नव्हतें तरीहि ब्रह्मदेव चिडून तेथें प्रगट झाला.

"मूर्खा!" ब्रह्मदेव संतापून ओरडला, "तुला कशांतही समाधान नाहीं. गाढवाच्या जन्मांत कौतुक नाहीं अशी तक्रार केलीस म्हणून तुला वेश्या केलें, तेथें तुझ्या कलेचा हेतु सिद्ध होत नाहीं म्हणालास, म्हणून कोळ्याच्या जन्माला घातलें. तेथें तुझें कसब प्रभावी ठरत नाहीं म्हणून

तुला म्हाल्याचा जन्म दिला, त्यांत तुला अध्यात्मिक भूमिकेची तळमळ लागली म्हणून शंख केला—नी आतां मूळपदावर जाऊन तूं गाढवासारखा ओरडूं लागलास! जा, जसा होतास तसाच पुन्हा गाढव हो. तीच तुझी लायकी!"

गाढव परत आपल्या मूळ जन्मीं गेलें व कुंभाराकडे राबूं लागलें. कौतुक, कला किंवा जीवन या भानगडींत तें पुन्हा कधीं पडलें नाहीं. कोणी नांवें ठेवलीं कां कुणी तारीफ केली तिकडे त्यानें लक्ष दिलें नाहीं. या जन्मींचा रुसवा पुढल्या जन्मीं कोणावर काढायचा हाही कधीं विचार केला नाहीं. आपलें काम निमूटपणें करणारें एक भारवाहक या भूमिकतच त्यानें आपलें उरलेलें जीवित निसर्गक्रमानुसार व्यतीत केलें.

**तात्पर्य**:—जो स्वभावतःच निव्वळ भारवाहक आहे त्याला कितीही पुनर्जन्म मिळाले तरी ते व्यर्थच होत.

१४

# नाटकाचा बाप अथवा 'आडवी गंगा'

कोण्या एके काळीं वाराणशींत ब्रह्मदत्त राजा राज्य करीत असतां सनातनधर्माला इतकी कांहीं तेजी आली, कीं काशीमधल्या देवळांच्या महन्तांनीं गंगेचे घाट सोन्यानें मढवून काढले म्हणतात. त्या दिवसांत साऱ्या भरतखण्डांतून काशीखण्डाकडे भाविकांची अखण्ड रीघ लागली होती. खुद्द ब्रह्मदत्त राजा इतका चांगला होता—कीं तो जवळ जवळ अस्तित्वांतच नव्हता, तो पुण्यश्लोक नृपति बहुतेक वेळ अंतःपुरांतच घालवीत होता. मंत्रिमंडळाला पगार देवळांच्या महन्तांकडून परस्परच मिळत असल्यामुळें त्यांचाहि राजाला त्रास नव्हता. 'खा आणि खाऊं द्या' या उदार तत्त्वानुसार सर्व कांहीं चाललें होतें. यात्रेकरू नागरिकांना धर्मकृत्यांच्या निमित्तानें इतक्या मेजवान्या देत कीं (वाराणशीची कायम लोकसंख्या दुप्पट होऊनहि) कोणाच्या घरी चूल पेटत नव्हती. पोटाला मिळवण्याची निकड नाहीं, कनवटीला मिळालेली भरपूर दक्षिणा आणि दुपारीं झोंपूनहि संध्याकाळचा वेळ रिकामा, अशा परिस्थितींत काशीकरांचें मन करमणुकीकडे वळणें क्रमप्राप्तच होतें.

त्यामुळेंच काशींत नाटकाच्या धंद्याला बेसुमार भरभराट आली होती. करमणुकीच्या कित्येक व्यापाऱ्यांनीं मंदिरांच्या महन्तांइतकी कमाई चालवली होती. नित्य नवीं नि चटकदार नाटकें पौरजनांना दाखवून कांहीं कांहीं नाटकवाले चांगलेच गबर झाले होते. त्यांपैकीं उदाराम नाट या नांवाचा धूर्त नि व्यवहारकुशल इसम विशेष प्रसिद्ध होता— आणि तो उगाच प्रसिद्ध नव्हता, त्यानें तशी व्यवस्थाच केली होती; त्याच्या नाटकांचा निम्मा खर्च स्वतःच्या नांवाच्या नौबदी बजावण्याकडे होत होता. रोज सकाळीं ' जय उदाराम नाट ' या मन्त्राचा घोष करीत गंगेच्या कांठाकांठानें सहस्र पताकाधारी चालत होते; वाराणशीच्या वेशीवेशीवर मुद्दाम बसवलेले लोक आंत येणाऱ्या प्रत्येकाला बजावून सांगत होते कीं ' नाटकवालोंमें एक उदाराम नाट, जिसके सामन कालिदास एक भाट ! ' देवळांच्या भिंतींवरून तर काय, पाहायलाच नको; चुन्याचे नि गेरूचे पट्टे एकच संदेश यात्रेकरूंना नि नागरिकांना देत होते; उदारामाचीं नाटकें. उदारामाच्या वैभवाबद्दल नाना प्रकारच्या अद्‌भुत गोष्टी प्रचलित होत्या; कोणी म्हणत त्याच्या घरीं रत्नदीप आहेत, तर कोणी म्हणत त्याच्या घोड्यांना पंख आहेत. उदारामाच्या कर्तबगारीचीहि मोठी आख्या होती; एकदां ब्रह्मदत्तमहाराज मेरु पर्वतावर मृगयेला गेले असतां उदारामानें ओळीनें शंभर आठवडे एकच नाटक केलें होतें, इतकेंच नव्हे तर अलोट पैसा वांटून काशीच्या लोकांना त्याचे प्रयोग वरचेवर फुकट पाहायला पाठवलें होतें—आणि 'शतसप्ताही नाटककार उदाराम नाट, जिसकी करामत देखके व्यास-वाल्मिकी चाट!' अशी पुकार करणारे सहस्रावधि सेवक काशी शहराच्या गल्लीगल्लींतून फिरवले होते. वाराणशींत विश्वेश्वराचें नांव ऐकूं येत नसेल, इतकें

उदारामाचें ऐकूं येत होतें—कारण त्यानें तशी तरतूदच केली होती. प्रसिद्धीचा विक्रम करण्याची त्याची उडी येथपर्यंत गेली होती म्हणतात कीं, प्रत्यक्ष विश्वेश्वराचें देऊळ भाड्यानें घेऊन त्याच्या शिखरावर त्यानें स्वतःच्या नांवाचा ध्वज फडकावला होता, आणि पिंडीवर चंदनाच्या अक्षरांनीं ' उदाराम नाट ' हीं अक्षरें लिहवून घेतलीं होतीं—अर्थात ब्रह्मदत्त राजा गरीब होता म्हणूनच हें सर्व चालत होतें.

पण इतक्या वैभवाच्या नि विजयाच्या वातावरणातहि स्वतः उदाराम सुखी नव्हता; त्याला एकच गोष्ट सारखी डांचत होती–त्याला काशीच्या कविजनांत कवडीची किंमत नव्हती. उदारामानें स्वतःला कांहींहि म्हणवून घेतलें तरी त्याला ' प्रयोगकार ' यापलीकडे पदवी मिळत नव्हती. हजारों शास्त्री–पंडित उदारामाचे पगारी नोकर होते, पण पदरच्या पाळीव पंडितांकडून जरी उदारामानें ' नाट्यनिर्माता ' हा डौलदार किताब चढवून घेतला होता, तरी विद्वत्सभेंत घुसण्याचे त्याचे सारे यत्न विफल होत होते. विश्वामित्रासारखी ' प्रतिसृष्टिविधाता ' वगैरे एकादी पदवी वाराणशीच्या ज्ञानी रसिकांनीं नि शास्त्री पंडितानीं आपल्याला द्यावी, याकरितां उदाराम वेळप्रसंगीं कुत्र्याची तंगडी चघळायला देखील तयार होता, वाटेल तो खर्च करायला उभा होता, जीव तोडून ठेवायला राजी होता, पण व्यर्थ. पंडित त्याला ' नाटक–बसव्या ' म्हणत ! ' नाटक करणारा तो नाटककार ' या उदारामाच्या सोप्या व्याख्येनें खवळून एका म्हाताऱ्या शास्त्र्यानें तर त्याला भर रस्त्यावर खेकसून सांगितलें होतें कीं, " सरस्वतीच्या दरबाराबाहेर जोडे सांभाळायला देखील तुला जागा नाहीं, स्वयंस्फूर्तीनें तुला काय निर्माण करतां येत आहे, कपाळ ? कोणी तरी लिहिलेलें नाटक

असेल तेंच तूं करणार—यापेक्षां अधिक तुझी लायकी काय ? म्हणे नाटककार !"

पुन्हा असें कीं, शास्त्री–पंडित बेटे निःस्पृह निघायचे, ते स्वतः किंवा त्याची मान्यता विकत मिळण्यासारखी नव्हती. ( त्याबद्दल उदारामानें महन्तांकडे तक्रारहि केली; पण निर्लोभी लोकांपुढें महन्त तरी काय करणार ? ) वाटेल ती वस्तु विकत घेण्यास समर्थ असणारा उदाराम मूठभर पंडितांच्या मान्यतेचें मोल देण्याच्या कामाला मात्र भिकारीच ठरत होता. आपल्याला स्फूर्ति, कल्पनाशक्ति किंवा प्रतिभा नाहीं, या कटु जाणिवेबरोबरच स्वतंत्र निर्मिति करण्याची तीव्र तळमळहि त्याला खात होती. एकदां दरोबस्त साऱ्या पंडितवर्गाचा सूड म्हणून त्यानें मोठमोठ्या विद्वान् पंडितांची, कवींचीं आणि शास्त्र्यांचीं नांवें आपले झाडूवाले, पालखीचे भोई, रक्षक व इतर सेवक यांना देऊन पाहिलीं; पण या युक्तीनें त्या थोर लोकांचा अपमान होण्याऐवजीं त्यांचीं नावें धारण करणाऱ्या हीनजनांचा बहुमान मात्र होऊं लागला. प्रयोगकाराला नाटक लिहिणाऱ्या कवीपेक्षां श्रेष्ठ ठरविणारें नवें नाट्यशास्त्र देखील उदारामानें आपल्या भाडोत्री पंडितांकडून लिहून घेतलें, पण खऱ्या पंडितांची उपेक्षा मात्र चालूच राहिली. आपल्या नांवावर एक तरी स्वतंत्र नाट्यनिर्मिति व्हावी, मग भरतमुनीला देखील आपण भारी होऊं, अशी उदारामाला उत्कट आशा होती–पण प्रतिभेची चाहूलहि त्याच्या डोक्यांत उमटेना.

अखेर त्यानें विचार केला कीं, वाटेवर पडलेली पोर उचलून आणून तिला मुलगी म्हणून पाळणारा तिचा बाप जर वंदनीय ठरतो, तर वाटेवर पडलेली एखादी कल्पना उचलून नाटक म्हणून वाढविणें आणि

तें आपलेंच म्हणून गाजवणेंहि वंदनीयच आहे. हकीकत, कथा, मूळ गोष्ट, किंवा मुद्देमाल हा पुष्कळदां वाटेवरच मिळतो, उरलेली कसरत करायला आपल्या पदरचे शास्त्री–पंडित तयारच आहेत. एकजण भाषणें पाडतो आहे, दुसरा अंक बांधतो आहे, आणखी कोणी गाणीं रचतो आहे–एकदां मूळ मुद्दा मिळाला, कीं थेट खेळापर्यंत नाटकाची उभारणी झालीच, असा हिशेब उदारामानें केला. 'तो मूळ मुद्दा तुझा नव्हे' म्हणून त्याचा उपहास करणाऱ्या त्या कविलोकांना एकदां आपला प्रभाव दाखवावाच, असा उदारामाचा व्यूह होता.

तो मूळ मुद्दा–कीं नाटकांत काय काय घडलें व तें कां घडलें–तो स्वतःच्या डोक्यांतून काढण्याचा उदारामानें निश्चय केला. आजपर्यंत तो मुद्दा उदाराम पदरच्या पंडितांकडून घेत असे; आणि ते बेटे कितीहि दाबले तरी गांवभर त्याबद्दल आक्रोश करीत; त्यामुळेंच तर उदारामाला त्याच्या नाटकांच्या जनकत्वाचें श्रेय मिळत नव्हतें. त्या एका कथानकाची कल्पना उपजली कीं, तिला रंगभूमीवर आणण्यास मग कांहीं उशीर नव्हता–मग त्या खट्याळ शिष्ट लोकांना तो दाखवणार होता कीं, लेको, पहा, अथपासून इतिपर्यंत माझी करामत ! बोला, आहे कीं नाहीं मी कवि, स्वतंत्र निर्माता ? या नाटकाचा बाप ! तितकेंहि करून ते वठणीवर न आल्यास उदारामानें थेट ब्रह्मदत्तमहाराजांकडे फिर्यादच गुदरण्याचें योजिलें होतें. 'हें शास्त्री–पंडित ग्रामकंटक आहेत' अशी हुल्लड उठवायला उदारामाचे हजारों दास गांवांत तयार होते. राजानेंहि मनावर न घेतल्यास, मग मात्र महन्तांच्या मदतीनें खुद्द मंत्रिमंडळावरच वजन पाडण्यापर्यंत उदारामाच्या मनांत तयारी होती–केवळ त्या दीड-शहाण्या विद्वान् आणि हटवादी पढतमूर्खांचा कांटा काढण्यासाठीं !

पण उदारामाला ती कल्पनाच कांहीं केल्या सुचेना. ' याप्रमाणें घडलें ' असें नाटकांत जें दाखवायचें असतें, तें त्याला स्वतःच्या डोक्यांतून उकरून काढायचें होतें, पण तें कांहीं निघत नव्हतें. वाटेवर पडलेल्या म्हणून ज्या कल्पनांबद्दल तो ऐकत असे त्यांतली एकहि त्याच्या वाटेला गेली नाहीं. भूमीखालचें पाणी ज्याप्रमाणें ठराविक लोकानांच ऐकूं येतें, त्याप्रमाणें कल्पना दुसऱ्याच कोणाच्या तरी कानाशीं गुण-गुणतात—आपल्या कांहीं नव्हे, हें त्याला जाणवूं लागलें. दगडाच्या खाणींत कितीहि खणलें तरी रत्नें सापडणें मुष्किल हें त्याला स्वतःशींच चिडून मान्य करावें लागलें—पण त्या शास्त्र्यांना हार जाण्याची कल्पनाहि त्याला सहन होईना. मूठभर लोकांना देखील आपली खरी किंमत माहिती असून उपयोगी नाहीं, असें त्याचें धूर्त आणि व्यवहारचतुर मन त्याला सांगत होतें; म्हणूनच आपल्या मातींत न उगवणारी कल्पना दुसऱ्या कोणाच्या तरी बागेंतून उपटून आणण्याची युक्ति करण्याचें त्यानें अखेर ठरविलें.

काशी नगरीपासून दूर गंगेच्या कांठावर एक ब्रह्मचारी कवि राहत असे. ( त्या दिवसांत त्याच्या कवितेपेक्षां त्याच्या ब्रह्मचर्याचीच अधिक कीर्ति झाली होती. ) असा मनुष्य खरोखरच असतो ही डोळ्यांनीं पाहून खात्री करून घेण्यासाठीं उदाराम नाट एकदां आपल्या परिवारासह त्या ब्रह्मचाऱ्याच्या दर्शनाला गेला होता, आणि आपल्या भपकेदार लवाजम्यात त्यानें त्याची थोडीबहुत सेवाहि केली होती, उदाराम हा नाटकवाला आहे हें ऐकून ब्रह्मचाऱ्यानेंहि स्वतः कवि असल्याचें सांगितलें होतें. त्याच कविब्रह्मचाऱ्याकडे उदाराम पुन्हा एक वेळ एकटाच गेला आणि म्हणाला कीं, पंचतन्त्रांतल्याखेरीज दुसऱ्या कांहीं गोष्टी

असल्या तर मला सांगा. त्यावर ब्रह्मचाऱ्यानें एक सप्ताह उदारामाला आपलीं अनेक खंडकाव्यें ऐकवलीं. इतकी गुरुसेवा झाल्यानंतर एक दिवस उदाराम मुकाट्यानें काशीला परत आला. ब्रह्मचाऱ्याच्या काव्यांत गंगेला आडविणाऱ्या एका वीराची कथा होती, तिलाच आधुनिक स्वरूप देऊन 'आडवी गंगा!' हें विलक्षण परिणामकारक नाटक वाराणशीपुढें ठेवून, मग त्या पागोट्या-शालजोड्यांना तो दाखवणार होता—कोणाचा बाप कोण तें!

म्हणूनच 'उदाराम नाटाची आडवी गंगा' अशी त्या नाटकाची अभूतपूर्व प्रसिद्धि झाली. ही गर्जना करीत लेजिमताफे मार्गामार्गावरून हिंडूं लागले, एक सहस्र दासी जेवणाच्या पंक्तींतून या अक्षराच्या रांगोळ्या काढीत फिरूं लागल्या, नाक्यानाक्यावर टोल वाजवून हा संदेश सर्वांना पोंहोचवीत उदारामाच्या टोळ्या उभ्या राहिल्या. गच्चीगच्चीं-वर उभें केलेले लोक कर्णे फुंकूनही एकच पुकार करूं लागले, दशाश्व-मेघ घाटावर 'शतसप्ताही नाटककार उदाराम नाट, आडवी गंगा नाटक अफाट!' अशा महामंत्राचें अव्याहत अनुष्ठान करीत सहस्रावधि ब्रह्मवृन्द बसला. देवळादेवळांच्या बाहेरील भिकाऱ्यांच्या रांगा खाल्लेल्या भिक्षेला स्मरत नाटक होण्याच्या अगोदर महिन्यापासूनच त्यांना सांगितलेला जयघोष करूं लागल्या. यात्रेकरूला मोक्षाची पावती किंवा पुण्याची जमाचिठ्ठी देण्याआधीं 'उदारामचें नाटक पाहणें हाहि गंगेवरच्या धर्मकर्मापैकींच एक विधि आहे' असें उपाध्यायानें सांगावें, यासाठीं पंड्ये लोकांत मुद्रांची सढळ खैरात उदारामानें करून ठेवली होती. नाटकाचीं वाजंत्रीं तर आधीं आठवड्यापासूनच वाजत ठेवलीं होतीं. रस्त्यांतील रथांच्या दोन्ही बाजूंस उदाराम आणि त्याचें नाटक

याबद्दल मजकूर, घाटांच्या पायऱ्यांवरून शेंदरानें रंगविलेले हेच लेख, गाईच्या पाठीवर रंगलेल्या ओळींचाहि मतलब तोच आणि वातावरणांत सर्वकाळ याच घोषणेचा घणघणाट! उदाराम नाटाच्या त्या 'आडवी गंगा' नाटकाची प्रसिद्धि इतकी यशस्वी झाली कीं काशीचे कांहीं साधेभोळे लोक खरोखरच गंगा आडवायला निघाले! 'बाबांनो, हें नुसतें प्रसिद्धिचेष्टित आहे,' ही त्यांची समजूत घालतांघालतां अधिकाऱ्यांना पुरेवाट झाली. या प्रसिद्धीचा आणखीहि एक परिणाम झाला. उदारामानें स्वतःच्या खास देखरेखीखालीं वाजवलेल्या दुंदुभि इतक्या दुमदुमल्या, कीं त्यांचा आवाज त्या ब्रह्मचारी कवीच्या कानापर्यंत पोहोंचला. आपली सेवा करून गेलेल्या त्या श्रीमन्त शिष्याचें ब्रह्मचाऱ्याला कौतुक वाटलें. आपल्याच गुरुमन्त्रानें उदारामाला बहुतेक स्फूर्ति झाली असली पाहिजे असा कयास त्यानें बांधला. त्या नाटकाच्या पहिल्या प्रयोगाला जावेसें त्याला हळूहळू वाटूं लागलें. कदाचित् पहिल्या प्रयोगाच्या रात्रीं उदाराम गुरु म्हणून आपला प्रकट सन्मान करील अशा प्रकारच्या चोरट्या आशा देखील त्या कवि ब्रह्मचाऱ्याच्या मनांत डोकावूं लागल्या.

तथापि, नाटक दुसऱ्या दिवसावर आलें तरी ब्रह्मचाऱ्याला बोलावणें वगैरे कांहीं आलें नाहीं, तेव्हां तोच आपला दंड घेऊन वाराणशीकडे निघाला.

शतसप्ताही नाटककार उदाराम नाट यांची सर्वस्वीं स्वतंत्र अमर कलाकृति 'आडवी गंगा' हें नाटक रंगभूमीवर भलत्याच थाटमाटांत आलें. पार्वती-परमेश मठाच्या महन्ताच्या अध्यक्षत्वाखालीं आणि वाराणशीमधील बहुतेक श्रेष्ठींच्या उपस्थितींत तो भपकेदार समारंभ झाला.

पांच-पांच सुवर्णमुद्रा देऊनहि जागा मिळणें मुष्किल झालें. रंगमंदिरापासून कित्येक योजनें लांब नाटक पाहण्यास आलेल्या धनिकांच्या रथांच्या रांगा लागल्या. ' रात्र लक्ष निष्कांची होणार ! ' ही कुजबुज उदारामानें पाठवलेले खास ' कुजबुज्ये ' नगरीभर अगोदरच करीत होते. ' आडवी गंगा ' नाटकाच्या पहिल्या प्रयोगासाठीं रामेश्वरद्वारकेसारख्या दूरदूरच्या ठिकाणांहून मुद्दाम येणारे लोक उदारामानें आगाऊच आणून ठेवलेले होते. त्याला मान्यता न देणाऱ्या शास्त्री–पंडितांना तर त्यानें मुद्दाम पहिल्या प्रयोगाला बोलावून रंगभूमीजवळ आणून बसविलें होतें.

त्यांच्या जवळपासच नाटक सुरूं होण्याचे वेळीं एक कठोर मुद्रेचा ब्रह्मचारी येऊन बसला. गर्दीत त्याच्याकडे कोणाचें लक्ष गेलें नाहीं. नाटक सुरू झालें. एक अंक झाला, दोन झाले. तिसऱ्या अंकाच्या आधीं रंगभूमीवर उदाराम विजयी मुद्रेनें झुलत आला. प्रेक्षकांत सर्वत्र बसवून ठेवलेल्या त्याच्या लोकांनीं त्याच्या नांवाचा जयघोष केला. नंतर उदाराम म्हणाला, ' हें तुम्हीं लोक पाहता आहांत, हें सारें या उदारामाचें एकट्याचें ! कल्पनेच्या खेळापासून रंगभूमीवरच्या खेळापर्यंत ही सारी माझी एकट्याची कर्तबगारी ! गोष्टीचा जसा पिता मीं, त्याप्रमाणेंच–'

' हा तस्कराधमा ! '

एकदम कांहीं तरी विघ्न आलें. एक भडकलेला ब्रह्मचारी उदारामावर चाल करून गेल्याचें प्रेक्षकांना दिसलें. ताबडतोब गडबड उडाली. सगळीकडून उदारामाचे लोक रंगभूमीकडे धावले. त्या विघ्न आणणाऱ्या

माणसाला मारून बाहेर घालवण्यांत आलें. नाटक थोड्या वेळानें पुन्हा चालू झालें, पण श्रोतृवृन्दांतली एक प्रकारची अस्वस्थता नि कुजबुज कांहीं कमी होईना....

*    *    *    *

मध्यरात्र केव्हांच उलटून गेली होती. ब्रह्मदत्तमहाराज नित्याप्रमाणें अंत:पुरांत संगीत ऐकत पेंगत बसले होते, तितक्यांत बाहेर कांहीं तरी गडबड झाल्याचें ऐकूं आलें. 'अन्याय! अन्याय!' म्हणून कोणी ओरडलें. काय आहे म्हणून दासी पाहायला जातात तोंच पहारेकऱ्यांशीं झगडत एक संतापलेला, मार खाल्लेला व हैराण झालेला ब्रह्मचारी राजापुढें आला.

त्यानें कळवळून आपली तक्रार सांगितली: त्याच्या काव्यवस्तूचा उदारामानें अपहार केला होता, त्याची गोष्ट चोरली होती त्याच्या कल्पनेवर डल्ला मारून उदाराम नाटकाचा बाप म्हणून मिरवीत होता— 'अन्याय, अन्याय!' तो ब्रह्मचारी कवि ओरडला. राजा म्हणाला 'थांबा, आपण त्या उदारामालाच बोलावणें पाठवूं.' असें म्हणून राजा राजपुरुषांना पाठवणार—तों स्वत: उदारामच महाद्वारापासून साष्टांग नमस्कार घालीत येत असल्याचें दिसलें!

इतकेंच नव्हे तर उदारामानें येऊन राजापुढें लोटांगण घातलें. ब्रह्मचाऱ्याचे पाय धरले, त्याची क्षमा मागितली आणि म्हटलें, 'कविराज, मी आपला अनंत अपराधी आहे, पण मी यथाशक्ति भरपाई करीन, उद्यां एक सहस्र नावा गंगेंत सोडून वाराणशीला सांगेन कीं, 'आडवी गंगा' नाटकाचे जनक कविराज ब्रह्मचारीच!' असें बोलून उदारामानें महावस्त्रानें डोळे पुसले.

मग काय, ब्रह्मचाऱ्याची फिर्यादच राहिली नाहीं. उदारामाला राजानें अनुज्ञा 'दिली—ब्रह्मचाऱ्याला मात्र अन्तःपुरांतील स्त्रियांनीं पूजेसाठीं ठेवून घेतलें व षोडशोपचार झाल्यानंतरच त्याला राजाज्ञा मिळाली. ब्रह्मचारी संतुष्टपणें राजवाड्याबाहेर पडला—

—आणि उदारामानें नाटकाचें श्रेय इतक्या अगत्यानें आपल्याला कां परत दिलें हें लवकरच त्याला कळलें !

कारण 'आडवी गंगा' नाटक पहिल्या रात्रींच पडलें होतें, विटलेल्या प्रेक्षकांनीं धावून रंगभूमीवर धिंगाणा घातला होता, उदारामाच्या चाकरांना चोप दिला होता, मंडप जाळून टाकला होता आणि खुद्द उदारामाचाच पाठलाग केला होता— लोकांच्या सहनशक्तीलाहि कांहीं सीमा आहेच कीं नाहीं ? आश्रयासाठीं म्हणून उदाराम राजवाड्यांत घुसला होता आणि तिथें ब्रह्मचारी आला आहे हें पाहूनच त्यानें तो पश्चात्तापाचा प्रयोग केला होता.

उदारामाला स्वतंत्र प्रतिभा नसली तरी तो धूर्त नि व्यवहारचतुर होता !

'तेव्हां मग करायची आहे काय प्रतिभा ?' अशी अखेर शास्त्री-पंडितांनीं त्याची समजूत घातली, व तोहि आपल्या व्यापारी पेशावर संतुष्ट राहून उरलेलें आयुष्य व्यतीत करीत स्वकर्मानुसार आपल्या गतीला गेला.

---

# कीर्तीचा घरठाव १५

तिच्या जन्माच्या वेळच्या पित्यानें तिला मोठ्या रसिकपणानें 'कीर्ति' म्हणून नांव दिलें होतें; पण आईनें तें सोपें व सुटसुटींत करून 'किरती' केलें होतें. पोर मोठी तेजस्वी दिसायची आणि प्रत्येकाला हवीशी वाटायची.

पुन्हां लोकांत एक बोभाटा होता कीं कीर्ति म्हणून कायमची सुंदर अशी एक बाई आहे—तीच आपण असें सांगत किरती (आपल्या परिवारासह) थारेपालट करीत फिरत असे.

अलीकडे तिचा घरठाव एका बड्या 'उद्योगाधिपती' कडे झाला होता—पण त्या शेटजीनें एकाएकीं लाखो रुपयांचें दिवाळें काढलें. त्यानें ज्यांचे पैसे बुडविले होते, त्यांनीं त्याच्या भोंवतीं दंगल करून (स्वतःच्या नैतिक समाधानासाठीं) त्याला त्याच्याच बंगल्याच्या हौदांत बुडवून काढलें, व त्या गडबडींत किरतीलाहि कोणी फरफटत खेंचीत आणून तिच्या तोंडाला काजळ फांसलें. त्या प्रकारानें उद्विग्न होऊन किरतीची आई तिला घेऊन त्या मुलखापासून बरीच दूर आली होती. कोठेंतरी नव्या ठिकाणीं ऑफीस उघडून 'नवमंजिरी' म्हणून किरतीसाठीं मागणी उत्पन्न करणें हें बिचाऱ्या आईचें धर्मकर्मानुसार कर्तव्यच होतें.

दादर मेन रोडवरून रेलवेकडे वळणाऱ्या एका गल्लीला किरतीनें जागा घेतली होती. आजुबाजूच्या योग्य लोकांना आपली माहिती व्हावी म्हणून, नवीत गांवांत आल्यावर हटकून उपयोगी पडणारें कसब ती दाखवीत होती—ती फिरायला जात होती. ' डॉलिवुड ' किंवा मेन रोड दादर रस्त्याला दुपारीं एक दीड वाजण्याची वेळ म्हणजे भलतीच धामधुमीची. मोठमोठे शेठलोक आणि स्टारलोक त्यावेळीं जेवायच्या धांदलींत असायचे. अन्नाचे विचार एकाग्रतेनें करीत मोटारींमधून जाणारे त्यांचे चेहरे पाहिले म्हणजे रस्त्यानें जाणाऱ्यांवर मोठी छाप पडायची. ते आपापसांत म्हणायचे, ' पहा, मोठ्यांना देखील त्यांची दुःखं आहेत बरं. ' यांतल्याच एकाद्या ( दहाएक हजारांच्या ) मोटारीचा धक्का लावून घेणें हा किरतीचा बेत होता.

दुपारीं फिरायला निघण्यासाठीं किरतीनें तयारीही मोठी खुबीनें केली होती. एकेका बाजूचीं वळीं मोजून घ्यावीं इतक्या रेखीव कुरळ्या केसांना एकदम निष्ठुरपणें मागें खेंचून तिनें एक नारळाएवढा सैल अंबाडा मानेवर टाकला होता. तिच्या कानांत कांहीं नव्हतें, गळ्यांत दोन मोत्याचे सर होते आणि एक साधें रेशमी पांढरें पातळ ती नेसली होती. तिनें रंग लावला आहे असें म्हणण्याची कुणाची छाती झाली नसती; पण इतकेंही करून तिच्या चालण्यांत एक अशी कांहीं लकब होती कीं, तिच्या जवळून जाणारा प्रत्येक मनुष्य तिच्याकडे न्याहाळून आणि वळून पहायचाच—आणि त्यांच्यामधून तिनें न पाहणाऱ्या डोळ्यांनीं पुढें जायचें.

ती योग्य त्या मोटारीची वाट पहात होती.

अखेर तिला हवी तशी मोटर एके दिवशीं आली आणि तिचा जरूर तितका धक्का किरतीला लागला. ती घेरी आल्यासारखें करून रस्त्याच्या कडेला भिंतीजवळ जाऊन टेकली. ' आतां पंख पसरून आकाशांत उडून जाईल कीं काय ' अशी दिसणारी ती मोटर थांबली. कारण तिच्यांतला प्रत्येक माणूस किरतीकडेच पाहात होता. सातआठ जण उतरून तिच्याभोंवती गोळा झाले. ' तुम्बरू पिक्चर्स ' ची ती मोटर होती—तिच्यावरचे दोनचार हप्ते देखील दिलेले होते. उतरलेल्या मंडळींत कंपनीचा हीरो मास्टर बबन, लेखक पण्डित चन्द्रसेन, मालक शेट खटमल, चालक रावसाहेब चोपदार, दलाल बाबूभाई पेंदिया, सावकार शेठ पैचूस, वगैरे ठळक मंडळी होती. मंडळींनीं किरतीबद्दल अत्यंत सहानुभूति दाखवून तिला संभाळून घरीं पोहोचविलें.

यानंतर मंडळींचें तिच्याकडे येणें जाणें सुरू झालें, लौकरच दाट परिचय झाला व ' किरतीला घरठाव करायचा आहे ' ही बातमी माहीतगार लोकांत फैलावली यांत विशेष आश्चर्य तें काय आहे ?

कीर्ति कोणाला नको आहे ? कंपनीची पडदे करून देणाऱ्या वारकऱ्यापासून डबे गहाण ठेवून घेणाऱ्या सावकारापर्यंत सर्वांना कीर्ति हवी होती. बोलपटांत काम करणारे नटनटी, त्या कामाचीं चित्रें करणारे फोटोग्राफर आणि आवाज उतरून घेणारे रेकॉर्डिस्ट, कामें करवून घेणारा दिग्दर्शक आणि तो सांगेल तें रोजावर लिहून देणारा लेखक, बोलपटाचा खर्च चालवणारा मालक, तो लिहिणारा चालक, तो आणवणारा दलाल आणि पुरवणारा सावकार—फार काय तो खर्च वसूल करणारा अडत्या, यासुद्धां सर्वांना कीर्ति हवी होती— आणि हे सगळे किरतीच्या भजनीं लागले होते. सर्वांच्या कैफियती ती

ऐकत होती आणि सर्वांना झुलवीत होती. कधीं ती मास्टर बबनच्या गालदाढींतून लाडिकपणें बोट फिरवायची तर कधीं खेळकरपणें पण्डित चन्द्रसेनाच्या नाकावर टिचकी मारायची, कधीं रावसाहेब चोपदारांपुढें ‘ तुम्हाला चोप देतें ’ म्हणून लटका हट्ट धरायची तर कधीं शेट खठमल यांचें इंग्रजी प्रायमर लपवून ठेवायची. एकदां तर किरतीनें गमतीखातर बाबूभाई पेंदिया आणि शेठ पैचूस यांना दोन तास न्हाणी-घरांतच कोंडून ठेवलें होतें !

किरती अखेर कोणाच्या घराचा ठाव करते याबद्दल सर्वांना अगदीं निकड लागली. एकेक जण येऊन तिचा कल पाहून गेला. कोणी म्हणाला, तुझ्या रूपाची कीर्ति तिलोत्तमेसारखी पसरवीन, तर कोणी म्हणाला कीं तुझा स्वर्गीय आवाज स्वर्गाला ऐकवीन. कोणी म्हणे तुझी अखण्ड वृद्धि होईल अशी सेवा करीन, तर कोणी म्हणे कीं तुला देव्हाऱ्यांत ठेवून तुझी पूजा करीत. तिच्या घराभोंवतालीं—व आंत देखील—या सगळ्या उमेदवारांनीं जवळ जवळ पाहाराच ठेवला होता. नेहमीं कोणी ना कोणीतरी येतजात असायचेच.

आणि एक दिवस अचानक किरतीला घरठाव मिळाला. मालक शेठ खटमल यांना दलाल बाबूभाईनें तो साधा मार्ग सुचवला. दोघेही मोटारींतून किरतीच्या घरीं आले. वाटेंतले किरकोळ नट—नोकर बाजूला सारून ते तडक किरतीच्या आईकडे गेले, आणि तिच्यापुढें त्यांनीं आपली योजना ठेवली. ते म्हणाले, सामान्य व्यवहाराची गोष्ट आहे, किरतीचा घरठावही होईल व आमचेंही काम होईल योग्य मोबदला दिल्याशिवाय आम्हीं कांहींही मागत नाहीं. आम्ही म्हणतों तसें केल्यास समाजालाही मार्गदर्शन केल्यासारखें होईल——

' हे मालकसाहेब, धनाजी खटमल, आपल्या कीर्तीशीं लग्न लावतील! तिचा उद्धार करतील–तिला कुलीन करतील!' बाबूभाई पेंदिया परिणामकारक आवाजांत म्हणाला.

' वाहवा, म्हणजे–' आई बोलूं लागली

' ती नका काळजी करूं–लग्नानें तिला कोणतीही ताबेदारी वाटायला नको' बाबूभाईनें खुलासा केला

' पण '–तिची आई म्हणूं लागली

' पुन्हां आम्ही फुकट मागत नाहीं' धनाजी खटमल बोलले, ' रुपया इंचाच्या भावानें आम्ही आख्खी कीर्ति विकत घेत आहोंत.'

किरतीची आई कबूल झाली. वर्षाच्या कॉंट्रॅक्टवर तीस टक्के सूट पाहिजे असें बाबूभाई दलाल म्हातारीला बजावीत असतां मालक खटमल किरतीकडे गेला व तिच्याशीं गुजगोष्टी करीत बसलेल्या लेखकाला गचांडी देऊन बाजूला करून, किरतीला दण्डाला धरून मोटारीकडे घेऊन गेला.

कीर्तिला धनी मिळाला.

---

# ढगे मास्तराची जबानी १६

खूप उच्च हेतूनें प्रेरित होऊन कसल्या तरी उचापतीत उत्साहानें भाग घ्यायचा—आणि नंतर कांहीं दिवस पस्तावा करीत बसायचें, याबद्दल वाकळगांवच्या ढगे मास्तराची ख्याती होती. चांगले करण्याच्या हेतूनें या मास्तरानें जितके घोटाळे माजवले 'तितके गांवांत कुणी मास्तरणीनें देखील माजवले नसतील' असें ऑनररी गांवपाटिल दत्तोबा सबजे यांनीं एकदां म्हटलें होतें. दत्तोबा सबजे, त्याचप्रमाणें पांडू परब, शिताराम करवते, नानालाल सुगंधी, बाबूसाहेब मोमिन किंवा धोंडभट एकपात्रे, साऱ्या मंडळींचा अभिप्राय एकच होता कीं, ढग्याला व्यवहार समजत नाहीं, बेट्याला स्वतःचें हित कळत नाहीं, तसल्या उठाठेवी करतो, आपलें नुकसान करून घेतो नी लोकांचेंही. हे सगळे गांवांतील प्रतिष्ठित नागरीक गांवच्या लोकमताचा ताबा घेण्याच्या प्रयत्नांत होते; आम्हीं म्हणतों तेंच लोकमत, तसें नसेल तर आम्हीं म्हणतों तें खरें मत, व लोकांचें मत तसें नसेल तर तें तसें झालें पाहिजे—अशा सर्वसाधारण धोरणाचा आग्रहानें प्रचार करण्यासाठीं, या कम्पूतल्या एकेकट्या सदस्यानें एकेक धंदा तर स्वतंत्रपणें चालवला होताच, पण सर्वांनीं मिळून कांहीं सांघिक उद्योगही आरम्भले होते.

नानालाल सुगंध्याचा स्टोअर होता, बाबूसाहेब मोमिन थिएटरचे मालक होते, धोंडभटांना त्रिवण्टेश्वराच्या पुजारीपणाचें वतन होतें, पांडू परबाचा छापखाना होता आणि दत्तोबा सबज्याला कर्ज होतें (त्यामुळें तो नेहमी झ्याकीत असायचा). 'वाकळगांव नटेश्वर मंडळी' म्हणून या हौशी लोकांची एक लहानशी नाटक-संस्थाही होती, आणि मधूनमधून कुठल्यातरी लायक धर्मादायाच्या नांवाखालीं नाटकांचे प्रयोग करून मिळालेला गल्ला हे व्यवहारचतुर सद्गृहस्थ वांटूनही घेत होते. सिताराम करवते या (इष्टेट एजण्टाचा धंदा करणाऱ्या) मेंबराच्या ओळखीचा कधींकधीं असा उपयोग होत असे कीं अलीकडे नाटकांत बायकांची कामें करायला निम्या तरी भूमिकांना (कशाका होईनात पण) बायका मिळूं लागल्या होत्या. त्यामुळें गांवातल्या लोकांनीं नटेश्वर मंडळीला गमतीनें 'अर्धनारी नटेश्वर मंडळी असेंहि नांव दिलें होते.

प्रथम ढगे मास्तराच्या हालचाली वेगळ्या होत्या; बालवीर पथकें, वक्तृत्वोत्तेजक (वाकळगांवांत हा शब्द बरोबर म्हणून दाखवण्यासाठीं त्यानें एक 'जाहीर चढाओढ' देखील केली होती) सभा, विकासमंडळें, 'बहिर्जी दिन', 'आरोग्य-तास चळवळ' वगैरे नाना प्रकारांनी गांवची सांस्कृतिक उन्नति करण्यासाठीं ढगे मास्तराची धांवपळ चालायची-व्हायचें कांहीं तिसरेंच. हा भोळसट प्राणी आहे, शुद्धलेखन चांगलें लिहितो, फुकटया नाहीं, पोरांत वजन मारून आहे, मुख्य म्हणजे याच्या शाळेंत एकदोन फटाकड्या पोरी आहेत—ज्या पुढेंमागें कोवळेंपणींच स्त्री-भूमिकांना उपयोगी पडतील —असा एकंदर अनुकूल ग्रह ढगे मास्तराबद्दल वरील गांवशेटींनीं सुरवातीस करून घेतला होता. पांडू परबानें ढगे मास्तराच्या स्फूर्तिदायक कवितांना 'वाकळगांव वार्ता' या साप्ताहिकांत कित्येकदां स्थान दिलें

होतें, मोमीनभाईनीं आपल्या थिएटरांत शाळेच्या विद्यार्थ्यांना सवलतीच्या दारांत एकदोनदां सिनेमा दाखवला, तेव्हां ढगे मास्तरला मोहबतीखातर खालच्या वर्गाचें तिकीट असूनहि वरच्या वर्गात बसवलें होते, नानालाल सुगंध्यानें त्याला एक ब्लॉटिंगपेपर कॅलेंडर भेट म्हणून दिलें होतें. नटेश्वर मंडळीच्या पद्यावल्या लिहिण्याचें काम ढगे मास्तरकडे येऊन त्याला नाटकें फुकट पाहायला मिळूं लागलीं होतीं, इतकेंच नव्हे तर त्याच्याकडून एक नाटक लिहून घेऊन मंडळी ते करणार आणि तें देखील ' ढगे मास्तरांचें नाटक ' असें जाहीर करून, असें गांवांत कळलें होते ! थोडक्यांत म्हणजे नटेश्वर मंडळी ढगे मास्तराला लेखक म्हणून पुढें आणणार, हें स्पष्ट दिसूं लागलें होतें. त्यांच्या शाळेंतलीं उनाड पोरें देखील ' ए लेका, ढग्याचं नाटक येणार म्हणे ' असें आपापसांत म्हणून त्याच्याशीं अदबीनें वागूं लागलीं होतीं. स्वतः ढगे मास्तराचा उत्साह तर काय अनावरच होता; गांवांतल्या एका प्रबळ कलाकम्पूचा तो छटाकभर तरी घटक होता; आतां या नाट्यशास्त्राला काय करून टाकूं नी काय नाहीं, या हिरिरीनें तो मनांतल्या मनांत अस्तन्या वळीत होता. दत्तोबा–नानालाल–शिताराम बाबूसाहेब–आणि–इतर या मंडळीवर, आणि त्यांच्या आपल्या चालू झालेल्या सहकार्यावर ' ढग्या ' खूष होता.

त्या खुषींतच शिमग्याच्या दिवशींच्या त्या प्रकारांत तो सामील झाला. भिकभट नांवाच्या माणसाला जाहीर रीतीनें शिखानष्ट करण्याच्या कटांत ढगे मास्तरने जी कामगिरी केली, ती जवळ जवळ सारी एकहाती त्याची होती; त्यानें स्वतः आपल्या हातानें भिकंभटाची शेंडी त्या दिवशीं तासून टाकली होती, त्याला हें कबूल करण्याखेरीज गत्यंतरच

नव्हतें. नटेश्वर मंडळीच्या शिमगा उत्सवांत जोराचा भाग घेण्यासाठीं मास्तरानें ज्या कांहीं क्लृप्त्या काढल्या होत्या, त्यांत भिकंभटाची तासून टाकणें हा मुख्य कार्यक्रम त्यानें योजला होता आणि पुढाकार घेऊन तो पारही पाडला होता—त्याला कांहीं अशी सबब सांगतां येत नव्हती कीं,—' भिकंभटजींची बोडन्ती सगळयांनीं मिळून केली, ' किंवा ' गडबडीत झालं झालं, मी त्यावेळीं तिथें नव्हतों देखील '—अशी त्याची कांहींदेखील लटपट चालली नसती.

म्हणजे तें असें झालें कीं, भिकंभट हा दुसरा एक उपद्व्यापी प्राणी वाकळगांवांत फार मातल्यासारखा करूं लागला होता; नटेश्वर मंडळीला प्रतिस्पर्धी संस्था म्हणून त्याच गांवांतल्या दुसऱ्या एका टोळीनें ' अर्ध—नर—नटेश्वर कंपनी, ' म्हणून दुसरी नाटक मंडळी काढली होती. जुन्या नटेश्वर मंडळींत निम्मे स्त्रीपार्ट घेणाऱ्या बायका असल्या, तर या ' नव्या नटेश्वर ' मध्यें निम्म्या बायका पुरुषपार्ट घेणाऱ्या होत्या—( आणल्या होत्या खऱ्या बेटयांनी कुठूनतरी पकडून ) आणि नागाभाई गांधी या आडत—दुकानवाल्याच्या पुरस्काराखालीं भिकंभटजी चावटपणा काय करायचा कीं, ' जुन्या नटेश्वर 'चें अमुक एक नाटक लागणार आहे हें कळल्यावर ' नव्या नटेश्वर 'कडून तेंच नाटक त्याच दिवशीं अर्ध्या दरांत दुसऱ्या थिएटरांत करायचा—कधीं कधीं तर आदल्याच दिवशीं ! त्याच्या या त्रासाला कंटाळून ' जुन्या नटेश्वर ' नें एकदां पांडू परबाचें ' श्री सरस्वती ' म्हणून नवें नाटक बसवलें, ' हें तरी निदान त्या भिक्याला चोरतां यायचें नाहीं ' या भरंवशावर मंडळी होती तर त्यावेळीं ' शिरीं सरस व ती ' हें नांव देऊन ' नव्या नटेश्वरा 'नें एक जुनेंच कुठलेंसें नाटक बसवून लोकमताची वर्गणी आगाऊच गोळा

करून टाकली! वास्तविक जो गांव म्हणजे नानाभाई सुगन्धी, सिताराम वगैरे मंडळीची हक्काची मिरास, तो गांव नागाभाई गांधींच्या त्या भिकंभट हस्तकानें अशी चढाओढ सुरू करून बिघडवून टाकला. जुन्या मंडळीनें 'जुनी व पहिली अर्ध–नारि–नटेश्वर मंडळी' असें भींतीवरच्या कागदावर लिहिलें तर भिकंभट लगेच 'नवी व सुधारून वाढवलेली अर्ध–नर–नटेश्वर कंपनी' अशा जाहिराती डकवायचे. एकदां पहिल्या कंपनीच्या हँडबिलांत 'नाटकांतले अर्धे स्त्रीपार्ट बायकांनी केले आहेत' ही महत्वाची सूचना आली, त्यांसरशी लगेच दुसऱ्या कंपनीच्या हँडबिलांत 'निम्मे पुरुष बायका आहेत!' ही खळबळ उडविणारी बातमी छापण्यांत आली. या दोन हौशी नाटक कंपन्यांच्या चढाओढीला पुढें पुढें एखाद्या वाङमयीन वादाचें स्वरूप आलें. वाकळगांव वार्ता पत्रांत खुद्द पांडू परबांनीं "नवी नाटक कंपनी गेली उडत!" हा अग्रलेख लिहिला, ताबडतोब नागाभाई गांधीनें एक आठवड्यापुरते नवे साप्ताहिक ('वाकळगांव–वृत्तांत') काढून भिकंभटाकरवीं "जुनी मण्डळी मारली आडवी!" असा प्रतिहल्ला चढविला, इतकेंच नव्हें तर झाडून सारे नानाभाई–धोंडभट–बाबूसाहेब–दत्तोबा–पांडू वगैरे जुन्या मंडळीचें जे मुत्सद्दी, त्यांचाहि उद्धार केला.

यावेळींच जुन्या मंडळींकडून ढगे मास्तराच्या बुद्धिमत्तेला आव्हान देण्याचें धोरण स्वीकारण्यांत आलें. दत्तोबांनीं सूचकतेनें सांगितलें, 'पहा मास्तर, आतां चानस् आहे तुमची करामत दाखवायचा–अशी त्या भिकंभटाची झाली पाहिजे कीं पुन्हां कांहीं टुरटुर नाहीं रहातां कामां–कांहींतरी कल्पना काढा–अशी उडवाल बेटयाची–गांवभर फजिती झाल्याशिवाय तो भिक्या नाहीं ठिकाणावर यायचा. मंडळींचा खास

निरोप आहे तुम्हाला–पाहूंच या ढगे मास्तर काय काढतात नवीन तें–यानंतर बहुतेक तुमचंच नाटक घ्यायचं आहे इष्टेज करायला'–इतका पेटवून दिल्यानंतर मग ढगे मास्तर काय आवरतो आहे, त्यानें डोकें खाजवून खाजवून शिमग्याच्या उत्सवांत भिकंभटाला उल्लू बनवण्याचा बेत केला आणि जुन्या नटेश्वर कम्पूनें उत्साहानें त्याला पाठिंबा दिला.

धुळवडीच्या दिवशीं पक्षोपपक्ष विसरून फक्त 'सभ्यपणा' या सर्वांच्या सामाइक शत्रूविरुद्ध मोहीम गाजवायची असा त्या गांवचा प्रघात होता. ढगे मास्तरासारखा मनुष्यदेखील अशा भानगडींत पडायला निघाला यावरून नाटकाच्या मोहिनीनें त्याला किती बेछूट बनवलें होते याची कल्पना येते. तरीही नुसतीच शिवीगाळ किंवा अचकट विचकट वाङमयापेक्षां नवें कांहींतरी काढावें या कल्पनेनें, त्यानें 'शिमगाभारत' ही खुल्या नाटयदृश्यांची कल्पना काढली होती—म्हणजे रस्त्यावर ज्या नुसत्याच मिरवणुकी आणि घोषणांचे ताफे हिंडायचे, त्याऐवजीं शिमग्याच्या वातावरणांत व पोषाखांत भारतकालीन प्रसंगांचीं विडंबनें जनतेपुढें ठेवायचीं, अशी ढगे मास्तरची मनीषा होती—जसें द्रौपदी स्वयंवर ( ज्यांत द्रौपदीचें काम करणाऱ्या बाप्यानें पांच पतींपासूनचे फायदे संगीतांत वर्णन करायचे ) द्यूतसभा ( जेथें द्रौपदीचा संगीत लिलांव करवायचा ) कृष्णशिष्टाई, आणि अखेर महायुद्ध ( ज्यांत धूळ, बुक्का, गुलाल, बटाट्याचे काप, खेटरें, झाडू व शिव्या हीं शस्त्रास्त्रें सर्रास वापरण्याची मुभा ठेवायची ). शिमग्याच्या पर्वणीपुरता हा सबंध गांवचा संयुक्त कार्यक्रम होणार असल्यामुळें चोवीस तास जुने व नवे नटेश्वर यांनीं आपलें वैर विसरायचें असें ठरलें. ढगे मास्तरानें भिकंभटाला धृतराष्ट्राची भूमिका घ्या असें विनवलें, आणि तो कबूल झाल्यानंतर

धूळवडीच्या मिरवणुकींत त्याला डोळे बांधून सुरुवातीसच 'कौरवसेनेच्या' अग्रभागीं एका गाडीवर बसून गांवांतून फिरवला—पण भिकंभटाचे डोळे बांधून 'मेक–अप' च्या नांवाखालीं दग्यानें त्याची शेंडी उडवून दिली होती, त्याला एक लाल लुंगी नेसवली होती आणि 'राजदंड' असें त्याच्या कानांत सांगून एक थोरला सुरा त्याच्या हातीं दिला होता–आणि लोकांनीं मिरवणुकींत भिकंभटाला पाहिलें तें या स्वरूपांत पाहिलें. नव्या नटेश्वरच्या इतर लोकांना असें सांगण्यांत आलें होतें कीं भिकंभटाच्या संमतीनेंच हा पोषाख त्यांना देण्यांत आला आहे–त्याही लोकांना वाटलें कीं असेल बुवा, कुणी सांगावें, धृतरांष्ट्राचें सोंग कदाचित् असेंहि काढीत असतील. पण मिरवणुकीच्या वेळींच जुन्या नटेश्वरांनीं गांवभर कुजबुजही सुरू केली कीं भिकंभट बाटले, मुसलमान झाले, त्यांनीं शेंडी उडवून दिली आणि खाटकाचा धंदा सुरू केला आहे! या सर्व तपशिलावर ताबडतोब जरी कोणी विश्वास ठेवला नाहीं तरी भिकंभटाची शेंडी उडाली हें निर्विवाद होतें; गोपभ्राएवढा तो त्यांचा संजाब ढगे मास्तरांच्या हातें खरडून टाकून, पुन्हा जुन्या नटेश्वर कंपूनें वाकळगांवच्या कांहीं भटांना पेटवून दिलें कीं 'ग्रामण्य करा आतां गुलामावर—बेटा आमच्याशीं चढाओढ करतो!'

भिकंभट जरी व्यवहाराला अट्टल होता तरी त्याची जात आणि मुख्य धंदा भटजीचा पडल्यामुळें आपलें ब्राह्मण्य गेल्याचा बोभाटा झालेला पाहून तो अगदीं पंक्चरच झाला. आपण मुसलमानाच्या सोंगानें मुसलमान झालों एवढी नुसती कुजबूज त्याला 'बसवून' टाकायला पुरी होती; तो त्या धक्कयानें पहिल्यांदा थंडच पडला–दोनतीन घरांची कार्यें देखील त्यामुळें त्याची टळलीं–अर्धनरनटेश्वर कंपनी तर काय बादच झाली

एकदम—भिकंभटजी ही मुख्य शक्ती बंद पडल्यामुळें. त्यांच्या नाटकांचें (प्रसंगी पंधरा रुपयांच्या वर चढणारें) उत्पन्न पांचाच्या आंत येऊं लागलें—उलट 'जुनी नटेश्वर' जोर करून होती, त्यांनीं एक दोनदां विसापर्यंत कमाई केली होती! नागाभाई गांधी भिकंभटाला 'कंपनी चालूं दे' म्हणत होता पण भटानें हाय खाल्ली होती—आपली गेलेली जात परत मिळाल्याशिवाय जिवांत जीव येणार नाहीं असें त्यानें नागाभाईला साफ सांगितले. छाटली गेलेली शेंडी त्यानें हळूंहळूं पैदास करून पुनः वाढविली, पण 'लोक मला मुसलमान म्हणतात' या धास्तीची कात्री त्या नव्या शेंडीवर कायमची टांगलेली राहणार असें भिकंभटाच्या मनानें घेतलें. एखाद्या अधिकारी निवाडे-मंडळापुढें या बाबतींत निर्णय घेतला पाहिजे, व आपलें ब्राह्मण्य पारखून अगदीं टांकसाळीचें सर्टिफिकीट मिळविलें पाहिजे असें त्यानें ठरविलें. शंकराचार्यांचा मुक्काम लौकरच गांवांत येणार होता, त्यांच्यापुढें पुरावा म्हणून काटली गेलेली शेंडी महत्प्रयासानें शोधून काढून त्यानें मिळवून ठेवली होती—पण तोपर्यंत एकंदर त्याचा नूर मात्र अगदीं पारोसा दिसत होता.

* * *

इकडे जुन्या नटेश्वरच्या ऐन चलतीत ढगे मास्तरनें तो बावळटपणा केला—वास्तविक शिमग्याच्या उत्सवाला महाभारतीय स्वरूप देण्याच्या त्याच्या कल्पनेवर नानाभाईपासून शितारामपर्यंत सारे खूष होते; पद्यावल्या लिहिण्याचा त्याचा तनखा रुपयापासून सव्वा रुपयापर्यंत वाढवला होता देखील, पण या मास्तराला धोरण नाहीं, 'आपले उपकारकर्ते कोण याचें भान नाहीं बेट्याला–गेला स्वतःच्या बी. ए. च्या ऐटींत' असे दत्तोबा सबज्यांनीं म्हटलें तें उगाच नाहीं. 'चांगलं त्याच्या

शाळेचं नाटक करायला मदत केली, त्याची शाळा आणि नटेश्वर कंपनी यांचें संघष्टन करण्याचा प्रयत्न केला, पण या मास्तराला वेळ काळ कांहीं समजत नाहीं, ( नी भाषणस्वातंत्र्याच्या गोष्टी सांगतो ).' ' नटेश्वर मंडळींनीं इतकी मेहरबानी ठेवल्यावर ढगे मास्तरनें (कीं ज्याच्या शाळेच्या ग्यादरिंगसाठीं मंडळींनीं पडदे व पोषाख दिले होते ) मंडळीशीं इमान ठेवायला पाहिजे होतें.' ( पद्यावली शुद्ध भाषेंत लिहून देण्याबद्दल नटेश्वर मंडळींकडून मास्तरला कांहीं नाहीं तरी दर नाटकाला सव्वा रुपया तनखा होता ) ' त्यानें आपल्या अन्नाला जगायला पाहिजे होतें ' इत्यादि पोक्त मतें नंतर त्याला जी ऐकावी लागली तीं एका क्षुल्लक कारणामुळें; कुठल्याशा सभेंत नानालाल सुगंधी स्त्रीशिक्षणाबद्दल कांहींतरी आचरटा-सारखे बरळले आणि नंतर ढगे मास्तरनें भाषण करून त्याच सभेंत त्यांना झाडलें.

झालें, ' वाकळगांव नटेश्वर मंडळी ' या टोळीच्या मर्जींतून तो उतरला—पुन्हा ' उत्साह मंडळें ' ' सूर्योदय—सहली ' ' काव्य—युद्ध ' ' आदर्श युवक संघ ' वगैरे त्याचे व्यापार सुरू झाले; पण स्टोअरचे मालक, थेटरवाले, छापखानदार, इष्टेट एजंट, पुजारी नी कर्जबाजारी या सगळ्यांच्याच मनांतून तो उतरला. ' ढगे मास्तर ना ? एक व्यवहारशून्य मनुष्य—चांगला पुढें आणला असता त्याला, पण निरुपयोगी, कांहीं समजत नाहीं ! ' ' अहो बरोबरच आहे ज्याची खात्री पोळी त्याची वाजवावी टाळी ही साधी गोष्ट ज्याला कळत नाहीं—' ' अहो याचं कुठही जमत नाहीं तें यामुळेंच ' असें आपल्याबद्दल साधारण लोकमत आहे असें खुद्द ढग्यालाही त्याच्या शाळेंतल्या पोरांनीं ( मिटक्या मारीत ) सांगितलें. कोणी तो कांहीं लफड्यामुळें निवाला असा कयास बांधून

त्या लफड्याचा तलास लावायला निघाले. ढगे मात्र नोकरी नी किरकोळ शाळेच्या चळवळींशिवाय आपल्या नेहमींच्या करमणुकींत मग्न होता—ढगांकडे पाहण्याच्या, म्हणूनच त्याला शाळेचीं पोरें ढग्या म्हणत होती.

असाच एके दिवशीं ढगे मास्तर आकाशांत नसलेल्या ढगांकडे पाहात बसला होता—तों त्याच्याकडे भिकंभट आले. त्या भटजीमधली 'भटा' ची तकाकी जाऊन नुसत्या अजिजीची 'जी' तेवढी शिल्लक राहिली होती. आठदहा दिवसांची दाढी वाढलेली आणि हैराण मुद्रा घेऊन तो एक कळकट उपरणें पांघरून आला होता. ढगे चकीत होऊन त्याच्याकडे पाहूं लागला.

" माझी काय स्थिती झाली आहे मास्तर तुम्हाला कल्पना नाहीं " भिकंभट खेदानें म्हणाला, " मला सगळे मुसलमान म्हणतात ! उपाध्ये-पणाला तर कोणी बोलावीत नाहींच, पण नातेवाईक पंक्तीला घ्यायला तयार नाहींत–मी चाललों कीं सारे कुजबुजून हांसतात. मला रस्त्यांत तोंड दाखविण्याची चोरी झाली आहे–तुम्हीं करायला गेलांत थट्टा नी बट्टा लागला आम्हांला—"

ढगे मास्तर विलक्षण शरामदा होऊन गेला. नव्या नटेश्वर कंपनीच्या वरातीपुढें दिमाखानें खेंकाळणारा घोडा आज एक विठ्ठल–तट्टू होऊन आपल्याकडे आला, याला कारण आपला आंधळा उत्साह, असा पश्चात्तापाचा विचार मास्तरला ग्रासूं लागला. एका 'चालू' माणसाला आपण 'बंद' पाडलें, एका मनुष्यप्राण्याला अशा केंविलवाण्या अवस्थेला नेण्यास कारण झालों, या चुकीची जाणीव होऊन त्याला धक्का बसल्या-सारखे झालें, " माफ करा अं भिकंभटजी " तो सौम्यपणें म्हणाला,

" माझी खरीच चूक झाली. कल्पनेच्या पलीकडे अन्याय झाला माझ्या हातून तुमचा–मी तुमची सपशेल माफी मागतो. "

पण यावर भिकंभटजींनें सद्‍गदित होऊन क्षमा केल्यासारखी विशेष कांहीं हालचाल केली नाहीं.

" अहो तुमचं ठीक आहे, तुम्ही नोकरीच करीत होता मालकांची. त्यांनीं सांगितलं नी तुम्ही केलं—"

" असं झालं कां ? " ढगे अर्धवट स्वतःशींच म्हणाला.

" तुम्हाला कांहीं दोष देत नाहीं मी, पण तुमच्या त्या कंपूनें मी मुसलमान झालों असा जो छुपा बोभाटा केला, त्याच्यामुळें माझा धंदा बसायची वेळ आली—"

" छे हो, मुसलमानाचं सोंग घेऊन कुणी कधीं मुसलमान होतं कीं काय ? लक्ष देऊं नका तिकडे. "

" आतां काय सांगूं तुम्हाला-त्या चांडाळ धोंडभटानं म्हणे शास्त्राधार देखील काढला आहे शोधून कीं ' शिखानष्टः स्मृतिर्भ्रष्टः ' शेंडी गेली कीं म्हणें त्याला स्मृतीनीदेखील भ्रष्ट ठरविला आहे–"

" भलतंच ! तसं कांहीं नाहीं. मी सांगतों, तुम्ही अगदीं शंभर नंबरी ब्राह्मण आहांत. "

" पण गांवाला नाहींना पटत ! " भिकंभट उसळून म्हणाला, " माझीं चार सहा यजमानांचीं घरं मला पारखी होत आहेत ! "

" मग काय करायचं म्हणतां आहांत तुम्हीं ? "

" त्यासाठींच तर तुमच्याकडे आलों आहे मी—मी ठोकली आहे थेट श्रींकडे फिर्याद कीं मला या गांवांतल्या एका कुटाळकम्पूनं मुसलमानाचं

सोंग देऊन माझी नुकसानी केली, सबब ( १ ) मी ब्राह्मण आहे हा निर्णय मिळावा, व ( २ ) माझें नुकसान करणाऱ्या शत्रूंकडून मला भरपाई मिळावी—अहो त्यासाठीं तर मुख्य प्रयत्न—आणि (३) गुन्हा करणाऱ्यांनीं मला श्रींच्या समोर माफी लिहून द्यावी, हें न झाल्यास धर्मच्छल करणाऱ्या सर्वांवरच ग्रामण्य आणावें–मला वाळीत टाकताहेत बेटे !"

"ठीक आहे बेत—"

"पण मुख्य काम तुमचं आहे, तुम्हीच माझी शिखा नष्ट केली आणि ती तुमच्या अन्नदात्यांच्या सांगण्यावरून, हें तुम्हीं श्रींच्या पुढें येऊन सांगितलें पाहिजे—"

"मग होईल भरपाई माझ्या अपराधाची ?"

"तर ? अहो एवढं प्रकरण फत्ते होऊं द्या, तुम्हीं सांगाल त्या संस्थेला दहा रु—म्हणतो रुपया दीड रुपया देणगी देईन." बोलतां बोलतां भिकंभटाचा चेहरा भावी लाभाच्या कल्पनेनें चांगलाच खुलला होता–क्षणभर ढगे मास्तराला वाटलें अन्यायाची भरपाई करायला मदतच करायची, पण त्या मदतीला हा प्राणी खरोखरच लायक आहे का ? याचा जीव कुस्करला गेला म्हणून तो याला दुरुस्त करून पाहिजे आहे, कां नुकसानभरपाईच्या द्रव्यलोभानें याच्या डोळ्यांतल्या बाहुल्या लुकलुकत आहेत ? तरीपण न्यायाला सारे सारखेच, आपल्या कृत्यामुळें हा गृहस्थ कांहीं दिवस माणसांत नसल्यासारखा झाला, तो कसाही असला तरी न्याय झालाच पाहिजे....असा विचार करून ढगे मास्तर श्रींच्या दरबारांत जाऊन बोलायला तयार झाला. भिकंभट खूष होऊन निघून गेला.

शंकराचार्यांच्या पुढें ' भिकंभट वि. नानाभाई, शिताराम, व इतर ' ही फिर्याद येणार हें वाकळगांवांत फैलावण्यास वेळ लागला नाहीं. ढगे मास्तराची जबानी श्रींपुढें आहे हें कळल्यावर तो कोणाच्या बाजूनें बोलणार याचा पत्ता लावायला कित्येक लोक त्याच्याकडे येऊन गल. कोणता पक्ष साक्षीबद्दल काय देणार आहे याच्या चौकशा सुरू झाल्या—ढगे मास्तर लांच घेऊनच साक्ष देणार असें गृहीत धरून, त्याला कोणी ' किती ' देऊं केले आहेत याचें कुतूहल कांहीं थोड्यांनीं दाखवलें नाहीं. जुन्या नटेश्वर कंपनीनें ' या भिकंभटाच्या फिर्यादीत कांहीं अर्थ नाहीं, उलट आम्हीं शारदा नाटक त्यावेळीं बसवत आहोंत त्यांत श्रींची भूमिका खुद्द श्रीच एकादे वेळीं करतील—ते काय या भिक्याचं ऐकतात—अन् तो ढग्या काय सांगणार ? हिम्मत आहे त्याची ? आणि सांगून काय उपटणार आहे—ल्हाळे ? ' हा खुलासा हस्तेंपरहस्तें जाहीर केला होता. श्रींच्या समोर विचारलेंच गेलें तर बचावाचे पुढील मुद्दे जुन्या नटेश्वरांनीं ( एका अनुभविक मुखत्यार वकिलाच्या सल्ल्यानें ) तयार ठेवले होतें. ( १ ) भिकंभटाला अ—ब्राह्मण आम्हीं म्हणत नाहीं, लोक म्हणतात, त्याला आमचा नाइलाज आहे ( २ ) त्या शिमग्याच्या दिवशींच्या प्रकारात आमचा कांहीं संबंध नव्हता (३) भिकंभटला धृतराष्ट्र करतो म्हणून खाटिक बनवल्याचें आम्हांला माहीत नाहीं—तें सोंग भिकंभटाचें होतें हें ऐकून आम्हाला आश्चर्य वाटलें (४) भिकंभटाचें नुकसान झालें असें आम्हाला वाटत नाहीं, झालें असल्यास तें आम्ही केलें नाहीं, तेव्हां आम्हीं नुकसानभरपाईस तयार नाहीं व क्षमायाचनेस तर मुळींच नाहीं. (५) नागरीक म्हणून फारतर झालेल्या प्रकाराविरुद्ध हळहळ व्यक्त करूं—तींसुद्धां श्रींनी सांगितल्यास.

'आपण काय सांगायचें' तें श्रींच्या मठांत जाऊन सांगण्याची वेळ येईपर्यंत ढगे मास्तर मनाशीं जुळवीत होता. माझी चूक झाली, ती उत्साहाच्या अतिरेकानें झाली, कारण माझ्या पुरस्कर्त्यांनीं मला तसें करण्यास प्रवृत्त केलें. भिकंभटजीचा गुन्हा माझ्या हातून झाला, मी त्यांची दहा वेळां माफी मागण्यास तयार आहे. अपराध माझा झाला, पण मी हत्यार होतो, मी शिक्षा झाल्यास सोसायला तयार आहे, पण ज्यांनीं मला हत्यार केलें त्यांनाहि त्यांचा शिक्षेचा वांटा उचलूं द्या, असें कांहींतरी परिणामकारक बोलण्याचा त्याचा विचार होता. नानाभाई त पांडू परब या झाडून साऱ्यांना भिकंभटापुढें नाक घांसण्याचा प्रसंग आल्यास एक उत्कृष्ट न्याय होईल अशी त्याची अपेक्षा होती.

आणि एक दिवस शंकराचार्यांपुढें ती फिर्याद आली. भिकंभट सारी तयारी करून आला होता, स्थानभ्रष्ट शेंडीदेखील पुडी करून त्यानें बंडीच्या खिशांत बरोबर आणली होती. जुन्या नटेश्वर मंडळीचे भागीदार एक घोळका करून पलीकडे उभे होतें. ढगे मास्तरही एका कोपऱ्यांत उभा होता. प्रथम भिकंभटांचे प्रतिनिधी वे. शा. सं. फडेशास्त्री यांनीं तक्रार श्रींपुढें मांडली व सांगितलें कीं फिर्यादीचा अशा रीतीनें तेजोभंग ज्याच्या हातून झाला तो मनुष्यच हजर आहे व तोच सांगेल कीं आपण कुणाच्या सांगण्यावरून काय केलें. आतां काय झालं तें सांगण्यासाठीं आपल्याला पुढें बोलावतील म्हणून ढगे मास्तर तयार राहिला—पण तितक्यांत नटेश्वर-मंडळांत कांहीं कुजबूज होऊन त्यांच्यातर्फे श्री. पुंडंभट पुंडरीक यांनीं श्रींपुढें अर्ज केला कीं वादीची खाजगी समजूत घालतां येईल अशी प्रतिवादीला आशा आहे, तरी श्रींची परवानगी व्हावी. तशी परवानगी देण्याआधीं श्रींनीं भिकंभटला एकच प्रश्न

विचारला ‘ तुम्ही यवन झाला नाहींत ही खात्री आहे ना तुमची स्वतःची ? ’ त्यावर भिकंभटांनीं नम्रपणें सांगितलें की ‘ माझी फक्त शेंडीच गेली आहे—मी अन्यथा बाटवला गेलों नाहीं याची खात्री श्री सांगतील त्या शरीरवैद्याला खाजगी रीतीनें करून देण्यास आपण तयार आहोंत. ’ श्रींनी घाईघाईनें परवानगी दिली.

वादी, प्रतिवादी व त्यांचे प्रतिनिधी बाजूला जाऊन गुफ्तगू करूं लागले, व ढगे मास्तर फिरत फिरत मठाच्या दरवाज्याकडे जाऊन उभा राहिला. झालेल्या प्रमादाबद्दल नटेश्वरकंपू भिकंभटाची माफी मागत असून त्याला थोडीबहुत नुकसानभरपाईही देत असावा, लौकर त्या लोकांच्याच हातांनीं त्याची आपण समाजांत पुनःप्रतिष्ठा करून देणार, त्याबरोबरच त्याला उल्लू बनविणाऱ्या लोकांना निमूटपणें त्याचा बहुमान करावा लागणार व भिकंभटाला परत माणूस बनविण्याचें श्रेय आपल्याला मिळणार—त्याच्याकडून मातृ-दिनाच्या फंडाला चांगली लठ्ठ वर्गणी काढायला कांहींच हरकत नाहीं, असे विचार त्याच्या डोक्यांत चालले होते. तास झाला दीडतास झाला तरी ‘ भिकंभट समझोता मंडळ ’ कांहीं तिकडून बाहेर पडेचना, ढग्याला वाटलें कीं कांहीं विघ्न आलें कीं काय वाटाघाटींत ?

एकाएकीं कुठल्याशा दारांतून मोठा हंशा ऐकूं आला. हांसत खिदळत, बोलत, टाळ्या देत, पाठीवर थापा मारीत आणि एकमेकांचे हात पकडून हालवीत तडजोड-मंडळ खुषीत बाहेर आलें. त्यांच्या मध्यभागीं भिकंभटाची उत्सवमूर्ति संतुष्टपणें चालत होती. त्याचा हात कुणाच्या तरी खांद्यावर होता. त्याच्या खांद्यावर कित्येकांचे हात होते, कोणी त्याला तपकीर देत होते, कोणी चंची पुढें करीत होता, कोणी

सिगारेट पेटवीत होता. तो कंपू श्रींच्या दरबाराकडे न वळतां बाहेर पडूं लागला होता.

" हें काय, झाली तडजोड ? झालं तुमचं समाधान भिकंभट ? " ढगे मास्तरानें आश्चर्यानें विचारलें.

" तें आमचं आम्हीं आपापसांत पाहून घेऊं ! " भिकंभट विजयी मुद्रेनें म्हणाला.

" कां, यांना काय हो चौकशा ? " टोळक्यांतून कोणीसें मुद्दाम विचारलें.

" वा, भिकंभट देणार आहेत ना यांच्या हातांत–रकमेचा तोडा " विचारणेला उत्तर मिळालें. भिकंभटासह सगळ्यांत हंशा पिकला.

" खरंच " भिकंभट हंसत हंसत म्हणाला, " मास्तर, तुम्ही सांगाल त्या संस्थेला कांहीं तरी धर्म करायचं कबूल केलं होतं नाहीं कां मी ? वा, असं काय, हें घ्या ना ! ' भिकंभटानें ढगे मास्तराच्या हातावर कांहीं तरी ठेवलें. मंडळींत पुन्हां एकदां हंशा पिकला. मागें वळून हांसत पाहात पाहात मंडळी दिसेनाशीं झालीं. न्यायाला मदत करण्यास आलेला तो मनुष्य मूढ होऊन नुसता तिकडे पाहात राहिला. कांहीं वेळानें भिकंभटानें हातावर काय ठेवलें हें पाहायला त्यानें मूठ उघडली–

त्यांत त्या दिवशीं कापलेली भिकंभटाची शेंडी होती....

---

# ‘ हे पहा पंधरा निमकहराम !’ १६

महाराष्ट्राचे लोकप्रिय व्याख्याते, चित्रनिर्माते, टीकाकार, नाटककार, विनोदी लेखक, कवि, शिक्षणतज्ज्ञ व राजकीय कार्यकर्ते ( त्याचप्रमाणे प्रस्तुत लेखकाचे एक जुने मित्र व ज्येष्ठ हितचिंतक ) ‘आचार्य’ प्रल्हाद केशव अत्रे बी. ए., बी. टी. टी. डी. [ लंडन ] हे १९४० मध्यें पुणें नगर पालिकेंत कॉंग्रेसपक्षाचे नेते होते. सुरुवातीस त्यांचा पक्ष बहुसंख्य होता, पण निवडणुकीचे वेळीं कॉंग्रेसचा शेंदूर फांसून आंत शिरलेल्या कांहीं सभासदांनीं अध्यक्षांना निवडण्याच्या वेळीं मात्र एकाएकीं तो शेंदूर पुसून कॉंग्रेस पक्षाला दगा दिला ! तत्प्रसंगीं बाबुराव अत्र्यांनीं आपला सात्त्विक संताप व्यक्त करण्यासाठीं स्वतःच्या ‘नवयुग’ साप्ताहिकांत ‘हे पहा पंधरा निमकहराम !’ हा तडाखेबंद लेख लिहिला व कॉंग्रेसपक्षाला तोंडघशीं पाडणाऱ्या त्या पंधरा नगरपित्यांचा नांवानिशीवार उद्धार केला !

खुद्द महाराष्ट्राच्या आद्य विडम्बनकारानें अशी संधी निर्माण करून दिल्यानंतर प्रस्तुत लेखकासारख्या शिकाऊ

*कनिष्ठानें ती वांया घालवणें कधींच योग्य झालें नसतें; आचार्यांच्या मूळ पाठाबरहुकूम खालील पुस्ती गिरवली आहे.*

* * *

## सोनबा स्वामी यांचा निवडणूक जाहीर नामा.

जिमखाना—सेक्रेटरीसारख्या महत्त्वाच्या जागेवरून निवृत्त होऊन आगामी गॅदरींच्या जनरल सेक्रेटरीशिपसाठीं मीं उभा आहें. माझ्या कार्यक्षेत्रांत अशी क्रांति कां होत आहे, जगावर माझें कर्तृत्व गाजवण्याचें माध्यम मी कां बदलीत आहे; किंवा थोडक्यांत म्हणजे जिमखान्याचा गांवगाडा सोडून वार्षिक संमेलनाच्या रथाच्या दोऱ्या मी कां चांचपूं लागलों आहें, याचें माझ्या असंख्य मित्रांस कुतूहल वाटणें साहजिक आहे, आणि तें कां वाटूं नये ? जिमखाना मीटिंगच्या वेळीं मी केलेलीं वक्तृत्वपूर्ण भाषणें ज्यांच्या कानांत दुमदुमलीं, पिंगपाँगच्या फायनलला विजयश्री मला माळ घालतांना ज्यांनीं टाळ्या पिटल्या, ‘ लेडीज् विरुद्ध स्टाफ ’ या ‘ परस्पर ’ मॅचमध्यें कॉर्नेलियाच्या केक्स् पुरविल्यामुळें ज्यांनीं मला प्रसंगीं विद्यार्थ्यांच्या विरुद्ध देखील पाठबळ दिलें, ज्या माझ्या खिलाडू मित्रांनीं दर मॅचच्या प्रसंगीं खाण्यापिण्याची तरतूद उत्तम ठेविल्याबद्दल मला धन्यवाद दिले, आणि ज्यांनीं माझ्या सूट्स्चें आणि सफाईचें कौतुक केलें; त्याचप्रमाणें ज्या गांवढळ झब्बूंनीं माझ्या उत्कर्षा-बद्दल असूयेनें जळफळत बोटें मोडिली, ज्यांनीं आपली कुवत न ओळखतां मला अडनेडे प्रश्न विचारून भर जिमखाना कमिटींत अड-विण्याचा प्रयत्न केला, ज्यांनीं माझ्याबद्दल प्रिन्सिपालपर्यंत तक्रारी नेल्या, ज्यांनीं लेडी स्टूडंट्सची मनें माझ्याबद्दल दूषित करण्याचा प्रयत्न केला,

किंवा ज्यांनीं माझ्याशीं कांही संबंध नसतां देखील ठिकठिकाणीं माझ्या निंदेच्या दुर्वा उपटीत मनांतल्या सिद्धिविनायकाला एकशेंआठाचा संकल्प केला, त्या सर्वांनाच मी जिमखान्याचें कुरण सोडून गॅदरिंगच्या मांडवाला कां हात घातला ही जिज्ञासा वाटणें अगदीं स्वाभाविक आहे. आणि माझी भूमिका (अर्थात् या क्षणाची) विशद करण्यासाठींच येत्या वार्षिकोत्सवाच्या तीन महिने आधीं मी हा निवडणुकीचा जाहिरनामा माझ्या असंख्य चाहत्यांस सादर करीत आहे.

मित्रहो! जिमखाना सोडून गॅदरींगकडे मला ढकलण्यास जर कोणी कारण झाले असतील तर हे पंधरा निमकहराम! त्यांचा फोटो मी या जाहिरनाम्याबरोबर फुकट वांटीत आहे. हा फोटो काढल्याला उणापुरा एक महिनाही झाला नसेल. आमची सीझनची पहिली मॅच नामदेव टेलरिंग कॉलेजशीं झाली त्या दिवशींचा हा फोटो; कर्मधर्मसंयोगानें त्या दिवशीं जी प्रभावळ माझ्याभोंवतीं होती तीच टोणग्यांची रांग उधळली आणि त्यांच्याच शिंगांनीं मला जिमखाना मैदानाच्या फाटकाबाहेर अलगद आणून सोडलें. वास्तविक आमच्या कॉलेज जिमखान्यांतली बारभाई व बजबजपुरी मोडून ती एक सुसंघटित व आदर्श संस्था करण्याचा आम्ही बेत केला होता; त्यासाठींच आमचा गेल्या वर्षींचा वऱ्हाडी पक्ष सोडून आम्ही लोकांनीं आमची 'दिलबहार' ही नवी सर्वरंगी पार्टी स्थापन केली होती. जिमखाना इलेक्शनस् मध्यें हुकमी बहुमत मिळविण्यासाठीं हवे ते गण्येगम्प्ये उभे करणें भाग होतें, कारण त्यांच्या लोकांना ते कमिटींत हवेच होते; त्यासाठीं जन्मांत कधीं ज्यांनीं उघडें मैदान पाहिलें नाहीं किंवा हातांत कुठल्याहि प्रकारची बॅट धरली नाहीं, ज्यांची चेण्डूची ओळख औषधांच्या गोळीपलिकडे पोंचली

नाहीं, ज्यांना ब्रॅडमन् म्हणजे एक भटारी वाटत होता, ज्याना डोनॅल्ड बज् हा एक अमेरिकन' ॲक्टर असावा असा संशय होता, ज्यांचा ध्यानचंद हे एका हिमालयांतील योग्याचें नांव असा तर्क होता, ज्यांना एक डोळ्याचा रणजितसींगच तेवढा माहीत होता, गामा ही एक पंजाबमधील नदी जसावी अशी ज्यांची कल्पना होती, असे लोक देखील आमची बाजू बहुमताची ठेवण्यासाठीं आमच्यांत सामील करून घेणें जरूर होतें.

जिमखाना कमिटीचे मेम्बर झाल्याबरोबर या लबाड लोकांनीं आपला सारा नूर पालटला. आम्हां मंडळींच्या योजनांना मोडता घालण्याचे उपद्व्याप यांनीं सुरू केले. त्यांच्यातल्या दोघांतिघां आडदांड गलेलठ्ठांनीं आमचा निरुपद्रवी लायब्ररी–सेक्रेटरी नफ्फटभाई नानालाल याला एकदां विनाकारण गुद्दे दिले. या सर्व कारेबटाव्यांचीं मोट बांधता बांधता मीं जेरीस आलों ! नाहीं नाहीं म्हणतां एक महिन्यांत आम्हीं कांहीं थोडें काम केलें नाहीं; सर लवजी लवंगीया कॉलेजच्या इतिहासांत कधीं झाल्या नव्हत्या अशा गोष्टी आम्हीं करून दाखविल्या. उदाहरणार्थ, पोरींनीं तुमानी व पोरांनीं लुंग्या नेसून आम्हीं पार पाडलेली क्रिकेट मॅच. विद्यार्थीनींसाठीं 'बॉक्सिंग' ऊर्फ मुष्टियुद्ध हें खास खातें उघडून देण्याचा आमचा अभिनव उपक्रम तर कॉलेज जिमखान्यांच्या इतिहासांत अपूर्वच ठरेल. या खेरीज बारिक-सारिक कामें तर कित्येक झालीं; गेल्या वर्षींच्या तडे गेलेल्या बॅटी सरस दोरीनें बांधवून आणल्या, चेण्डू चांभाराकडून शिवून घेतले, पॅडस्ना चुना लावण्यांत आला, पॅव्हिलियन मधील रिफ्रेशमेंट रूमचा रोखीचा नियम बदलून तेथें उधार खातीं सुरू करण्याची सोय करवून देण्यांत आली. ' जिमखाना फी 'च नसावी, उलट मैदानी खेळांकडे लक्ष देण्यास

उत्तेजन म्हणून कॉलेजनेंच मुलांना फी द्यावी, अशा मूलग्राही योजनांचा आम्हीं पुरस्कार केला. त्या शिवाय बाऊंडरीचीं निशाणें नवीं आणलीं, सर्व टीमला ब्लेझर्स अर्ध्या खर्चांत शिववून दिले—त्यासाठीं तर नामदेव टेलरिंग कॉलेजशीं मॅच खेळावी लागली ! खेळांचें सामान व उपाहाराचे पदार्थ यांचीं कंत्राटें देण्यास पद्धतींत हळूंहळूं पुनर्घटना सुरू झालीच होती. गॅदरींगच्या वेळीं ऐंशी रुपयांचा सूट घालून वाचण्याच्या रिपोर्टचें पहिलें पान मी लिहूनही ठेवलें होतें—पण हाय ! तेवढ्यांत या पक्ष-द्रोह्यांनीं साधली !

आंकडा फुगविण्यासाठीं केलेल्या या खोगिरभरतींत आमचे हात अनेक प्रकारांनीं अडकले होते. त्यांतलाच एक प्रकार म्हणजे क्रिकेट टीमच्या कॅप्टनशिपसाठीं झालेला सौदा; बग्या बुरणुसे चांगला माझा दोस्त; त्याचें करायला गेलों भलें आणि त्यानेंच अखेर प्रकरण निकरावर आणलें. 'नामदेव टेलरिंग कॉलेजच्या मॅच पुरतं तरी मला कप्तान कर' म्हणून त्यानें मला अगदीं गळच घातली म्हणून मीं सगळ्यांचीं मनें वळविलीं; कप मॅचला पापा पोखरे कॅप्टन व्हायचा हें ठरलेंच होतें, कांहीं नाहीं तरी तो नऊ वर्षे कॉलेजमध्यें होता, तेव्हां जरी तो आमच्यांतला नव्हता तरी त्याच्या हक्कांकडे लक्ष देणें भाग होतें. पण मग बग्या बुरणुसे आपली कप्तानी सोडीना ! कुठल्याशा पोरीवर छाप पाडायला 'आपण कॉलेजचे कॅप्टन आहोंत' अशी त्यानें थाप दिली होती; पहिल्या मॅचला त्याचा रुबाब पहायला तो त्या पोरीला घेऊन देखील आला होता——आणि त्यामुळेंच त्या मूर्ख पोरीनें चढून जाऊन, 'डेव्हिड कपांतून मला फालुदा पाजाल त्या दिवशींच मी माझं हृदय तुम्हांला देईन' असा निर्वाणीचा खलिता त्याला दिला होता. त्यामुळें

एरवीं सुतासारखा सरळ असणारा बग्या आमच्यासारख्या जुन्या दोस्तांवर बिथरला होता आणि दुसरे दहा गडी नसले तरी मी एकटा कॅप्टन होऊन खेळेन व डेव्हिड कप जिंकून आणिन ' असें गाढवासारखा बरळायला लागला होता—याला कारण तीच बुराक पोरटी ! तिच्या-मुळेंच परवां दाजी कॉलेजशीं झालेल्या मॅचमध्यें आधीं जाऊन स्कोअर बुकांत आपल्या नांवापुढें ' कॅटप्न ' अशीं अक्षरें बग्यानें लिहिलीं होतीं, ऐनवेळीं पापा पोखऱ्याला बाजूला सारून तो टॉस करण्यासाठीं रुपया घेऊन धडपडत पुढें धांवला होता, आणि बॅटिंग घेतली असूनही कप्तानीच्या कैफांत नवा बॉल झेलित झेलित तो फील्डिंगसाठीं पिच्‌कडे निघाला होता !

केवळ मॅचला टिफिन असते म्हणून सर लवजी लवंगिया कॉलेजच्या क्रिकेट–टीममध्यें जायचें, हेंच ज्यांचें उच्च धेय, आणि ' स्वतःची टीम-मध्यें निवड स्वतःच करायची ' हाच ज्यांचा ( जिमखाना कमिटीचे सभासद या दृष्टीनें ) कार्यक्रम, त्या ड्यांबिस लोकांना पापा पोखऱ्याच कॅप्टन हवा होता–कारण यांच्यामधल्या बैलांची वैरण स्वतः तोंडांत धरून चालणारे कांहीं कोल्हे होतेच; त्या धूर्त प्राण्यांच्या चांडाळ चौकडींतच प्रथम माझ्या गटाविरुद्ध सगळें गुप्त कारस्थान शिजलें. पांच सहा किफायतशीर खातीं पकडून आपली व आपल्या मित्रांची चंगळ चालवायची, हा गुलामांचा डाव ! जिमखान्यांत निवडून यायचें कशासाठीं, तर सबंध कोर्सला पुरेल इतकी कपड्यांची आणि साऱ्या टोळभैरवांना पुरेल इतक्या चंदीचाऱ्याची तरतूद करून घेण्यासाठीं. पहिल्या पहिल्यानें मीं या स्वार्थी लोकांना थोडी सवलत दिली—हो, द्यायलाच पाहिजे—पण पुढें पुढें हितसंबंधाच्या बाबतींत माझ्या मित्रांचे

नी त्या चांडाळचौकडीचे खटके उडायला लागले—एकदां तर भर सभेंत आईवरून शिवीगाळ झडली. तेव्हांपासून या हरामखोरांना कांहींतरी निमित्तच हवें होतें—बग्या बुरणुशानें तें दिलें ! आणि त्या दिवशीं आमचीं बिलें पास करण्याचें नाकारून या दगाबाज दुष्मनांनीं, या अस्तनींतल्या जळत्या थोटकांनीं, या अवसानघातकी बाजारबुणग्यांनीं आमचा बावटा खालीं आणला ! आमच्या विरोधी 'मतलबगीर पार्टी 'शीं हे पक्षद्रोही 'शय्यासोबती' झाले. आमचीं उच्च ध्येयें, आमचे विधायक कार्यक्रम, आमच्या क्रांतिकारक योजना आणि आमची लोकोत्तर शिस्त सारीं स्वप्नें विरून गेलीं ! कॉलेजभर आमच्याबद्दल कुजबुज सुरू झाली. कुरूप पोरीदेखील आमच्याशीं फाजिल मिजास दाखवूं लागल्या आणि कोणी वात्रटानें आमच्या 'दिलबहार पार्टी 'चें नांव बदलून तें 'धोबी पछाड पार्टी' ठेवण्यांत आलें आहे अशी कॉलेजच्या बोर्डावर नोटीस लावली.

मला आशा आहे कीं, आम्हांला तोकडे अल्पसंख्य बनविणाऱ्या या पंधरा पक्षद्रोह्यांच्या खोलीखोलीपुढून, जिमखान्याचे जागरुक व स्वाभिमानी सदस्य जरूर ते आवाज करतील, यांच्या विश्वासघाताबद्दल आपले लोकप्रिय प्रिन्सिपॉलसाहेब यांची कानउपटणी करतील, विद्यार्थिनी यांचा सहवास वर्ज्य करतील, रिफ्रेशमेंट रूममध्यें यांची उधारी बन्द होईल, आणि हे सगळे नापास होतील. या बिनभरोसापात्र लोकांची फोटोवरून मीं मुद्दाम माहिती देत आहें आणि कॉलेजमधल्या माझ्या तमाम मित्रमंडळींना बजावून दाखवीत आहे कीं, लोकहो, हे पहा पंधरा हरामखोर : डावीकडून उजवीकडे एकेकाचा चेहरा न्याहाळीत नजर फिरवा—

**पहिला**—यादव्या चिपाड; किती बावळट कारटें आहे तें फोटोंतच पहा ! याला अन्तोबा फन्यानें एक कोरा टेनिसशूचा जोड लांच देऊन फोडला.

**दुसरा**—धनंजय धारणे–हाही तसाच अगदीं बेअक्कली इसम. 'स्कोअर बुकांत तुझीं बोलिंग ॲव्हरेजेस् पहिल्या नंबराला आणून ठेवतो' म्हणून अन्तोबांनीं हेंही पात्र आपल्या कोंडवाड्यांत वळवलें.

**तिसरा**—बॉब बोरवीज–हा कँपमधल्या आपल्या काकाच्या हॉटेलांत मुरगीमच्छी खिलवतो म्हणून ढोबळ्यांनीं आणि धोंडिबा डाक्यांनीं याला मुद्दाम टीममध्यें चान्स दिला–विकेटकीपिंगला उभा केला तेव्हां ही स्वारी बोलरकडे पाठ देऊन बॅट्समनच्या पुढें उभी राहिली!

**चौथा**—केकी कोयवाला–आणखी एक निरुपद्रवी आचरट; 'युनिव्हर्सिटींतला फिजिक्सचा पेपर तुला आदल्या रात्रीं पुरवतों' अशी भविष्यवादी थाप देऊन छन्नुसिंग कलालानें याला फितुर केला !

**पांचवा**—हाच छन्नुसिंग कलाल ! बोरवीझ बबर्जी आणि छन्नुसिंग कलाल म्हणजेच आमच्या शत्रुपक्षांत 'क्लीव्हडन सेट' !

**सहावा**—हा घेलाभाई शेट–सहाव्या खेपेला मॅट्रिक झाला नि त्या खेपेपर्यंत त्याच्या हायस्कूलच्या ज्युनियर टीममध्यें खेळत होता–यावरूनच त्याची नियत समजेल !

**सातवा**—खण्डूभाई झकेरिया–हें या टोळक्यांतलें विनोदी पात्र. याच्या तोंडची मराठी भाषा ऐकून करमणूक करून घेण्यासाठीं याला पार्टींत घेतलेला !

**आठवा**—सलाउद्दीन साडीवाला—या बोराजीला धंद्यावाचून कांहीं दिसतच नाहीं. जिमखान्यामुळें पोरींच्या ओळखी होतील व ओळखी झाल्यावर त्यांना साड्या विकतां येतील या धोरणानें याच्या बापानेंच याच्या निवडणुकीवर चांगला भक्कम खर्च केला—मतलबाची बाजू पाहून हा व्यापारी तिकडे वळला यांत नवल काय ?

**नववा**—गण्या गुऱ्हाळ—याच्या काकाच्या मळ्यावर काहिली लागली म्हणजे हा सगळ्यांना घेऊन जातो, हीच जिमखाना कमिटींत येण्याची याची लायकी !

**दहावा**—अन्तोबा फन्दे—हा या साऱ्या प्रकरणाचा मूळपुरुष ! हा बी. ए. ला लौकर सुटेना म्हणून, नाहींतर मध्यप्रान्तांत दिवाणगिरी मिळविली असती यानें ! खिशांतल्या तीन फौन्टन पेन्सनीं, ‘ आपण स्कोअरर आहोंत ’ हा रुबाब मारण्यांतच तो धन्य आहे. बघतो आहे पहा कसा चोरासारखा. अकरा वर्षें कॉलेजांत घालवून हा इतका निर्ढावला आहे कीं, नवख्या प्रोफेसरांना देखील ‘नर्व्हस’ करतो. त्याची ती टोपी आणि लॉंगकोट पहा ! पक्का बगळा आहे बेटा. स्कोअरबुकांत हवी ती हातचलाखी करण्याबद्दल या गृहस्थांची ख्याति आहे. याच्या ‘ वचकपाड ’ स्वरूपामुळें पुष्कळदां दुसऱ्या कॉलेजस् मधून याला प्रोफेसर समजून वागवण्यांत येतें—पण बाजारखातें आपल्याकडे हवें हा याचा हट्ट !

**अकरावा**—मधुकर डुकले—नांवावरूनच गुणाची कल्पना येण्यासारखी आहे—कोणीही बनवावा ! खेळतो बरा, पण व्यवहार अगदीं नाहीं !

**दुसरी रांग** ( खुर्च्यांवर )

**बारावा**—' सॅमी ' सूर्यवंशी–या काळ्या बाळाला खूष करावा म्हणून आम्हीं त्याला साहेबासारखे वागवूं लागलों–तों बेटा खरोखरीच साहेबी दाखवायला लागला !

**तेरावा**—धोंडिबा डाके–महा पाताळयंत्री इसम ! दोन वर्षांनीं जिमखाना इलेक्शनला उपयोगी पडतील म्हणून हा शाळांतल्या सहावीच्या मुलांना आतांपासूनच चहा पाजीत असतो.

( त्यानंतर मध्यभागीं मी बसलों आहे–पण आतां या लोकांत बसून तोंड दाखवायला जागा आहे काय ? म्हणून फोटो मुद्दाम ' रिटच ' करून घेतला आहे ! माझ्यापुढेंच माझा पिंगपाँगचा चॅम्पियनशिप कप व वक्तृत्वाचीं पदकें ठेवलीं आहेत. )

**चौदावा**—पापा पोखरे–एरवीं मनुष्य कांहीं वाईट नाहीं, पण अन्तोबा, धोंडिबा, छन्नुसिंग नि दादा ढोबळे इतक्यांनीं कान फुंकल्यावर तो काय ऐकणार आहे ? तशांत आमच्या बग्यानेंही कॅप्टनकीचा खेंचरहट्ट धरून त्या लोकांना निमित्त दिलेलें !

( बग्या या टीमचा कॅप्टन असूनही फोटोंतून गैरहजर आहे, कारण त्याच्या त्या भुक्कड पोरीला घेऊन फोटोला बसायचा त्याचा डाव होता, तो आम्हीं हाणून पाडल्यावर ती पोरगी रुसून निघून गेली, बग्या तिची समजूत घालायला गेला आणि मधली खुर्ची बिनतक्रार मला मिळाली.

**पंधरावा**—हे दादा ढोबळे—विद्यार्थीवर्गाचे आणखी एक तहाहयात सभासद. यांचें स्वतःचेंच स्पोटर्स गुड्स् आणि किराणा मालाचें दुकान आहे—यावरूनच काय तें समजावें !

या पंधरा पक्षद्रोह्यांनीं आयत्या वेळेला आमच्या पायाखालची सत्रंजी हिसकली–आम्हीं पास करण्यासाठीं जिमखाना कमिटीपुढें ठेवलेलीं बरींचशीं बिलें नापास केलीं, आमच्या बग्याला कमानगिरीवरून उडवला ( आतां तो दुसऱ्या एका पोरीसाठीं 'स्मिथ प्राइझ' मिळविण्याची तयारी करीत आहे ), जिमखाना सेक्रेटरी मीं व क्रिकेट सेक्रेटरी छब्या छत्तीसवार यांना अल्पसंख्यांच्या कोपऱ्यांत ढकललें.

पण इतक्यावर थांबलें नाहीं; आम्हाला पुन्हा सत्ता मिळाल्यावर आम्हीं काय करूं—तें सांगण्याचें स्थळ हा निवडणुकीचा जाहिरनामा नव्हे. तूर्त मित्रांपुढें बाजू मांडली आहे व विनंति एवढीच कीं—

'रिमेम्बर सोनबा स्वामी फॉर कॉलेज डे सेक्रेटरी.'

---

# अवसानघातकी अन्या १८

आंतून हिंसासूचक आवाज निघाले म्हणूनच मीं तरी त्या खोलींत डोकावलों. लालबागला दादीशेट ताडीबागच्या चाळींत ( चाळ नंबर ३ ) चौथ्या मजल्यावर कोपऱ्याकडून दुसऱ्या खोलींत चिमण दरजी काम करायला बसतो, त्याच्याकडून दोन सदरे शिवून आणायला मीं गेलों होतों. ' ताडबाग शेट ' च्या चाळी म्हणजे परळांत मुंबई होती ! दोन बाजूनीं रस्ते आणि तिसऱ्या बाजूनें अजस्र उभ्या पत्र्यांची भिंत. एखाद्या जंगी लोखंडी पुलाचे तुकडेच जणूं काय वखारींत रचून ठेवलेले आहेत, आणि त्यांत किड्यांसारखीं माणसें झालीं आहेत, असा भास व्हायचा. डोंगराला दोन तीन उभ्या फटी पडलेल्या असाव्या आणि खडकाला आडवीं भोंकें पाडून माणसांना रहाण्यासाठीं जागा केलेली असावी असे त्या चाळींत शिरतांना वाटे. एकादे वेळीं असा संशय येई कीं, पूर्वी केव्हां तरी तटांत तबेल्यांची सोय असलेला एकादा किल्ला लढाईत सुरुंगानें उडवला गेला आणि शांतता प्रस्थापित झाल्यावर तेव्हांच्या सरकारनें केलेल्या लिलावांत ताडबागशेटजींनीं ते तुकडे मुंबईत जुळवून उभे केले व भाड्याच्या बारमाही फुलांचा एक नवीन वाफा लावला. असो, तर त्या टिकाणीं मीं कुठल्यातरी एका चोरजिन्यानें

चौथ्या मजल्यापासून थोड्याच अंतरापर्यंत चढून आलों होतों. एकाएकीं डाव्या बाजूच्या एका खोलींतून "फट्–फट्–फडाफट् फट्–फाडफट्" असे आवाज आले, त्याचप्रमाणें एक चिडलेला मनुष्य भयंकर संतापून कांहींतरी ओरडतो आहे, आणि कोणीतरी घाबऱ्या आवाजांत मध्यें तोंड उघडण्याचा प्रयत्न करतो आहे असे अस्पष्टपणें मला ऐकूं आलें.

सात रन्स कमी असतांना शेवटची जोडी खेळत असावी, आणि स्टेडियममधल्या अशा वेळच्या त्या तंग शांततेंत, चणे खाऊन कंटाळलेल्या एकाद्या कार्ट्यानें उठून उगाच टाळया पिटूं लागावें, इतका त्यावेळीं माझा शांतताभंग झाला—कारण चिमण दरज्याला काय काय सांगायचें त्याची यादी मीं मनांतल्या मनांत करीत होतों. दुपारीं तीनला त्या काळोख्या कबुतरखान्यांत इतकी शांतता होती कीं, रस्त्यावरच्या दुकानांतल्या फोनोच्या संगीतापैकीं फक्त खरखरीचाच भाग मधूनमधून तेथें ऐकूं येत होता. माझ्याखेरीज समोरच्या दोन नंबर चाळींतल्या तिसऱ्या मजल्यावर कठड्याला टेकून बिडी ओढीत उभ्या असलेल्या एका गुजराथ्यानेंच काय ती ती 'फटाफटी' ऐकली होती. माझी त्याच्याकडे दृष्टि वळतांच त्यानें 'आलों' असें हात उभारून खुणेनें आश्वासन दिलें आणि गंजीफ्राक खालीं ओढून धोतर घट्ट करीत तो स्वतःच्या चाळीच्या जिन्याकडे धावला—तो जिना उतरून या चाळीचा जिना चढून वर येईपर्यंत पुष्कळ अवकाश होता, दरम्यान खळबळीचें मूळ पहाण्यासाठीं मीं त्या खोलीच्या एका उघड्या दारांतून आंत डोकावलों.

थोडाच वेळ, पण इतकें खुषीकर चित्र मला दिसून गेलें कीं ते तीन जिने चढल्याचें आज सार्थक वाटलें. धिप्पाड आंगकाठीच्या पण

रडकुंडी आलेल्या एका तरुणाला एक लहानसा प्रोफेसर उड्या मार मारून तोंडांत देत होता! क्षणभर त्या दृश्यावर माझा विश्वास बसेना. गांधीलमाशीनें सतावलेल्या घोड्यासारखा तो तरुण अगदीं हैराण झाला होता—" अहो पण—मी नाहीं—माझं ऐकून तर—आऽऽ!" अशा केंविलवाण्या किंकाळ्या देत होता. उलट त्याच्यावर हल्ला करणारा गृहस्थ माराच्या बरोबरीनें तोंडानें सरबत्ती करीत होता, " बेअकली—मूर्ख—गाढव—आचरट—टोणगा गद्धा!" तो प्रोफेसर म्हणत होता, " मला-मला मध्यें घालून तोंडघशी पाडतो—तो-तो यःकश्चित् हॉटेल मॅनेजर मला डाकू म्हणाला—तूं-तूं कारण—!" इतक्यांत आम्हीं दारांत आहोंत हें त्याच्या लक्षांत आलें. त्यानें लगेच आपल्या कार्यक्रमांत खंड करून घाईघाईनें येऊन माझ्यावर डोळे वटारून खाडकन् दार बंद करून घेतलें. मीं वर चिमण दरज्याकडे निघालों व माझा सहप्रेक्षक गुजराथी तेथेंच कठड्याला टेंकून विडी पेटवूं लागला. ( मीं दरवाज्याकडचें काम उरकून परत येईपर्यंत दरम्यान काय घडलें हें सांगावयाला तो तेथें खोळंबून उभा राहील ही माझी खात्री होती. )

पण मग इतर कामांच्या गडबडींत या 'सनसनाटी भरेल्या' प्रकाराचें पुढें काय झालें हें पहायला मला वेळच झाला नाहीं; तथापि दुसऱ्या दिवशींच्या पूनामेलमध्यें घेतलेला पेपर वाचल्यानंतर सहज वर बघतों तों प्रोफेसर मजकूर माझ्या समोरच्याच बांकावर आलेले! त्यांचा तो बेपर्वाईनें पेहरलेला गबाळ सूट त्यांच्या प्रोफेसरीची ग्वाही देत होता. चुरगळलेल्या कपड्यांतून निघालेल्या त्यांच्या विद्वज्जड मुद्रेमुळें मीं त्यांना प्रोफसर म्हणून आदल्याच दिवशीं ओळखलें होतें. तोच सूट आज गाडींत त्यांच्या अंगावर होता; ते एक कसलेंसें लठ्ठ पुस्तक वाचीत मधून

मधून कांहीं टिपणें करीत होते व स्वतःशीं पुटपुटत होते, यांना समोर पाहून व कालचा मामला आठवून मला एकदम हांसूं आलें—तेवढ्यांतच त्यांनीं चष्म्यावरून माझ्याकडे पाहिलें व मीं गडबडून त्यांना हांसतच नमस्कार केला. हंसतमुखानें नमस्कार करणारे विद्यार्थी प्रोफेसरांना क्वचितच भेटत असावेत; कारण प्रोफेसरांनीं माझा नमस्कार अगदीं खूष होऊन स्वीकारला.

"कुठं भेटलों होतों बरं आपण?" त्यांनीं प्रेमळ आवाजानें विचारलें. ही सौम्य मूर्ति कालच एका आडदांड इसमावर एखाद्या गुरख्यासारखी तुटून पडत होती असें त्यावेळीं कुणाला सांगूनही खरें वाटलें नसतें.

"काल —लालबागच्या चाळींत—" मी नम्रपणें म्हणालों.

"हो हो, बरोबर, आठवलं आतां—तुम्ही दारांत उभे होतां—म्हणूनच मी दार लावलं." ते म्हणाले

"मी मुद्दाम नव्हतों उभा राहिलों—जिना चढत असतांना आवाज ऐकूं आले म्हणून डोकावलों—" मी अजिजीनें सांगूं लागलों. प्रोफेसरांनीं एकदम एक बोट वर करून मला बजावण्यास सुरवात केली,

"हें वाईट! तशी माझी कांहीं हरकत नाहीं, पण आपलं तुम्हाला सांगतों, ही डोकावण्याची संवय वाईट."

"माफ करा, मला डोकावण्याची संवय नाहीं, पण तो प्रसंगच तसा होता. समजा, आपण स्वतः एखाद्या बिल्डिंगचा जिना चढत असतां एखाद्या खोलींतून मारामारीचा आवाज आला तर जाऊन डोकावणार नाहीं?"

प्रोफेसरांनीं क्षणभर विचार केला.

" तुमचा प्रश्न विचार करण्यासारखा आहे. " ते गंभीरपणें म्हणाले, " चौकसबुद्धि हा मानवी प्राण्याचा स्वभावधर्मच आहे. कदाचित् मी देखील अशा परिस्थितींत डोकावलों असतों–"

" आणि मीही आपल्या जागीं असतों तर डोकावणाऱ्या माणसाची पर्वा न करतां त्याच्यासमोर खाडकन् दार लावून घेतलं असतं. " मी उत्साहानें म्हणालों.

" बरोबरं आहे. " प्रोफेसर संतुष्ट मुद्रेनें चष्म्यांतून माझ्याकडे पहात बोलले. त्यांच्या ह्या वेळच्या तब्येतीचा फायदा घेतला तरच काल पाहिलेल्या त्या अद्भुत प्रकाराचा उलगडा होईल हें माझ्या चटकन् ध्यानांत आलें, व मी जरा धीटपणानें विचारलें,

" विचारल्याचा राग मानूं नका, पण कालचा तो मनुष्य कोण होता ?"

दरम्यान प्रोफेसरांचें लक्ष दुसरीकडेच कुठें गेलें होतें.

" कोण मनुष्य ? " त्यांनीं निर्विकार मुद्रेनें प्रश्न केला.

" ज्याच्यावर आपण निकराचा हल्ला चढवीत होतांत तो—"

" हां हां, तो होय, " प्रोफेसरांना आठवण झाली. पहिल्यानें त्यांच्या मुद्रेवर किंचित् स्मित झळकलें; पण पुन्हा एकदम कपाळावर आंठ्या पडल्या. " तो गद्धा ? हेः ! मूर्ख प्राणी आहे तो एक. नांवदेखील काढूं नका त्याचं माझ्यापुढं—"

" मला त्याचं नांवही माहीत नाहीं. म्हणूनच मीं विचारण्याचें धाडस करतों आहे—कीं तो मनुष्य कोण—नी लालबागच्या त्या

चाळींत भर दुपारीं तीन वाजतां आपल्यासारखे एक सन्मान्य प्रोफेसर त्याच्या फडाफड श्रीमुखांत कां देत होते ?"

"तो अन्या ! अनिल वडाळकर—माझ्या एका स्नेह्याचा मुलगा आहे—बेवकूफ लेकाचा ! एक नंबरचा अवसानघातकी—माझी अवस्था त्यानं मोठी बिकट करून टाकलीन् ! म्हणून मीं चिडलों होतों त्याच्यावर—"

"काय केलंन त्यानं ?"

"काय—केलंन् ? सांगितलं ना, कीं माझी पोझिशन अगदीं ऑक्वर्ड केलीन्. कांहीं नाहीं तरी मीं दहा पंधरा वर्षांच्या स्टँडिंगचा प्रोफेसर आहे. युनिव्हर्सिटी सेनेटचा मेम्बर—कुठून झक् मारली नी या अन्याला मदत करायला गेलों कुणास ठाऊक !" प्रोफेसर त्या आठवणीनें देखील बरेच गरम झाले. पुन्हां एकदम तर्जनी उभी करून व डोळे मोठे करून ते मला बजावूं लागले, "तुम्हाला एक गोष्ट मीं अगदीं लक्ष्यांत ठेवण्यासारखी सांगतो मिस्टर !—काय—तुमचं—नांव—तें—कीं कधींही कुणाच्या मदतीस धावण्याच्या भानगडींत पडूं नका. पस्तावाल माझ्यासारखे !"

"पण आपण कां पस्तावलांत तें मला अजून कळलंच नाहीं—"

"खरंच—पण तो बराच लांबलचक इतिहास आहे—"

"तो ऐकून मला धडा मिळेल—अजून पुणं यायला पुष्कळ अवकाश आहे—"

"बरं तर ऐका—पण माझं हें पुस्तक बाजूला ठेवावं लागेल—फार इन्टेरेस्टिंग थिअरी आहे ही, आनुवंशिक विषमतेबद्दल—म्हणजे हा असं म्हणतो कीं—"

" आपण मला अनिल वडाळकराबद्दल सांगत होतां–"

" खरंच—जाऊं द्या—पुस्तक मग वाचीन-असूं दे, ठेवतों मीं–"

माझ्यासारख्या जबाबदार नागरिकानं व प्राध्यापकानं संतापानं बेहोष होऊन एका तरुणाला मारीत सुटावं ही गोष्ट सकृद्दर्शनीं विस्मयकारक खरीच–( प्रोफेसरांनीं सुरुवात केली ) पण त्या शिखरांकाला पोहोंचेपर्यंत प्रकरण कसकसं रंगत गेलं तें तुम्हांला कळल्यावर इतकंसं आश्चर्य वाटणार नाहीं. हा अन्या ( किंवा अनिल सदाशिव वडाळकर ) माझ्या एका लहानपणच्या मित्राचा मुलगा. तो स्वतः मला फारसा कधींच आवडत नव्हता. पण आमच्या सदूभाऊचा—मित्राचा मुलगा म्हणून त्याच्याकडें मी विशेष अगत्यानं पहात आलों होतों, विशेषतः तो मॅट्रिक पास झाला तेव्हांपासून त्याच्या बापाच्या स्नेहाखातर मी या पोरामध्यें जरा जास्त इन्टरेस्ट घेत होतों; कारण याचा बाप आहे दूर गोकाकला एंजिनियर; या वाढत्या मुलाच्या अभ्यासाकडे नी इतर गोष्टींकडे लक्ष द्यायला त्याला नाहीं फुरसत; म्हणून हा पुण्यास कॉलेजांत आला तेव्हांपासून मी या मुलावर मोठ्या आपुलकीनं लक्ष ठेवीत होतों. त्याचा अभ्यास, कपडालत्ता—तसंच त्याला कांहीं लागलंसवरलं, तर मी नेहमी त्याची विचारपूस करीत करीत असायचा. याला प्रीव्हियसमधून इंटर–सायन्समध्यें चढविण्याची व्यवस्था करून दिली; इंटर–सायन्स पास होईना, तेव्हां माझ्या एका मित्राच्या ओळखीनं स्पेशल केस करून माटुंग्याच्या इन्स्टिटयूटमध्यें ॲडमिशन मिळवून दिली, तिथंही एकदां नापास झाल्यावर वरच्या वर्गांत ओढून घेण्यासाठीं खटपट केली. या अभ्यासाच्या गोष्टींखेरीज इतर बाबतींतही याला मी कांहीं कमी मदत

केलेली नाहीं. विद्यार्थ्यांची ट्रिप निघाली तेव्हां याला पाठवा म्हणून याच्या बापाकडे मीच शिफारस केली–बाप कुरकुर करतो तरी याला हवे तेवढे चांगले कपडे शिवून घेऊन दिले—सहा महिने घरीं बसतों म्हणाला—मी म्हटलं बसूं दे–त्याच्या कलाप्रमाणं घ्या, म्हणजे तरी कांहीं करून दाखवील...पण छट्! याच्या अंगीं नाहींच तें–बाप पहावा तर कसा व्यवस्थित ठाकठीक आहे अगदीं. मुलगाच असा कसा निघाला कोण जाणे? अगदीं बुळ्या! मुखदुर्बळ, किरकिऱ्या, भागुबाई, अवसानघातकी!

सगळ्यांना याची कुवत समजून चुकली आहे—बापानं देखील हात टेकलेन्–मीच एकटा इतके दिवस याची तरफदारी करीत आलों गाढव म्हणून! मीं म्हटलं कीं लेकाच्याचं म्हणणं तरी काय आहे तसं करूं दे, त्याला अगदीं पुरी मोकळीक देऊन पाहूं–आमची ही नवी सायकॉलॉजीची थिअरी आहे ना? कीं वाढत्या मुलाला आडवायचं नाहीं–त्याच्या मनावर कसलंही दडपण पडूं द्यायचं नाहीं–म्हणजे त्याची वाढ नीट होते, त्याची सर्व बाजूंनीं विकास होतो–कपाळ! सांगायची गोष्ट अशी कीं, या बाळाचं पुण्यास मला एक पत्र आलं कीं, 'महत्वाच्या कामासाठीं मी भेटायला येतों आहे.' मला जरा आश्चर्यच वाटलं, कीं या बावळटाला महत्वाचं काम तरी कुठलं निघालं? पण तो आला आणि त्यानं मला जें सांगितलंन त्यामुळं तर मीं अगदीं चकींतच होऊन गेलों. तसा कांहीं लहान नाहीं आहे तो–चांगला पंचवीस सव्वीस वर्षांचा घोडा आहे–पण तोंड उघडून तो जें बोलला त्यानं मी खरोखरच थोडा वेळ स्तिमित झालों!

त्यानं सांगितलन् कीं आपलं एका पोरीवर प्रेम बसलं आहे—

कल्पना करा, ज्या प्राण्याला पाठीचा कणा आहे कीं नाहीं इथपासून आपल्याला शंका आहे तो येऊन आपला एकदम सांगतो कीं, माझं एका पोरीवर प्रेम आहे !–काय वाटेल तुम्हांला ? मला आश्चर्याबरोबर एक प्रकारचा आनंदही वाटला; मी स्वतःशीं म्हणालों, ' पहा, सगळ्यांनीं कंडम ठरवलेला हा मुलगा–याला मी एकटाच जरा सांभाळून घेत होतों, त्याचं फळ आतां मला मिळणार, प्रेमबिम असल्या गोष्टी करायला लागला–म्हणजे हा लवकरच माणसांत येणार—जर याचं ह्या त्या पोरीशीं लग्न झालं तर एकादे वेळीं हा चांगलाच मार्गावर येईल—आणि मला ह्याचं श्रेय मिळेल ! ' ( इतपत उच्च स्वार्थाचाही भाग माझ्या त्या विचारसरणींत होता ) मी मोठ्या सहानुभूतीनं त्याचं म्हणणं ऐकून घेतलं, व त्याचं सांगणं पुरं व्हायच्या आंत ठरवूनही टाकलं कीं, प्रीतिविवाह या एकाच मात्रेनं या अर्धमेल्या जीवाला बचावणें शक्य आहे, व आपल्याकडून होईल तें करून हा म्हणतो तें लग्न जमवून दिलंच पाहिजे.

अन्यानं तपशील असा दिला कीं, त्याच्या इन्स्टिटयूटसमोर एक पोलीसस्टेशन आहे; त्यांत तुरम्भे नांवाचा एक सब-इन्स्पेक्टर रहातो. त्याच्या घरीं त्याची एक चुलत बहीण आहे, ती रोज अकराला व पांचाला शाळेंत जातांयेतां याला भेटते. तिला आई नाहीं, बाप आहे. तो कुरल्यास ' दुर्वास क्लब ' नांवाची खाणावळ चालवतो–पण त्याची याला पर्वा नाहीं, याचं त्या पोरीवर प्रेम आहे, इतकं कीं तिनं नुसतं पाहिलं तरी याला घाम फुटतो–तिचंही याच्यावर प्रेम आहे असं याला अगदीं नक्की वाटतं. कांहीं झालं तरी हा तिच्याशींच लग्न करणार, तें न झालं तर याला कुठलीही परीक्षा पास होणं शक्य नाहीं–वगैरे वगैरे.

आपली सर्व आशा माझ्या सहाय्यावर उभारल्याचं त्यानं मला सांगितलंन्, आणि मीं जर एवढ्या या बाबतींत त्याचं हें काम करून दिलं तर तो एकदम सुधारून मीं व त्याचे वडील सांगतील त्याप्रमाणं नेहमीं वागायला तयार होता.

मीं मनांत जरी त्याचं काम करायचं ठरवलं तरी त्याला नुसतं 'पहातों' असं सांगून मुंबईस परत पाठवून दिला व 'कळवीन' असं मोघम आश्वासन देऊन ठेवलं. तो गेल्यानंतर दुसऱ्या दिवशीं मीं त्याच्या बापाला—म्हणजे सदूभाऊला पत्र लिहून नुसती कल्पना दिली कीं, अनिलच्या लग्नासाठीं मीं एक मुलगी पहात आहे—जमण्यासारखं दिसल्यास कळवीन, तुम्हीं मोडता घालूं नये. नंतर मी मुंबईला गेलों. रस्त्यांत शाळेच्या वेळेला अन्यानं मला ती मुलगी दाखविली. (बरी आहे मुलगी) मग मीं सब-इन्स्पेक्टर तुरुम्भे यांना भेटलों. मोठा सालस मनुष्य. त्यानं सांगितलं कीं, मुलीचं लग्न करायचं कां नाहीं हें तिच्या वडिलानांच मीं विचारावं हें बरं. त्यावरून मीं कुरल्याला जाऊन त्या दुर्वास क्लबाच्या मॅनेजरची गांठ घेतली. मीं त्याला सांगितलं कीं, 'मी अमूक अमूक कॉलेजमध्यें प्रोफेसर आहे; असा असा एक चांगला मुलगा माझ्या ओळखीचा आहे. त्याचा बाप गोकाकला एंजिनीअर आहे, तीनशें रुपये पगार आहे, तुमची मुलगी आम्ही पाहिली, आम्हाला पसंत आहे, तर देतां कां?'

आतां नंतर विचार करतां मला वाटूं लागलं आहे कीं, इतक्या प्रांजलपणें बोलण्यांत मीं चूक केली. एका सुखवस्तु पोराच्या वतीनं एक प्रोफेसर कुरल्याला हॉटेल मॅनेजरच्या मुलीला मागणी घालण्यास

येतो, या घटनेनं त्या तात्याबा तुरंभे नांवाच्या माणसाला भलताच भाव आला. ‘ विचार करून सांगेन, पुन्हां भेटा ’ म्हणून तो कुर्र्यानें मला म्हणाला. मीही वेळ पाहून जास्त कांहीं न बोलतां त्याला नमस्कार करून निघून आलों, व दुसऱ्या कांहीं ओळखी काढून तात्याबा तुरंभ्याला आमची योजना पटविण्याचा उद्योग सुरू केला. माझी खटपट अशी होती कीं, शिष्टाचाराप्रमाणं त्यानं आपली मुलगी पहाण्यास अन्याच्या वडिलांस विनंती करावी व नंतर आम्हीं तिला पसंत करून मग रीतसर लग्न व्हावं—कारण आमचा सदूभाऊ आहे जरा जुन्या वळणाचा. मुलीच्या बाजूनं आधीं विचारलं पाहिजे हा त्याचा कटाक्ष त्यानं मला स्पष्ट कळवला होता.

हें सारं प्रकरण शिजत लावून मीं पुण्यास आलों. पंधरा एक दिवसांनीं मला अन्याचंच पत्र आलं कीं, तात्याबा तुरंभ्यानीं तुम्हांला भेटायला बोलावलं आहे. दोनच दिवसांनीं आमची सेनेटची मीटिंग होती, तेव्हां त्या खेपेला मुंबईस जरा अगोदरच जाऊन मीं त्या कुल्र्याच्या खाणावळवाल्याला भेटलों. ‘ तुम्हांला दोनच गोष्टी विचारणार आहे मीं,’ तात्याबा गंभीरपणें मला म्हणाला, ‘ एक, म्हणजे तुमचा हा मुलगा विशवासुक किंवा ‘ रिलाबल ’ आहे कीं नाहीं ? ’ मी ताबडतोब ‘ हो ’ म्हणालों—( कारण लग्नाचा मामला होता ) ‘ आणि दुसरी गोष्ट म्हणजे त्याचे वडील मुलाला घर देण्यास तयार आहेत कीं नाहीं ? ’ याही प्रश्नाला मी होकार दिला ( घर म्हणजे स्वतंत्र संसार असा अर्थ घेऊन ). ‘ मग येऊं द्या मुलाच्या बापाला मुलगी पहायला ’ तात्याबा म्हणाले व मीं ताबडतोब गोकाकला सदूभाऊकडे तार दिली.

दुसऱ्या दिवशीं युनिव्हर्सिटींत आमची एक एक्झॅमिनर्स मीटिंग

होती, त्यामुळं त्या संध्याकाळीं ठरलेल्या मुलगी पहाण्याच्या कार्यक्रमाला मला हजर रहतां आलं नाहीं. तथापि असं ठरलं होतं कीं, लालबागच्या अनिलच्या खोलींत प्रथम तात्याबांनीं सदूभाऊला भेटायचं व मग सर्वांनीं मिळून माटुंग्याला मुलगी पहायला जायचं—पैकीं पहिल्या कार्यक्रमाचं काय झालं तें मला तात्याबांनीं मीटिंगनंतर युनिव्हर्सिटीच्या फाटकांत गांठूनच सांगितलं—सुदैवानें आजूबाजूला फारसे कोणी लोक नव्हते म्हणून बरं, नाहीं तर महाचमत्कारिक वेळ आली होती. मी मीटिंग झाल्यावर टी. ए. बिल वटावून घेऊन बाहेर पडत होतों इतक्यांत तो खाणावळवाला तिरिमिरीनें माझ्याजवळ आला नि म्हणाला, ‘ कांहो डाकू प्रोफेसर, थापा देतां काय ? तुम्हाला वाटलं मीं आपला एक गांवठी खाणावळवाला आहे, मी फसेन; पण मीही बारा गांवचं पाणी प्यायलों आहे, माहीत आहे ? ’ ‘ अहो, पण झालं काय ? ’ ‘ मुलगा रिलाबल आहे म्हणालांत—त्याचा बाप घर देईल म्हणालांत—सारं सारं खोटं !—खेचूं कां या शेजारच्या हायकोर्टांत तुम्हांला ? मोठे आले आहेत प्रोफेसर—अरे वारे डाकू ! बरं झालं, माझी मुलगी शहाणी, म्हणून सांपडलों नाहीं तुमच्या कटांत ! ’

मला कांहींच कळेना; मोठ्या मुष्किलीनें त्याला शान्त करून काय झालें तें मी त्याच्याकडून काढून घेतलं. या अन्यानं मला नकळत एक वेगळाच प्रकार केला होता: तात्याबाला सांगितलं होतन् वाटतं, कीं आपण फर्स्टक्लास एम्. एस. सी. आहोंत, आपला बाप कर्नाटकांत एक बडा जहागिरदार आहे, नी लग्न झाल्यावर आपल्याला वेगळा बंगला देणार आहे ! तात्याबा नि सदूभाऊ समोरासमोर आल्यावर अर्थातच हें सारं उघडकीस आलं; पण सदूभाऊंनीं खरी गोष्ट

सांगितल्यावर त्यांच्या चांगुलपणाचा तात्याबावर थोडासा परिणाम झाला व आधीं ठरल्याप्रमाणें त्रिवर्ग मुलगी पहायला गेले.

या वेळपर्यंत ताश्याबाला परस्पर थापा देण्याबद्दलसुद्धां अन्याला माफ करायला मीं तयार होतों; पण नंतरचा प्रकार ऐकल्यानंतर माझं डोकं फिरून गेलं—हे लोक मोठे मुलगी पहायला म्हणून गेले, पण मुलगीच घरांत नव्हती; कांहीं वेळानें ती आली तेव्हां बाहेरच आली नाही, आणि अखेर शेवटीं आंतून तिनं साफ सांगितलं कीं, मला लग्नच करायचं नाहीं !

ज्या पोरीवर हा अन्या प्रेम करीत होता तिला त्याबद्दल काडीइतकी कल्पना नव्हती ! ज्या अन्याचा बाप कमीपणा घेऊन मागणी घातल्यासारखा तिला पहायला आला त्या अन्याची तिला ओळखही नव्हती ! जी अन्याला मिळावी म्हणून मी त्या खाणावळवाल्याच्या आर्जवा केल्या ती लग्नच करीत नव्हती !

नशीब, मीं तिथं नव्हतों—पण तिथं माझी जी शोभा झाली असती त्यांतील निम्मी तात्याबानं केलीच, बाकीची अर्धी सदूभाऊंनं माझ्या मुक्कामीं एक पत्र ठेवून केली ( त्याच रात्रीं तो गोकाकला निघून गेला. ) त्याच्या पत्रांत एकच ओळ होती कीं, ' अन्याला तुझी अक्कल येईल अशी आशा मला कधींच नव्हती, पण अन्याची अक्कल तुझ्यांत उतरली कीं काय अशी धास्ती मात्र आतां वाटायला लागली आहे. '

या सगळ्या सांचलेल्या कारणामुळेच मी कालचा दिवस मुद्दाम मुंबईस राहिलों. लालबागच्या त्या चाळींत जाऊन त्या मूर्खाला शोधून काढला नी त्याला योग्य ती शिक्षा दिली—आतां मला बरंच हलकं

वाटत आहे. ह्या हकीकतीचं तात्पर्य म्हणून मीं तुम्हांला सांगतों कीं, मूर्खांच्या मदतीला कधीं धांवूं नका. परोपकारासाठीं हात फुरफुरतील तेव्हां लक्षांत ठेवा कीं, तुमचाही अवसानघात एकादा अन्या केव्हां करून जाईल याचा नेम नाहीं. पाठपुरावा करायला जातां तोंडघशीं पडण्याची पाळी येईल...

प्रोफेसरांचा मूळचा क्रोध मावळून त्यांच्या मुद्रेवर प्राध्यापकाला शोभेल असें खिन्न गांभीर्य आलें होतें, चांगुलपणानें उघडलेल्या तोंडावर फटका बसावा अशी त्यांची मुद्रा झाली होती; त्यांनीं आपला चष्मा पुसला व आनुवंशिक विषमतेबद्दलच्या ग्रंथांत डोकें खुपसलें.

---

# गुन्हा व सजा १९

आतां त्या शाळेची इमारत सार्वजनिक सेवेच्या धंद्यांत पडली आहे; तिच्या चौकांत शंभर एक वर्षें खेळलेल्या पोरांखेरीज कोणाला ती ओळखूं देखील येणार नाहीं. तिच्या नवीन धन्यानें तिची जी विटंबना केली आहे,–तिच्या नाकांत जो घड्याळाचा बाल अडकविलेला आहे, तिच्या खचणाऱ्या कमरेला आधार देण्यास पोलादी काम्बट्यांचें जें जाकीट तिला दिलें आहे, ज्या भेसूर रंगांनीं तिला नटविली आहे, त्या विटम्बनेचें वर्णन करावें तेवढें थोडेंच. पाठशाळेची नाटकशाळा डोळ्यादेखत झाल्याचें पाहून कोणाला खेद होणार नाहीं? असा म्हातारपणीं जिच्या मुड्याचा जाहीर लिलांव झाला, त्या एका शाळेची जुनी गोष्ट आहे ही. ही गोष्ट घडली त्या वेळचे हेडमास्तरही आतां ते राहिले नाहींत. 'पोरांची जातच डांबीस' हें सूत्र डोळ्यापुढें ठेवून त्यांनीं तेव्हां छडीनें हेडमास्तरकी गाजवली खरी; पण आज ते अगदीं एक सौम्य व प्रेमळ वृद्ध गृहस्थ झाले आहेत. ज्या पोरांना त्यांनीं नेम धरून पिटलें होतें तींच पोरें आज भेटलीं तर म्हाताऱ्याच्या डोळ्यांना टचकन् पाणी येतें. तीच गोष्ट तेव्हांच्या बदमाश शिपायाची आणि लुडबुड्या ड्रॉइंग–मास्तरची; दोघे बिचारे गाय झाले आहेत. एक दोन काठ्या घेऊन

चालतो, व दुसरा दोन चष्मे एकदम लावतो. त्यावेळचीं पोरें—आज तींच गांवांतल्या रस्त्यांतून आजच्या पोषाखांत जातांना दिसतात. दहा–बारा,—जास्तींत जास्त पंधरा वर्षांच्या आंतले सारे जण होते हे तेव्हां.

दहा मिनिटांच्या सुट्टींत पैशाचा लांकडी चेंडू, कौलाचें खापर किंवा वेळप्रसंगीं एकादी दौतही घेऊन मागच्या चौकांत चुरशीचे फुटबॉल सामने होत असत. ‘ सेकण्ड सी ’च्या गुण्डांशीं ‘ थर्ड ए ’च्या काडीजवान पण बेछूट टीमची होणारी झुंज त्यांतल्या त्यांत विशेष तेढीची असे. चौकाच्या मधून गेलेल्या पन्हळीमुळें विभागलेल्या क्षेत्रांत पंधरावीसांच्या दोन टोळ्या समोरासमोर यावयाच्या; वाटेल त्याला खेळांत सामील होण्याची मुभा असे, पण वरील दोन वर्गांना उल्हास जास्त असल्यामुळें नेहमीं त्यांतील मुलांचेच दोन पक्ष बनत होते. खेळांत सामील होणाऱ्या लहान पोरांचा उत्साह अगदीं खऱ्या खेळाडूंचा असे; तर मोठमोठे अरबूज मुलगे खेळापेक्षां केवळ लहान पोरांना चाटा मारून पाडण्याच्याच हेतूनें सामन्यांत सामील होत होते. दोन खांबांतल्या जोत्याला चेण्डू लागला कीं ‘ गोल, ’ ही ढोबळ व्याख्या ठरल्यामुळें वाद पुष्कळ वेळां उत्पन्न होत असत. त्याचप्रमाणें खाजगी वैराचें उट्टें काढण्यास हें खुलें मैदान फारच उपयोगी पडत असे. तशांत टांग मारून पाडलेल्या पोरांचीं पाडणाऱ्या पोरांना आव्हानें—अशा सर्व तयारीमुळें दहा मिनिटांच्या सुट्टींत मागचा चौक कुरुक्षेत्राचेंच रूप घ्यायचा. खरचटलेलीं कोपरें, रक्तबंबाळ गुडघे, फाटलेले कपडे आणि तापलेले चेहरे यांना तेथें वाण नव्हती. दहा मिनिटें हा गोंधळ चालू असेपर्यंत शिस्तीचे भोक्ते या बाजूस जरा दुर्लक्षच करायचे. नाहीं म्हणायला तो ‘ कोल्हा ’ ड्राइंगमास्तर मात्र, ‘ हेडमास्तरांच्या कानावर

घालण्यासारखें कांहीं दिसतें आहे का, ' हें पहात एकादेवेळीं इलकेच इकडे फिरकून जायचा; आणि तो हरामखोर शिपाई, ' पोरें शाळेच्या सामानाची नासधूस करतात, ' अशी चहाडी करण्यास निमित्त शोधीत कधीं डोकावून जायचा. दहा मिनिटांची सुटी संपल्याची घंटा झाली कीं, युध्यमान पक्ष आपलीं पाणीविषयक कामें घाईघाईनें उरकून वर्गांत परत येत. मधल्या सुटींत पुन्हा लढा जुंपत नसे. कारण त्या वेळेला लागणाऱ्या भुका शान्त करण्याकडेच सगळ्यांचें लक्ष असे. दहा मिनिटांची सुटी हीच फुटबॉलची सुटी असें वहिवाटीनें ठरलें होतें.

आज ती सुटी संपल्याची घंटा होतांच, नित्याप्रमाणें खेळ बंद करून खेळाडू ' देहधर्मशाळे ' कडे धांवले.. मुलांच्या नकळत आज त्या बाजूला तो डोमकावळा ड्रॉइंगमास्तर आला होता, आणि तो डांबिस शिपाईही त्या बाजूनें शाळेच्या मागच्या दारानें परत येत होता. ' एखादा भयंकर गुन्हा करतांना कारटीं सांपडावींत ' ही दोघांचीहि कायम मनीषा होती. आज ती अचानकपणें पुरी झाली; शाळेच्या मुतारी पलीकडेच सरहद्दीची एक जुनी भिंत होती—इतकी जुनी कीं, तिच्या विटांच्या मधली माती झडूनझडून विटा तेवढ्या एखाद्या माणसाच्या पुढें आलेल्या दांतांसारख्या बाहेर दिसूं लागल्या होत्या. लघुशंकेकरतां येणारीं पोरें जातांजातां एक पुण्यकार्य म्हणून, भिंतीच्या दोन विटांच्या मध्यें बोट घालून रोज थोडी माती पाडीत; आज एका मुलाला या संथ प्रगतीचा कंटाळा आला; जातांजातां त्यानें बोटानें विटेभोंवतालची थोडीशी माती कोरण्याऐवजीं एक पुढें आलेली वीटच हिसका देऊन ओढली.—क्षणार्धांत त्या भिंतीला एक भगदाड पडलें ! त्याच्या खोडीचा तो भयानक परिणाम पाहून जवळपासचीं धूर्त पोरें पळालींच ! कांहीं

त्या विध्वंसक पोराला त्याच्या अपराधाची जाणीव करून देण्यासाठीं खोळंबलीं; व तो वीट ओढणाराही स्वतःच्या भयंकर कृत्याकडे पहात क्षणभर हतबुद्ध होऊन तेथेंच उभा राहिला—आणि हें सगळें त्या लुडबुड्या ड्रॉइंगमास्तरनें आणि त्या चहाडखोर शिपुर्ड्यानें पाहिलें.

पळणारीं कांहीं पोरें या दोघां फुकट फौजदारांनीं अडविलीं, मुख्य गुन्हे-गारास गिरफदार केलें आणि टिपू सुलतानच्या ओलीस ठेवलेल्या मुलांना घेऊन येणाऱ्या इंग्रज अम्मलदाराच्या ऐटींत, ड्रॉइंगमास्तर व तो शिपाई निघाले. प्रथम कैद केलेल्या तीनचार मुलांना त्यांचे वर्ग विचारून त्या त्या वर्गांत त्यांना नेण्यांत आलें, व त्यांचे कबुलीजबाब खरे असल्याची खातरजमा झाल्यानंतर, त्यांना क्लासमास्तराच्या जामिनावर वर्गांत बसूं देण्यांत आलें, बहुतेक पोरें तिसरी अ ऊर्फ 'थर्ड ए' चीं होतीं. त्यानंतर ड्रॉइंगमास्तर आपल्या ड्रॉइंग हॉलमध्यें पार्टिशनआड गेले; टोपी काढून ठेवून त्यांनीं रुमाल बांधला व हेडमास्तरांकडे (दाराबाहेर जोडे ठेवून) जाऊन, त्यांच्या कानावर आपण पकडलेल्या गुन्ह्याची बातमी त्यांनीं विजयी मुद्रेनें घातली. हेडमास्तरांनाही रिकामपण होतें; बरेच दिवसांत पोरांना चोप द्यावयाला त्यांना कांहीं निमित्त मिळालें नव्हतें. तशांत ड्रॉइंगमास्तर त्यांना गुन्ह्याचें गांभीर्य इतक्या आकसानें वर्णन करून सांगत होता कीं, जणूं काय याच्या बापाच्या वखारींत चोरी करणारे लोकच यानें पकडले आहेत.

"आणि त्या भिंतीपलीकडे मुलींची शाळा! परवांच त्यांची तक्रार आल्याचें आपण सांगत होतांत—"

गोष्ट खरीच तशी झाली होती. या शाळेच्या वरच्या मजल्यावरील

वर्गातून भिंतीपलीकडचें बायकांच्या शाळेचें अंगण व ती इमारत दिसत असे. कांहीं कांहीं वयस्क व मिशाळ पोरांनी या बाजूनें आपलें स्वप्नरंजन व इच्छापूर्ति ओरडून व्यक्त केल्यामुळें तिकडच्या अधि-कारणींनीं इकडे तक्रार केली होती, व त्यामुळें हेडमास्तरांनीं खिडक्या बुजवून मुलांमधील स्वतःविषयींची अप्रीति अधिक तीव्र केली होती. तरीही उरलेल्या दोनतीन झरोक्यांतून पलीकडच्या स्त्रियांना उद्देशून कांहीं मूर्ख पोरें खांकरत असतच. हें सर्व लक्षांत आणून हेडमास्तर ड्रॉइंगमास्तरबरोबर छडी घेऊन ' थर्ड ए ' कडे निघाले (तो शिपाई पुढें निघाला.)

एव्हांना बिनतारी संदेश पद्धतीनें शाळेभर बातमी फैलावली होती कीं, ' थर्ड ए' च्या कांहीं कारट्यांची नांवें ड्रॉइंगमास्तरनें हेडमास्तरांकडे नेलीं व तो ब्रह्मराक्षस (मुलांनींच दिलेलें नांव) आतां कांहींतरी करणार. वरवर जरी सगळ्या वर्गांतून धडे चालले होते तरी विद्यार्थ्यां-मधील कुजबूज सांगत होती कीं, ' आज कांहीं तरी होणार आहे ! ' पुढल्या चौकांतून मागच्या चौकांत जाणाऱ्या वाटेकडे सगळ्यांचे डोळ लागले होते—आणि शिपाई, ड्रॉ. मास्तर—हेडमास्तर ही मिरवणूक त्या वाटेनें जाऊं लागली तेव्हां तर पाठाकडचें लक्ष उघडउघड सोडून पोरें तिकडे पाहूं लागलीं; पहिली—दुसरींतलीं कांहीं कांहीं पोरटीं तर वर्ग सोडून घाईघाईनें बाहेरच आलीं—त्याबद्दल त्यांना ताबडतोब योग्य त्या शिक्षाही झाल्या. ' थर्ड ए ' मध्यें फारच धास्तीचें वातावरण पसरलें होतें; वर्गाचे सौम्य मास्तर संशयित आरोपींकडे ' काय रे केलंत बाबांनो ? ' या मुद्रेनें पाहात होते. त्या वर्गातलीं उडाणटप्पू व तगडीं मुलें आरोपीच्या भीतींत अधिकच भर घालीत होतीं. ' मेलांत लेको

आतां ! सांगितले कोणी हे उद्योग ?' 'आतां शाळेंतून हकालपट्टी !' असें पुटपुटत तीनतीन वर्षे तिसरींत राहिलेलीं मुलें आधींच गळाठलेल्या आरोपींना आणखी घाबरवून सोडीत होतीं, त्या हवालदील जीवांना कांहीं मोठमोठे टोणगे विद्यार्थी मास्तरांची नजर चुकवून टप्पूही लगावीत होते—बिचाऱ्या आरोपींना प्रतिकाराचें त्राणच उरलें नव्हतें.

'हेडमास्तर आणि मंडळी' 'थर्ड ए' मध्यें आली; हायकोर्ट जज्जानें तालुक्याच्या मुन्सफ कोर्टांत येऊन बसावें त्याप्रमाणें हेडमास्तर मास्तरांच्या खुर्चीवर बसले. मास्तर उठून एका कोंपऱ्यांत उभे राहिले. ड्रॉइंग—मास्तर दारापाशीं उभे राहून मारक्या बैलाच्या नजरेनें पोरांकडे पाहूं लागला, व शिपाई बाहेर उभा राहून दिसतील त्या आंतल्या पोरांवर मधूनमधून डोळे वटारूं लागला. आरोपींचीं नांवें वाचण्यांत आलीं. नांवांचे धनी चळचळां कांपत उभे राहिले. वीट हिसकावून बाहेर काढणारा मुख्य आरोपी जसा उभा राहिला तसा ड्रॉ. मास्तर हेडमास्तरांजवळ जाऊन कुजबुजला, "हाच, हाच रिंगलीडर साऱ्यांचा—"

"आणखी कोण होते रे ?" हेडमास्तरांनीं मुख्य आरोपीस दरडावून विचारलें. त्यानें तेवढ्यांत प्रसंगावधान राखून आपल्या मुख्य शत्रूंचीं नांवें सांगितलीं. त्या पोरांना उभें राहण्यास सांगतांच त्यांतले कांहीं कुरकुरूं लागले, पण छड्या व दरडावण्या देऊन सगळ्यांच्या कुरकुरी हेडमास्तरांनीं बंद केल्या. या फौजदारी चौकशीमुळें आरोपींची संख्या तिनापासून सातापर्यंत वाढली. 'हे नवीन चोर आपल्या नजरेंतून कसे निसटले,' या चिडीनें ड्रॉ. मास्तरांचा सारा रोष त्यांच्याकडे वळला. पुढील चौकशीसाठीं या सातही आरोपींना घेऊन हेडमास्तर

आपल्या खास कचेरीकडे निघाले. या वेळीं मिरवणुकीचा क्रम यणेंप्रमाणें होता,—

हेडमास्तर—

ड्रॉइंग मास्तर—

आरोपी नंतर एक ते सात—

शिपाई—

स्वतः सुरक्षित असतांना दुर्दैवाच्या फेऱ्यांत सांपडलेल्या दुसऱ्या जीवांना पहाण्यांत जी गम्मत वाटते ती वाटेवरच्या वर्गातलीं मुलें अनुभवीत होतीं. मिरवणूक पुरेशी पुढें गेल्यावर जो गलबला एकदम सुरू झाला तो शांत करण्यासाठीं कित्येक फाजिल उत्साही विद्यार्थ्यांना जागेवर, बांकावर व वर्गाबाहेर उभें करणें त्यांच्या वर्गावरील मास्तरांना भाग पडलें. तथापि ‘ सातजणांना हेडमास्तरांच्या ऑफिसांत नेलें आहे, ’ ही गोष्टच इतकी कोलाहलजन्य होती कीं, ‘ पुढें काय होतें ’ ही उत्कंठा शाळेभर खदखदत होती. मास्तरांना देखील तिची थोडीशी बाधा झाली. त्यावेळीं चाललेले धडे ( गणिताच्या तासांखेरीज ) अगदींच नांवापुरते होत होते.

काशी नगरींत ब्रह्मदत्त राजा राज्य करीत असतां एका माणसानें अंगावर येणाऱ्या गाईला सहज ‘ हैक ! ’ म्हटलें, त्याबरोबर त्या गाईनें वड्याचें तेल वांग्यावर या न्यायानें पलीकडून जाणाऱ्या एका निरुपद्रवी ब्राह्मणास हुंदाडलें; तो ब्राह्मण जाया होऊन लवकरच निजधामास गेला व राजपुरुषांनीं ‘ हैक ’ म्हणणाऱ्या इसमास राजापुढें नेलें. काशींतल्या एका घोर ब्रह्महत्येची ब्रह्मदत्त राजा जातीनें चौकशी करूं लागल्यावर

त्या बिचाऱ्या आरोपिताची जी स्थिति झाली असेल, ती आज हेडमास्तरांच्या ऑफिसांत उभ्या असलेल्या पोरांची होती. हेडमास्तर ( व ड्रॉ. मास्तर ) यांच्या वेड्यावांकड्या प्रश्नांनीं तीं पोरें भेदरूनच गेलीं होतीं.

आपल्या हातून कांहींतरी भयंकर गुन्हा झाला असला पाहिजे असें प्रत्येकाला वाटत होतें. इन्या त्या गुन्ह्याला सपशेल कबुली देण्याची सर्वांची तयारी होती. कांहीं दैवावर भिस्त ठेवून हैराण चेहऱ्यानें उभे होते, व कांहींचा धीर सुटून ते रडत होते. दोन्ही प्रकारच्या आरोपींना ड्रॉ. मास्तर मधूनमधून दम देत होता. अखेर मधल्या सुटीच्या सुमाराला चौकशी संपली. हेडमास्तरांनीं शिपायाला ‘ सभेचे ठोके ’ देण्यास सांगितलें, व तो मोठ्या उत्साहानें तिकडे रवाना झाला. ‘ सभेचे ठोके ’ हे शब्द ऐकून आरोपींचा उरलासुरला धीरही खचून गेला. ( घण्टेचे अमूक इतके ठोके दिले म्हणजे सर्व शाळेनें मोठ्या चौकांत सभेसाठीं जमावयाचें असा नियम होता. ) ‘ आपल्याला बहुतेक जाहीर रीतीनें सबंध शाळेसमोर हद्दपार करणार का फांशी देणार कोण जाणे, ’ असें आरोपींना वाटूं लागलें.

सभेनंतर सुटी हा शिरस्ता असल्यामुळें खूप पोरांचे तांडेच्या तांडे मधल्या चौकांत जमा होऊं लागले. आजच्या सभेचें कारण कांहींतरी फौजदारी खटलें आहे अशी कुणकुण सर्वांना होतीच. त्यामुळें आजच्या सभेला अभूतपूर्व महत्व होतें. पांचवी-सहावी-सातवीतलीं पोरें देखील आपला फाजील शिष्टपणा विसरून ‘ आ ’ करून वाट पहात होतीं. लवकरच शिक्षकवर्ग आला. मागोमाग हेडमास्तर आले व त्यांच्या पाठोपाठ

ड्रॉइंग मास्तर (एंजिन) व शिपाई (गार्डाचा डबा) यांच्यामध्यें गुन्हेगारांची मालिका व्यासपीठावर आली. सभेंतली स्तब्धता वाखाणण्यासारखी होती. ड्रॉइंग मास्तर हेडमास्तरांच्या पायांजवळ बसला. शिपाई कोंपऱ्यांत सचिंत चेहरा करून उभा राहिला, व हेडमास्तर भाषण करण्यास उठले.

" बरेच दिवस या शाळेची शिस्त समाधानकारक नाहीं असें मला दिसून येत होतें. वेळोवेळीं शिस्त मोडणाऱ्या मुलांना मी शिक्षा देऊन बंदोबस्त करीतच होतों; पण कांहीं कांहीं मुलांबद्दल पुनःपुनः माझ्या कानावर तक्रारी येत होत्या. शाळेच्या शिस्तींत बिघाड आणणाऱ्या विद्यार्थ्यांना एकदां कांहींतरी अद्दल घडण्यासारखी शिक्षा करून त्यांचें उदाहरण सर्वांच्या डोळ्यासमोर ठेवलेंच पाहिजे असें मीं ठरवलें होतें.

" आज ड्रॉ. मास्तरांच्या दक्षतेमुळें एक भयंकर स्वरूपाचा गुन्हा सांपडला आहे. तुमच्यासमोर हीं जीं मुलें उभीं आहेत तीं सामान्य खोड्या करतांना सांपडलीं आहेत असें समजूं नका. तुम्हांला ठाऊकच आहे कीं, आपल्या शेजारीं एक मुलींची शाळा आहे. ( श्रोतृवर्गांत दाबलेला पोरकट हंशा. ड्रॉ. मास्तर त्या बाजूस चष्म्यावरून पहातो. ) त्या शाळेच्या आणि आपल्यामध्यें जी भिंत आहे, ती फोडून पलीकडे जाण्याचा प्रयत्न या विद्यार्थ्यांनीं चालविला असतां ते सांपडले आहेत–( सभेंत 'सेन्सेशन.' कारण आरोपी दहा ते तेरा चौदा या वयाच्या दरम्यानचे आहेत. )

" पोलिसांकडे हें प्रकरण गेलें असतें तर हीं मुलें खडी फोडायलाच जायचीं; या वयांत हे धंदे, तर पुढें हीं काय करतील याची मला

कल्पनाच करवत नाहीं. कितीही मोठी शिक्षा केली तरी ती यांना थोडीच होणार आहे; मीं यांना हांकूनच देणार होतों; पण आपल्या फर्स्ट असिस्टंट मास्तरांनीं यांना दया दाखवावी म्हणून रदबदली केल्यामुळें, यांना फक्त प्रत्येकीं दोन छडया तुमच्यासमक्ष मारून नुसत्या इशाऱ्यावर सोडून देण्यांत येत आहे."

फर्स्ट असिस्टंट मास्तर दयाळू होते. त्यांनीं सातही आरोपींना हलक्या हातानें दोनदोन छड्या दिल्या. ( हा 'चान्स' मिळण्यासाठीं ड्रॉ. मास्तर पुढें सरसावत होता; पण त्याचें कांहीं चाललें नाहीं. ) नंतर मुलांकडे वळून 'आज बाकीचा अर्धा दिवस सुट्टी' असल्याचें जाहीर केलें, मुलें उड्या मारीत निघून गेलीं. मास्तर आपापसांत बोलत चालूं लागले. मोठा चौक रिकामा पडला. सात आरोपी मात्र अपमानानें ओक्साबोक्शीं रडत, शेजारच्या एका वर्गांत आंगें टाकून बसले होते. 'गुन्हा झाला खरा, पण निदान फांशी किंवा जन्मठेप होईल,' अशी लोकोत्तरत्वाची आशा करणाऱ्या आरोपीला कुल्यावर दोन छड्या मारून सोडल्यास त्याला जी नामुष्की वाटेल ती या सातजणांना वाटत होती.

"दोन छड्या!" एक आवाज मुसमुसला.

"यापेक्षां ठार मारलं असतं तर बरं झालं असतं"—हुंदके.

"निदान शाळेंतून हांकून तरी देतील असं वाटलं होतं"—मोठा सूर.

"पांचदहा रुपये दंड तरी–" सर्वसाधारण रडारड.

"बस करा! आतां बसले रडत. करतांना नाहीं शरम वाटली कांहीं?–इकती वांड कारटीं नव्हतीं पाहिलीं कधीं–भींत फोडत्यात!

आतां कां मुळुमुळु रडतां पोरींच्या वाणी? चला हुटा हिथून! मला बन्द करायचा है कलास–"

त्या हरामजाद्या शिपायानें येऊन दुखवट्याची ती सभाही मोडली.

त्यानन्तर चार महिन्यांनीं झालेल्या गॅदरिंगच्या प्रसंगीं, रात्रीं अंधाऱ्या जिन्यांत गांठून ड्रॉ. मास्तराचें धोतर त्याच्या अंगावरून सोडून कोणी पळविलें, व शाळेच्या त्या वाईट शिपायाला रात्रभर संडासांत कोणी कोंडून ठेविलें, तें आतां वाचकांच्या लक्षांत येईल.

## ‘ गार्डनटी ’ हट २०

लोणावळ्यासारख्या फॅशनेबल गांवांत, एका मैदानाच्या कडेनें जाणाऱ्या आडव्या रस्त्यावर आणि एका झाडाखालीं—साहजिकच ती झोंपडी मोठी टुमदार दिसत होती. बाहेर उघडयावर दोन तीन टेबलें ठेवलीं होतीं आणि वेताच्या खुर्च्या होत्या, आणि अशा या आजतागायत सरंजामावर एक लांबरुंद पाटी मराठींत निक्षून सांगत होती—‘ गार्डनटी हट ’. चहा मागतांना मालकाला मीं हंसून म्हटलें, ‘ इंग्रजी नांव मराठींत लिहिण्याची कल्पना मजेदार आहे तुमची. ’

तो ऐसपेस मापाचा पण - चपळ - चहावाला हांसला व चटकन् कुडाआड जाऊन कांहींतरी काम उरकून आला, बहुतेक माझ्या टोस्टला जरा जास्त लोणी लावायला सांगून आला तो. हाताला लागतील ते दोनचार वृत्तपत्रांचे नवेजुने इंग्रजी-मराठी अंक घेऊन तो परत माझ्या टेबलापाशीं आला.

“ त्या नांवांत खुबी आहे मोठी ” गलेलठ्ठ माणसाला न शोभणाऱ्या लाजरेपणानें तो सस्मित म्हणाला, ‘ म्हटलें तर ‘ गार्डन टी हट ’ म्हटलें तर ‘ गार्ड नटी हट् ’ ! ” स्वतःच्या विनोदानें खूष होऊन तो पोट धरधरून हांसूं लागला.

मला त्या माणसाची चीड आली.

“ हें पहा, ‘ तूं ना पास ’ असल्या प्रकारच्या खुब्या मराठी दुसरींतल्या कुणा मुलाला सांगा, पण इंग्रजी नांव मराठींत लिहून कुणाला कळणार आहे असं वाटतं तुम्हाला तें मला सांगा. ”

“ तेंच कोडं ठेवलं आहे ” तो विजयी मुद्रेनें म्हणाला, “ ‘ बागेंत चहाची कुटी ’ हा एक अर्थ, ‘ गार्ड आणि नटी यांची झोपडी ’ हा दुसरा अर्थ. ”

“ निरर्थक शुष्क आणि बाष्कळ युक्तीवाद नको, ” मी त्या चहावाल्याला बजावूं लागलों.

“ निरर्थक नाहीं अगदीं सार्थक आहे ! ” तो ओरडून म्हणाला, “ ही बागेंतलीं चहाकुटी आहे, पण त्याच्याही आधीं एका गार्ड व नटीची ही झोंपडी आहे, मी गार्ड ” तो छातीवर हात ठेवून परिणाम-कारक आवाजांत म्हणाला, “ आणि ही—”

तेवढ्यांत एक ठाकठीक हांसतमुख बाई चहाचा ट्रे घेऊन आली. तिचा चेहरा मला ओळखीचा वाटला, एकदम मला तिचें नांव आठवलें त्या नांवाची सारी मौज एकाच गोष्टींत होती राड्रीग्ज नांवाच्या किरिस्ताव डिरेक्टरनें तें तिला पडद्यावरचें नांव दिलें होतें—स्नग्धरा.

“ सगुणाबाई ? ” मीं आश्चर्यानें विचारिलें.

“ ही नटी. ” चहावाल्यानें आपलें भाषण पुरें केलें.

“ तुम्ही इकडे कुठें ? ” तिनें प्रेमळ अदबीनें विचारलें. कांहीं वर्षांपूर्वी एका फिल्म कंपनीच्या कचेरींत मीं काम करीत असतां सगुणा तेथें ‘ एक्स्ट्रा ’ होती.

" ही नटी कबूल, " मीं चहाकुटीच्या यजमानाला म्हटलें, " पण तुम्ही गार्ड म्हणजे या नटीवरचा पहारेकरी या अर्थानें कीं काय ? "

" या नटीला पहारेकरी लागत नाहीं, " सगुणा चहा ओतताना म्हणाली.

" तो तिला आतां कायमचा मिळाला आहे, " चहा मालकाच्या विस्तीर्ण देहयष्टीकडे पसंतीपूर्वक पहात मी म्हटलें.

" शिवाय मी खरोखरच रेलवेंत गार्ड होतों. "

तो मनुष्य चिकाटीनें म्हणाला. माझी व आपल्या पत्नीची ओळख निघाली हे पाहिल्यानंतर तर त्यानें मला आपली कहाणी ऐकवायचा निश्चयच केलेला दिसला. माझा चहा झोंपडींतल्या खाजगी टेबलावर नेण्यांत आला; सगुणाबाईनीं कपाटांतली खिसमिस केक कापायला काढली. दुपारीं दोनाला आडव्या रस्त्याच्या चहा–कुटीकडे किंवा त्या गार्ड आणि नटीच्या झोंपडयाकडे दुसरें कोणी फिरकणार नाहीं या विश्वासानें त्या चहावाल्यानें आपलें आख्यान सुरू केलें.

लोणावळा आणि कर्जत या स्टेशनांच्या दरम्यान घाटांतून मालगाडया खालींवर पोहोंचविण्याच्या कामावर मी होतों ( तो माजी गार्ड सांगूं लागला ). पहिल्यापहिल्यानें मी माझ्या दुपारच्या जेवणाचा डबा लोणावळ्याच्या एका खाणावळींतून भरून नेत असे. पण कर्जतला एक कसलासा मोठा कारखाना सुरू झाला, हजारों माणसें कामावर येऊं लागलीं, आणि त्यामुळें तिथें खाणावळी नी उपाहारगृहें पण बरीं-चशीं सुरू झालीं. त्यांतल्या त्यांत ' उडिपी राइस प्लेट हौस ' म्हणून हाटेल स्टेशन यार्डच्या अगदीं जवळ उघडलें होतें. नरसिंगराव म्हणून

त्याचा मालक होता, आणि सगी म्हणून एक बऱ्यापैकीं पोरगी तिथें वाढायला होती–लोणावळ्याहून डबा नेण्यापेक्षां नरसिंगरावच्या राइसप्लेट-मध्येंच जेवणें मला सोईचें वाटूं लागलें. कारण जेवणही बरें होतें आणि तिथें सगी होती. ”

मी भुंवया उंचावून सगुणेकडे पाहिलें.

“ एके ठिकाणीं सात महिन्याचा पगार बुडाला ” ती हांसून म्हणाली, “ त्या दादाटोन फिल्म कंपनींत--मरो मेला, तो काकाजी म्हणाला कीं रोकड खलास, शेट कडून तूं स्वतः जाऊन वसूल करून घे हवं तर. मी गेलें—शेटकडे नव्हे, आपल्या मामाकडे रडत गेलें, नी त्याला सांगितलं कीं मला कांही आधार नाहीं—मामा म्हणाला माझ्या दुकानांत काम कर, पोटाला मिळेल. त्याच्या परमादेवीच्या दुकानांत महिनाभर काम केलं. मग त्यानं कर्जतला दुकान काढलं तिकडे गेलें. ”

नरसिंहरावच सगीचा मामा, ( तिचा नवरा पुढें म्हणाला ) तो गल्ल्यावर बसायचा आणि गिऱ्हाइकाला सगी वाढायची. मी पहिल्याच दिवशीं तिला पाहिलं—नी ठरवलं कीं बस्स, जन्मभर खावं तें याच पोरीच्या हातांनीं वाढलेलं. बरोबरच आहे, मालगाडीच्या शेंपटीवर बसून घाट चढण्याउतरण्यांत जिणं वेंचणाऱ्या गार्डाला, एकदां केव्हांतरी फिल्म कंपनींचं पाणी पिऊन आलेली मुलगी ‘ डीरेल ’ करून टाकीत यांत नवल काय ? मीं दुपारचं जेवणच काय पण साधेल तितक्या वेळांत चहाही नरसिंगरावाकडे घेऊं लागलों लौकरच हिला मी सगुणा म्हणूं लागलों नी ही मला बाबुराव म्हणूं लागली.

" हे पण चांगले दिसायचे " सगुणा मध्येंच बोलली, "पांढरे स्वच्छ कपडे घातलेला असा धिप्पाड पुरुष तिथें पाहायला देखील मिळत नव्हता, सगळे यांना ' गार्ड साहेब ' म्हणायचे " ती अभिमानानें म्हणाली.

मीं गर्दीच्या वेळा टाळून नरसिंगरावाच्या ' राइस प्लेट ' मध्यें जात होतों. ( बाबुरावांनीं कथानकाचें सूत्र पुन्हां पकडून म्हटलें ) त्या ठिकाणीं होते नव्हते सारे जिन्नस खायची माझी तयारी होती फक्त सगुणेनं वाढलं तर. मीं तिथें फार वेळ काढतों हें नरसिंगरावाच्या लक्ष्यांत आलें नाहीं असें नाहीं, पण मीं रोख पैसे देऊन खात होतों आणि सगुणेचीही तक्रार नव्हती, एकंदरींत तुम्ही काय म्हणतां ती प्रगति चांगली होत होती.

पण हिच्यासारखी छोकरी काय कुणाच्या नजरेंतून सुटते आहे ? नरसिंगाच्या दुकानांतली बहुतेक गर्दी हिच्यासाठींच होते हें गांवभर झालं होतं. हिला पाहायला येणारे लोक नरसिंगरावाच्या गल्ल्यांत चांगलीच भर टाकीत होते. तरी पण ते सगळे कामाचे नी उद्योगाचे लोक होते, गर्दी नसल्यावेळीं मला कांहीं कोणाशीं चढाओढ करावी लागत नाहीं हें पाहून मीं खूष होतों. तितक्यांत—

तितक्यांत ' गार्डनटी हट ' समोर एक मोटर थांबली; सगुणाबाईंना गिऱ्हाइकाकडे पाहण्यास फर्मावून चहावाल्यानें आपली गोष्ट पुढें चालू केली.

एका अर्थीं ही गोष्ट सांगतांना ती बाहेर गेली हें बरेंच झालें ( तो म्हणाला ); आतां मला मोकळ्या मनानें सांगतां येईल. चढाओढ नाहीं असें मीं म्हणत होतों ना, पण तेवढ्यांत एक प्रतिस्पर्धी आलाच. डी. मंगेश म्हणून एकजण होता तो, माझ्यासारखेच पांढरे स्वच्छ कपडे,

पण खादीचे—धोतर, सदरा, जाकीट. माझ्यासारखाच तो आडवेळा जेवायला यायचा, आणि माझ्यासारखाच सगुणेशीं गप्पा करायचा. 'कॉंग्रेस प्रचार' म्हणून आपला धंदा त्यानें मोघमपणें सांगितला होता. सगुणा आम्हां दोघांशींही हांसतखेळत वागायची. हळूहळू मींहि त्याच्याशीं बोलायला लागलों.

एक दिवस कर्जतच्या स्टेशनावर तो मला भेटला.

"नरसिंगरावची राइसप्लेट तुम्हांला पसंत पडलेली दिसते?" मीं त्याला विचारलें, तो हांसला.

"ती माझी मैत्रिण आहे, आधींची," मीं त्याला सांगितलें.

"हें पहा गार्डसाहेब," तो म्हणाला, "मैत्रिणीला कोण मित्र आवडतो हें तिचं तीच ठरवील—केव्हांतरी, दरम्यान नरसिंगरावाकडेच जेवत राहायचा निश्चय आहे माझा. त्याची भाची वाढते किती नि मी खातों किती हें पाहातच राहा आतां!"

आणि त्यानंतर त्याची नि माझी खाण्याची शर्यत सुरू झाली. नरसिंगरावाच्या 'राइस प्लेट हाऊस'ची त्या दिवसांत जी तडाकेबंद विक्री चालली ती निम्मी आम्हां दोघांच्यामुळें. सगुणेला आपल्या टेबलाकडे जास्त वेळां आणावें म्हणून आम्हीं दोघांनींहि जेवण बंद करून किरकोळ पदार्थांवरच हात मारायला सुरुवात केली; डी. मंगेशानें चिवडयाच्या बरण्या खालीं केल्या नि मी बिस्किटांचे डबे रिकामे पाडले. त्याच्या इडलीच्या ऑर्डरीला मी दोशे मागवून तोड दिली, त्यानें उप्पमा खाल्ली तर मी मेसूराचें ठोकळे उठवूं लागलों, त्यानें दहिवडा मागवला तर मी भज्यांनी बचाव सुरू केला, शेव, गांठिया, कच्चे पोहे, मस्का

खारी नि नरम पाव त्या झगडयांत किती उडाले त्याला तर गणतीच नाहीं. नरसिंगरावानें चहाचा नवा बंब आणला, अर्धा डझन जुन्या खुर्च्या विकत घेतल्या, गांवीं मनिऑर्डर केली, नवी पाटी रंगवून घेतली, म्हैसूर महाराजाचा फोटो फ्रेम करून गल्ल्यामागें लावला आणि सगुणेला देखील एक चार रुपयाचं नवं पातळ घेतलं.

एक दिवस तें नेसून ती दुकानाबाहेर उभी होती. दुकानांत गर्दी नव्हती. नरसिंगराव गल्ल्यावर बसून घोरत होते. त्यांचा बारा वर्षांचा मुलगा सोनू एका जुन्या वर्तमानपत्रांतून कसलेसें चित्र कापून काढीत होता.

" नवं नेसल्यावर देवाला जाऊन यावं लागतं. " मी सगुणेला म्हणालों. ती हांसून म्हणाली कीं जाऊन आलें.

" आज व्हाइसरॉयची स्पेशल ट्रेन जायची आहे—येतेस पाहायला ? "

हो ना करतां करतां ती रेल्वे रस्त्याच्या कुंपणापर्यंत माझ्याबरोबर आली. आजुबाजूला कुणी नाहींसं पाहून मीं धीटपणें तिला विचारलें.

" सगुणे, माझ्याबद्दल तुला कांहींच वाटत नाहीं ? "

कांहीं वेळ तीं कांहींच बोलली नाहीं. मग एकदम म्हणाली,

" कुठल्याच पुरुषाबद्दल मला कांहीं वाटत नाहीं. रागावूं नका हं बाबूराव, पण मला पुरुष म्हणजे सारे बकासुर वाटतात, खाणारीं यंत्रं, पिठाची गिरणच चाललीय जशी. कुणाशीं लगीन करायचं म्हणजे जन्मभर त्या माणसासमोर बसून त्याच्या तोंडाची 'मचक् मचक्' पहायची असं वाटतं मला. पुरुष म्हटला म्हणजे सारखं रवंथ करीत बसलेलं एकाद गुरूं माझ्या डोळ्यापुढं उभं राहतं—खाणं, खाणं नी आणखी खाणं—सारखं खाणंच ! "

"पण पुरुष कांहीं चोवीस तास खातच बसत नाहींत—"

"मीं पाहिले ते सारखे खातच बसलेले पाहिले—नशीब तुम्हीं खातांना माझ्याशीं हें बोललां नाहींत—नाहीं तर मीं बोललेंच नसतें तुमच्याशीं."

"बायका खात नाहींत वाटतं?" मीं थोडं चिडून विचारलं.

"पुरुषांसारखं खात नाहींत—जाऊंद्या, दुसरं कांहीं बोलूं."

माझा डाव हुकला हें मीं ओळखलं आणि गोष्ट तिथेंच सोडून दिली. सगुणेचा नाद सोडून द्यायचं माझ्या जीवावर आलं—पण त्याबद्दलीं खाण्याचा नाद तरी कसा सोडून द्यायचा? खाण्याची संवय मला इतक्या लहानपणीं जडली होती कीं ती सोडून देणं शक्यच नव्हतं. तरीही नरसिंगरावाच्या हॉटेलांत जाणं मी सोडलं नाहीं. मी विचार केला कीं जर प्रीतीला भुकेवर विजय मिळतो तर जेवणावरही कां मिळूं नये? उपासमारीला न भितां जर पोरी प्रेम करतात तर अन्नालाही न जुमानतां प्रेम करूं शकतील. मी तिथें जात राहिलों.

मी सगीशीं बोलल्यानंतर दोन तीन दिवसांनीं हॉटेलांत डी. मंगेश मला भेटला, तोही तिच्याशीं माझ्या सारखंच कांहीं तरी बोलत असला पाहिजे आणि त्यालाही माझ्या सारखंच उत्तर मिळालं असावं कारण आज फक्त एक सिंगल चहा मागवून तो वेळ काढीत होता; मीही एक सोडा पीत पाऊण तास बसलों. त्या दिवसापासून आमच्या दोघांत न खाण्याची चढाओढ सुरू झाली. आम्ही तासचे तास त्या दुकानांत घालवून एक आण्याच्या वर बिल न होऊं देण्याचा जणुं काय विडाच उचलला होता. असे कांहीं दिवस लोटल्यानंतर एक दिवस सगुणेच्या बदली तिचा मामा आमच्या सरबराईला आला.

“ अलिकडे अन्नद्वेष झालेला दिसतो आहे मंडळीला. ” नरसिंगराव मला सोडा व डी. मंगेशाला सिंगल चहा देतांना म्हणाला. तेव्हां पासून तो स्वतःच आम्हाला वाढूं लागला! सुंदरी ऐवजीं राक्षसापुढें उमेदवारी करण्याची आमची तयारी नव्हती. पुन्हां आम्हीं दोघेही पहिल्यासारखे खाऊं लागलों. त्यांतल्या त्यांत माझ्या भुकेनें तर सुमारच सोडला होता, पोटांत नुसती आग उठल्यासारखा मी खात होतों—मला नंतर कळलें कीं सगुणेला खादाडपणाचा वीट आला आहे हें समजल्यावर तो लुच्चा डी. मंगेश मला सुपारींतून ‘ इंधन भस्म ’ म्हणून एक पुडी देत होता, त्या औषधानेंच मला ती ‘ खा खा ’ होत होती.

लौकरच डी. मंगेश तिथें येईनासा झाला. त्यानें माझ्यासाठीं एक भरलेला सुपारीचा डबा ठेवला होता—( त्यांतही तें भस्म होतंच हें नंतर माझ्या ध्यानांत आलं ) ‘ सत्याग्रहाला जातों ’ असं कांहींतरी सगुणेला त्यानं सांगितलं होतं, तिनंच मला सांगितलं. मी मात्र रोज तिथें जाऊन पूर्वींपेक्षांही दुप्पट खात राहिलों. माझा प्रतिस्पर्धी कुठें गेला होता कोण जाणे. पण तो गेल्यामुळें रंगणांत मी एकटाच राहिलों होतों हें खरें—मात्र खादाडपणानें सगुणेच्या मर्जींतून मी उतरत चाललों होतों—निदान मला तसं वाटतं—पण भूक लागल्यावर खाण्याशिवाय इलाजच नव्हता.

डी. मंगेश गुप्त झाल्यावर आठएक दिवस झाले होते, एक दिवस मी नेहमींप्रमाणें नरसिंगवांच्या राइस प्लेट हौसमध्यें गेलों असतां एकटे मालकच तिथें असल्याचं मला दिसलं. शोध करतां त्यांनीं सांगितलं कीं अंबरनाथला जत्रेबरोबरच कसलंसं ग्रामोद्योग नि खादी दर्शन आहे, तिकडे चि. सोनूबरोबर सगुणी गेली आहे. याप्रमाणें

लागोपाठ दोनतीनदां झालं. मग मीच एक दिवस तें प्रदर्शन पाहायला गेलों. अंबरनाथच्या स्टेशनावरच सोनू नि सगुणा भेटली. प्रदर्शन न पाहतां मी त्यांच्याबरोबर परत आलों. ती माझ्याशीं फारसी बोलली नाहीं. गाडींत मी सोन्याला एका बाजूला काढला,

“ कारे, अंबरनाथच्या जत्रेंत इतकं रोज पहाण्यासारखं काय आहे ?”

“ मी जत्रा पाहतो, ताई उपास पाहायला जाते—”

इतक्यांत सगुणेचं लक्ष आमच्या कुजबुजीकडे गेलं आणि माझी चौकशी तितकीच राहिली. पण दुसऱ्या दिवशीं वेळ काढून मी लौकर अंबरनाथला गेलों व प्रदर्शनाकडे वळलों.

मंडपांत तिकीट काढून शिरावें कीं काय हा विचार करीत मी थांबलों असतां माझ्या हातांत कोणी एक जाहिरात दिली. त्यांत भडक अक्षरांत मजकूर होता—“ केवळ देशासाठीं ! उपासाचा उच्चांक ! स्टॉल नंबर ७७ मध्यें पहा—दे. म. मंगेसन यांचा एकेचाळीस दिवसांच्या उपोषणाचा विक्रम—! तिकिटाचे पैसे खादीफंडाला जातील महात्माजींचा खरा सच्छिष्य–त्याला भुकेल्या अवस्थेंत पहा आणि राष्ट्र कार्याला मदत करा !––अवघा एक आणा ! ” ही जाहिरात मी वाचून पुरी करतों न करतों तोंच हाडकुळा, क्षीण, दाढी वाढलेला आणि कान्हलेला एक माणूस मांडवाच्या बाहेर तीरासारखा धांवत आला, त्याच्या बगलेंत एक फंड–पेटी होती. तो सरळ येऊन मला न पाहतां माझ्या अंगावर धडकला. तो पडणार होता पण मी त्याला सांवरला नि म्हणालों “ अहो, जरा आस्ते–”

त्या माणसानें चपापून माझ्याकडे पाहिलें व तो घोगऱ्या आवाजांत बोलला,

"मला अडवूं नका--बाबूराव, मला सोडा--मला खायचं आहे—सोडा—"

"डी. मंगेश?" मी पकडलेल्या शिकारीकडे पाहात आश्चर्यानें उद्गारलों.

'हो मींच-पण चला-इथें नको-कुठेंही चला-खायचं मिळेल तिथं" तो धांपा टाकीत म्हणाला.

त्याच्याबरोबर चालत पण त्याला न सोडतां मीं विचारलं,

"म्हणजे या जाहिरातींतले उपास करणारे तुम्हींच का?"

"मींच—पण आतां नाहीं. आतां उपास सोडायची घाई आहे मला-जळो तो विक्रम—मरो तो उच्चांक—नी खड्डयांत गेली ती सगुणा!" तो कॅकाटला.

"अहो, तुम्हीं तुमच्या उपासावर वाटेल तितके चिडा, पण तिला कां शिव्या?" मीं जरा रागानेंच म्हणालों.

"तिच्यासाठींच या फंदांत पडलों होतों—पण चुकलों, आतां मला सगुणा नको—जगांतल्या साऱ्या पोरी हार घेऊन समोर आल्या तरी नकोत—मला—खायला पाहीजे—सोडा मला—आठ दिवसांची तिकीटविक्री या पेटींत सांठली आहे-ते सगळे पैसे खर्चून मी खाणार -पोटभर खाणार. जाऊं द्या, नाहींतर तुम्हांला खाईन यावेळीं—" तो जवळजवळ माझा चावा घेतच म्हणाला.

मी त्याला सोडून दिला. मला त्याची दया आली. प्रेमासारख्या थोर नि उच्च भावनेची भूक कशी राख करून टाकते हें मी पाहिलें. सगुणेला खूष करण्यासाठीं प्राणांतिक उपोषण करायला निघालेला तो डी. मंगेश पैशाच्या चण्यासाठीं आज तिचा खूनही करायला तयार झाला असता. तो सांपळ्यांतून सुटलेल्या उंदरासारखा पळून गेला—खाण्याचे पदार्थ

शोधण्यासाठीं. मी प्रदर्शन पहायचा विचार सोडून परत स्टेशनकडे निघालों, तोंच मला सगुणा दिसली. सोन्या बरोबर होताच. त्याला दोन आणे देऊन ‘ तुला हवें तें घे नि इथेंच परत ये ’ म्हणून मी पिटाळला, आणि सगुणेशीं बोलण्यासाठीं तिला घेऊन एका झाडाखालीं बसलों.

“ आतां प्रदर्शनांत कांहीं उरलं नाहीं, ” मी सहज बोललों “ तुझा उपासेश्वर पळाला. ”

तिला कळलें कीं मला सारें कळलें आहे. ती धीटपणें म्हणाली, “ माझ्यासाठीं त्यांनीं केला उपास—”

“ पण तो सोडला आतां—तुझ्यासाठींच काय पण दुनियेंतल्या साऱ्या सगुणा आल्या तरी तुझा डी. मंगेश या क्षणाला त्यांच्याकडे पाहणार नाहीं. फंडाची पेटी काखोटीला मारून तो चणेवाल्याच्या शोधार्थ पळत सुटला आहे—”

“ असूं द्या, तुम्हीं नसतं केलंत ऐवढं माझ्यासाठीं–”

“ खरंच माझीं चूक आहे ती. खाण्याची मोठी वाईट संवय जडली आहे मला, पण काय करूं ती जातच नाहीं–भूक मोठी वाईट आहे. ”

ती नुसती खिन्नपणें हांसली. तितक्यांत सोन्या परत आला, व आम्हीं तिघे मिळून कर्जतला निघून आलों.

त्या नंतर थोड्याच दिवसांनीं सगुणा पुण्यास जाणार असं मला कळलं. तिची एक मैत्रिण पुण्याच्या एका फिलम कंपनींत नोकरीला होती, तिनं आपलं लगीन जमवलं होतं, त्यासाठीं सगुणा जाणार होती. मी नरसिंगरावाला म्हणालों, ‘ तिकिटाचा खर्च कशाला ? माझ्या ब्रेकव्हॅनमधून सगुणेला मीं लोणावळ्यापर्यंत पोहोंचवतों नी तिथें लोकल-मधें बसवून पुण्याला रवाना करतो माझ्या ओळखीनें, नरसिंगरावाला

अर्थातच हा बेत पटला. सगुणाही कबूल झाली. एक दिवस सकाळीं चहा पिऊन आठ तेवीसला माझी मालगाडी कर्जतहून निघाली. आमचा अंदाज असा होता कीं सव्वानवाच्या लोकलनें सगुणेला पुढें पुण्याला जातां येईल. माझ्या ब्रेकव्हॅनमध्यें तिची बॅग वळकटी ठेवली आणि सृष्टिसौंदर्य पहात पहात आम्हीं घाट चढूं लागलों. पावसाळ्याचे दिवस होते, वनश्री सुंदर दिसत होती. सगी हिरवं पातळ नेसली होती, तिला मी म्हटलं कीं 'तूं आज या डोंगराची राणी शोभतेस अगदीं!' तेव्हां ती मोहकपणें लाजली. लोणावळ्याला पोहोंचल्यावर चहा घेण्याचा बेत होता आमचा, बरोबर फराळाचं वगैरे कांहीं घेतलं नव्हतं—एकंदर अवघा चार तासांचा प्रवास पण—

त्यावर्षीं घाटांत खडक कोसळून मुंबई–पुणें रहदारी ४।५ दिवस बंद पडल्याचं आठवत असेल तुम्हाला. माझी मालगाडी त्या अपघाताच्या वेळेला नेमकी घाटांत सांपडली, नी पुढें रूळावर खडक पडले आहेत म्हणून मागें जावें कीं काय हा विचार करीपर्यंत गाडीच्या मागेंही कांहीं खडक कोसळले. पाऊस सारखा धो धो पडत होता. दुपारच्या बारा–एकपर्यंत आम्हीं गप्पा मारल्या, मग सगुणेनं थोडी झोंप काढली, मी पुढच्या एंजिनपर्यंत एक सफर करून आलों. दोन वाजले, चहापाणी वगैरे कांहींच नाहीं, दुपारचें जेवण तर नव्हतेंच. मीं बसल्याबसल्या एक डुलकी काढली. तीन वाजले, चार वाजले, पांच सहा—अंधार पडला, त्याआधींच मी एकदां खालीं उतरून बरींचशीं रानफुलें गोळा करून सगी आणूनला दिलीं होतीं. आम्हीं मोठालीं माणसें पण त्यावेळीं खेळखेळ खेळलों. सगीला राणी म्हणून अभिषेक केला, फुलांचे गुच्छ केले, तुरे केले, गजरे केले, माळा केल्या—पण त्या एकमेकांच्या गळ्यांत घातल्या नाहींत.

गाडी साधारणपणें दुसऱ्या दिवशीं दुपारपर्यंत हलेल असा अंदाज होता, लाईनवर काम चालू होतें रात्री अकराच्या सुमाराला सगी एकदम डोळे उघडून म्हणाली,

" आई ग, भूक—"

तितक्यांत मला हांसूं आलेलें तिनें पाहिलें, ती शरमिंदी होऊन दुसरीकडे पाहूं लागली.

" रागावूं नको सगुणे, मी हांसलों तों मला दुसरीच एक आठवण झाली म्हणून—" मी तिला म्हणालों. ती कांहीं न बोलतां डोळे मिटून बसून राहिली.

त्या रात्रीं मला झोंप अशी येत नव्हती, पण भुकेनें ग्लानि येत होती, मधून मधून जाग येत होती. मरणाच्या वेळीं माणसाच्या डोळ्यांपुढून त्याच्या आयुष्यांतल्या गोष्टी भराभर दिसून जातात म्हणतात —त्यावेळीं मला माझ्या आयुष्यांत खाल्लेले सारे जिन्नस एकामागून एक डोळ्यांपुढे दिसूं लागले. लहानपणीं खाल्लेले खाऊ, लाडू, वड्या, दिवाळीचे फराळ, मिठाईचीं शिखरें, सारीं माझ्या डोळ्यांपुढून जाऊं लागलीं. हुरडा, चणेकुरमुरे, भाजलेल्या नि उकडलेल्या शेंगा, हरभरा, फळफळावळ, निरनिराळ्या हॉटेलांतून खाल्लेले पदार्थ, खाणावळींत जेवलेलीं जेवणें—सारीं कांहीं आठवलीं. मला मधून मधून पुढें अन्न असल्याचा भास होऊं लागला, आपल्याला कोणीतरी वाढीत आहे असें वाटूं लागलें. अर्धवट झोंपेंत पण मोठ्यानें बोलून मी एकाएकी ऑर्डर दिली.

" मसाला डोसा -बटाटा पुरी—खमंग ढोकळा—दुधी हलवा—"

आणि लगेच जागा होऊन वरमलों, सगीकडे पाहूं लागलों—

" नी मला दही, इडली—उसळ—गुलाबजाम—मसाला दूध—"

ती बोलून गेली. तिनें डोळे उघडून माझ्याकडे पाहिलें, मी लगेच म्हणालों—

" पक्की भाजलेली घडीची पोळी—बटाटा—भाजी—टॉमेटो रस्सा—"

" दहीपोहे—भरलीं केळीं—पाक पुरी—पीयूष—" तिनें प्रत्युत्तर दिलें.

त्यानंतर आम्ही दोघांनीं मिळून अन्नराज्याच्या झाडून साऱ्या प्रजेची खानेसुमारी घेतली.

अखेर एकाही पदार्थाचें नांव जेव्हां शिल्लक उरलं नाहीं तेव्हां आम्हीं थांबलों. सगुणेची माझी दृष्टादृष्ट झाली. तिच्या डोळ्यांत ज्या चांदण्या पाहण्याची आशा मीं इतक्या दिवस करीत होतों त्या एकाएकीं चमकल्या, ती उठून माझ्या शेजारीं येऊन बसली नी हलक्या आवाजांत बोलली,

" बाबुराव, खाण्याबद्दल माणसाचा वीट करणं ही माझी चूक झाली. माणसं श्रम करतात त्यांना खावंच लागतं, हें मला कळलं नव्हतं, पण माझा वेडेपणा आतां मला कळला—"

मी तिच्या गळ्यांत कोमेजलेल्या रानफुलांचा हार घातला.

दुसऱ्या दिवशीं सकाळीं दहाच्या सुमारास ' लाइन क्लिअर ' झाली. आम्हीं लोणावळ्याला उतरलों. माझ्या जुन्या खोलीवर सगीला घेऊन गेलों. एका भटजीला पकडून त्याच दिवशीं लगीन लावून घेतलं, आणि थोड्याच दिवसांत नोकरीचा राजीनामा देऊन माझा प्राव्हिडंट फंड काढला आणि हें चहाचें दुकान उघडलं—मुहूर्ताला नरसिंगराव आले होते.

मग बोला, आहे कीं नाहीं ही आमची गार्ड नटी हट्ट ?

मी उत्तर देण्याच्या आंतच सगुणा बाहेरच्या गिऱ्हाईकाला बोलावून आंत आली.

" सांगितलं यांनीं सारं तुम्हांला—मला उपाशी ठेवून लग्नाला कशी कबूल करून घेतली ती ? " तिनें हांसत हांसत विचारलें.

आणि गोष्ट ऐकण्याबद्दल म्हणून कीं काय माजी गार्ड बाबुराव यानीं माझ्याकडून बिल घेतलें नाहीं.

# बावटा

Like some long caravan bearing merchandise of sorts, the tales of a writer wind through the desert of indifference towards the oasis of public favour. Whether they ever arrive or drift to death among the shifting sands of popular taste lies on the knees of the gods–their author has no say. When he has mustered and sent them forth, he may retire and squat afresh on the carpet of vision, having done all he can.

*—Galsworthy's foreword to Caravan.*

प्रवासाला मेलगाडी सोईची असेल पण पाहायला मालगाडीचीच मौज अधिक असते; एकतर ती मेलसारखी पिसाटपणें एकदम समोरून खडखडत नाहींशी होत नाहीं, अगदीं संथपणें, धीम्या तालांत, आरामांत आपल्यापुढून जाते–इतकी कीं इंजनापासून 'ब्रेका'पर्यंत डब्यान्‌डबा मोजून घ्यावा. एकसारख्या डब्यांची मेल बाणासारखी एकसंधी भासते, पण नानाप्रकारच्या डब्यांची मालगाडी माळेसारखी वाटते; लांब डबे, आंखूड डबे, अर्धे डबे, सपाट डबे, तेलाचीं नळकांडीं, घोड्यांचे तबेले, मोटरींचीं घरें नी धास्तीनें पांढरीं फटफटीत पडलेलीं स्फोटक द्रव्यांचीं कोठारें, या साऱ्या तऱ्हा एकाच माळकेत गुंफून नेणाऱ्या मालगाडीपुढें, नुसत्या माणसांनीं ठेंचून भरलेल्या मेल, एक्प्रेस किंवा 'पाशिंजर' गाड्यांना काय गोडी आहे ? पुन्हा मालगाडीतही थोडीशी माणुसकी आढळतेच. ताडपत्रीच्या उतरत्या छपरांनीं कांहीं डबे धावत्या झोपड्यांसारखे दिसतात, तर कांहीं डब्यांत

संसार थाटून कामकऱ्यांनीं खरोखरच्याच झोंपड्या घातलेल्या असतात. उतारूंना वाहून नेणाऱ्या गाडीचे डबे बहुधा एकाच छापाचे असतात, पण मालाची वाहतूक करणाऱ्या गाडीच्या डब्यांवर N. W. R. पासून S. I. R. पर्यंत बारा मुलखांची छाप पडलेली दिसते.

या पुस्तकाची गोष्टही मालगाडीसारखीच आहे; वीस लहानमोठ्या गोष्टींच्या या लटांबरांत कादंबरीचा मेलसारखा वेग किंवा एकसूत्रीपणा नाहीं; या गोष्टी नाना प्रकारच्या आहेत इतकेंच नव्हे तर दूरदेशींच्या मालडब्यां-प्रमाणेंच यांतल्या कित्येक गोष्टींवर दूरदेशांचे छाप आहेत: अंक १, २, १०, व २० या गोष्टी ओ. हेनरीकडून घेतल्या, आणि ७ व ११ पी. जी. वुड-हाउसच्या आधारें लिहिल्या. परक्या रेल्वेच्या कामगिरीवर जाऊन आलेल्या डब्यांसारख्या या गोष्टीही एकेकदां वेगवेगळ्या नियतकालिकांतून येऊन गेल्या: अंक १, २, ३, ६, १२ व १४ पुण्याच्या वाङ्मयशोभा नामक एका मासिकांत, ७, ८, १५ व १७ धनुर्धारीत, १३ आशा-प्रमोदमध्यें, ४ ज्योत्स्नामासिकांत, ५ व १६ चित्रेंत, ९ झंकारमध्ये, १० व १८ मौजेत, ११ अग्रगीत, १९ सत्यकथा मासिकांत व २० समीक्षक मासिकांत. कथासंग्रहाच्या नांवाचें इतकें समर्थन अपुरें पडत असेल तर आणखी एक चांगली सबब शिल्लक आहे: मोहक, गुलगुलीत आणि काव्यगर्भ अशा नांवाची वाचकांच्या तोंडाला बसलेली मिठी एकाद्या गांवढळ व गद्य नांवानें जाईल या अपेक्षेनें हें नांव दिलें आहे असें समजावें.

या गोष्टी एकत्र करून आकर्षक स्वरूपांत छापण्यास मदत करण्याबद्दल माझे जुने मित्र चित्रकार दलाल, कथालेखक शिरोडकर व नवे मित्र प्रकाशक हिरजी मोहनजी यांचे मीं आभार मानतो.

पुणें
१ फेब्रुवारी १९४२

श्यामराव निळकंठ ओक